# तिसऱ्या महायुद्धाची पार्श्वभूमि



लेखक

पां. वा. गाडगीळ



प्रकाशक

महाराष्ट्र ग्रंथ भांडार लि. मुंबई ४.

किंमत ४ रुपये

# प्रस्तावना

तिसरें महायुद्ध होणार कीं टळणार हें आज कोणासहि ठाऊक नाहीं. पण जागतिक परिस्थितीत जो ताण व जी उष्णता आहे त्यावरून तिसरें महायुद्ध केव्हा भडकेल त्याचा अंदाज सागता येत नाहीं. अशा या संभाव्य अथवा असंभाव्य महायुद्धाची पार्श्वभूमि मराठी वाचकाना संकलितपणे सागावी म्हणून हें पुस्तक लिहिलें आहे. मी हे पुस्तक नेहमीच्या कामातून सुटी घेऊन सुमार पंधरवड्यात लिहिले, हे अनेक मित्राना माहित आहे. याहून अधिक सावकाशपणें लिहिण्याला वेळ मिळणेंच शक्य नव्हतें. तरी पण मी घाई-घाईनें कांहींतरी खरडलें असे वाचकानी समजू नये. या पुस्तकासाठीं वापरलेले साधनग्रथ मी पुष्कळ दिवस वाचीत आलो असून या पुस्तकात माडलेली मते मी दीर्घकाल चिंतन करून बनविलेलीं आहेत.

जागतिक राजकारणाचे हें पुस्तक आहे. पण हिंदुस्तानचें अंतर्गत राजकारण व परराष्ट्रधोरण हे केन्द्र करूनच हे पुस्तक लिहिलें आहे. पुस्तकातील सुटे सुटे परिच्छेद वाचून माझ्या मताबद्दल वाचकाचा गैरसमज होईल. तेव्हा माझ्या मतासंबधाने नीट कल्पना येण्यासाठी निदान भारतीय राजकारणासबधीचें प्रकरण समग्र वाचणें अवश्य आहे. मला अधिक वेळ असता व राजकारणासारख्या शुष्क विषयावरचें अधिक मोठें पुस्तक आजकाल खपणे शक्य असते तर पुस्तक अधिक मोठें लिहिता आले असते, इतका हा विषय मोठा आणि लोकाना पूर्ण समजून देणें अवश्य असा आहे. पण हें लहान पुस्तक हि समग्र काळजीपूर्वक वाचणारास गेल्या तीस वर्षातील जागतिक राजकारणाचा एकदर ओघ कळून येऊन प्रचलित तणातणीच्या राजकारणाचें रहस्य काय हें कळू शकेल.

पुस्तकाचे दोन विभाग केले आहेत. पहिल्या सात प्रकरणात गेल्या तीस पस्तीस वर्षांचा इतिहास त्रोटक स्वरूपांत देण्यात आला असून दुसऱ्या विभागात या इतिहासाचें तात्त्विक विवेचन केलें आहे. हस्तलिखित वाचणाऱ्या 'पहिल्या वाचका'नें फार उपयुक्त सूचना करून पुस्तक बरेंच सुधारण्यास साहाय्य केलें याबद्दल त्याचे आभार मानतो. न्यू भारत प्रेसचे मॅनेजर व कामगार यांनीं काम चागलें व लवकर केल्याबद्दल त्यांचेहि आभार मानतो.

ता. १४-९-५०　　　　　　　　　　पां. वा. गाडगीळ

# अनुक्रमणिका

## विभाग पहिला : इतिहास



## विभाग दुसरा : विवेचन



## साधन ग्रंथांची यादी


The Post War World

—*G. D. H. Cole.*

The Soviet Impact on Western World

—*E. H. Carr.*

I Choose peace

—*K. Zilhacus.*

Reflections on the Revolution of our times

—*H. J. Lasky.*

The meaning of marxism

—*G. D. H. Cole.*

The planning of the U. S. S. R.

—*A. Kurskv.*


[ **टीप**-पुस्तकात अनेक वृत्तपत्रातले जे उतारे दिले आहेत ते वरील साधनग्रंथांवरून घेतले आहेत. ]

# तिसऱ्या महायुद्धाची पार्श्वभूमि

## : १ : पहिलें महायुद्ध व नंतर

ता. २४-२५ जून, १९५० च्या मध्यरात्रीं जे कोरिअन युद्ध सुरू झालें त्या युद्धांत उत्तर कोरिया गुन्हेगार कीं दक्षिण कोरिया गुन्हेगार हा प्रश्न उत्तरोत्तर गौण ठरत चालला असून अमेरिकेनें ज्या हेतूनें या युद्धांत उडी घेतली तो हेतु महत्त्वाचा बनत चालला आहे.' जगांत एका स्वतंत्र राष्ट्राचें दुसऱ्या स्वतंत्र राष्ट्रावर आक्रमण झालें, त्याचें निवारण करण्यासाठीं, ज्यावर आक्रमण झालें त्या राष्ट्राची बाजू अमेरिकेनें घेतली ' असें म्हणणें हें सर्वसत्य नव्हे. पाकिस्ताननें भारतावर काश्मीरमध्यें चढाई केली, पॅलेस्टाइनमधील ज्यूंनीं पॅलेस्टाइन सरकारचा पाडाव करून ' इसराइल ' हें स्वतंत्र राज्य स्थापलें, या दोन्ही कृत्यात स्वतंत्र राष्ट्रावर परकीय आक्रमण घडलेंच, पण अमेरिकेनें त्यावेळीं, आक्रमण झालेल्या राष्ट्राच्या बचावासाठीं, हालचाल केली नाहीं, इतकेंच नव्हे तर आक्रमक राष्ट्राच्या धोरणास अप्रत्यक्षपणें पाठिंबाच दिला. मग कोरिअन युद्धांत दक्षिण कोरियाची बाजू अमेरिकेनें कां घेतली ?

याचें खरें कारण दक्षिण कोरियावर उत्तर कोरियानें आक्रमण केलें हें नव्हे. उत्तर कोरिआ हा कम्युनिस्ट असून कम्युनिस्टांचीं राज्यें वाढूं द्यायचीं नाहींत हें यांत अमेरिकेचें मुख्य उद्दिष्ट आहे. अमेरिकेचा हा उद्देश कांहीं आज नवा नव्हे. अमेरिका ही आज भांडवलशाही राष्ट्रांची पुढारी आहे आणि भांडवलशाही राष्ट्रांचा कम्युनिझमशीं हा झगडा पहिल्या महायुद्धाच्या अखेरपासून आजतागायत चालू असून दोन महायुद्धांच्या दरम्यानच्या राजकारणाचें रहस्य हा झगडा हेच होतें.

दुसऱ्या महायुद्धाचें स्वरूप बाह्यतः तसें दिसलें नाहीं तरी ' भांडवलशाही विरुद्ध कम्युनिझम् ' या वादांतूनच दुसऱ्या महायुद्धाचीं कारणें घडत गेलीं आणि दुसऱ्या महायुद्धांत गुप्तपणें हाच झगडा चालू राहून युद्धानंतर त्यास उघड स्वरूप आलें आहे.

त्याच क्रमात कोरिअन युद्ध सुरू झालें व ' कम्युनिझम् विरुद्ध भांडवलशाही ' असा लढा खुल्या रणांगणावर तूर्त लहान प्रमाणांत सुरू झाला आहे. आतां यांतून तिसरे महायुद्ध उद्भवणें हें अपरिहार्य दिसत असून ते न झाले अथवा लांबणीवर पडलें तरी सध्यांच्या तंग परिस्थितीचे बरे वाईट असे दूरगामी परिणाम साऱ्या जगावर होणार आहेत. या सर्व परिस्थितीचा व तिच्या परिणामाचा विचार या पुस्तकांत करावयाचा आहे.

## क्रांतीची धास्ती

' भांडवलशाही विरुद्ध कम्युनिझम् ' हा झगडा मुख्यतः १९१७ सालच्या रशियांतील राज्यक्रांतीपासून सुरू झाला. पण पहिल्या महायुद्धापूर्वीपासूनच भांडवलदार राष्ट्रांतील मुत्सद्यांना कम्युनिस्ट क्रांतीचीं स्वप्नें पडूं लागलीं होतीं. इंग्लंडांत पहिल्या महायुद्धापूर्वी परराष्ट्रमंत्री असलेला सर एडवर्ड ग्रे याला शस्त्रास्त्रांची होत असलेली वाढ ही क्रान्तीला कारण होईल अशी भीति वाटत होती. सतत एक पिढी इतका काळ जर्मनीशीं ब्रिटनची शस्त्रास्त्रचढाओढ चालली होती. तिचा वेग वाढत होता. तीमुळें अखेर युद्ध टळण्याऐवजीं युद्ध अपरिहार्य मात्र होईल असें अनेकांना वाटत होतें. पण ग्रे म्हणतो,

" हा शस्त्रास्त्रसभार अंतर्गत क्रांतीनें उधळला जाण्याचाच अधिक संभव आहे. राष्ट्राराष्ट्रांच्या युद्धांत हीं शस्त्रें खर्ची पडण्याऐवजीं करभार फार असह्य झाल्यामुळें लोक बंड करतील. जगांतील बडीं राष्ट्रें आज आपल्या सैन्यांचीं आणि आरमारांचीं गुलाम झालीं असून ही गुलामगिरी वाढत आहे."

ब्रिंगफील्ड-स्ट्रेटफर्ड हा लेखक पहिल्या महायुद्धापूर्वी लिहितो,

" जर्मनीपासून ब्रिटनवर येणारें संकट जर लवकर आलें नाहीं तर मग जर्मन संकट येण्याऐवजीं अंतर्गत क्रांतिच येथें येईल. एडवर्डचा कालखंड जाऊन जॉर्जचा कालखंड चालू होत असता येथें वर्गयुद्ध वाढत आहे. आंतरराष्ट्रीय युद्धापूर्वी यादवी भडकण्याचाच संभव अधिक दिसतो. "

पहिले महायुद्ध सुरू झाल्यानतर ऑस्ट्रियाहंगेरोचा ब्रिटनमधील वकील परत स्वदेशीं जाण्यास निघाला. त्याला निरोप देतांना ब्रिटनचा परराष्ट्रमंत्रि सर एडवर्ड ग्रे म्हणाला,

" हें आतां जागतिक युद्धच सुरू होत असून त्याचे परिणाम भयंकर होतील. सोशॅलिझमच्या दिशेनें हें फार मोठें पाऊल पडत असून या महायुद्धानंतर सर्व देशांत मजूरमंत्रिमंडळेंच अधिकारावर येतील. "

असें होणें म्हणजे सर्व पुरातन संपत्ति व संस्कृति यांचा तो विनाशच होय असें ग्रेचें मत होते.

१९१४ सालीं पहिलें महायुद्ध सुरू झालें. जर्मनी, ऑस्ट्रिया, तुर्कस्तान हीं राष्ट्रें एका बाजूस आणि इंग्लंड, फ्रान्स, इटाली, रशिया दुसऱ्या बाजूस, असा तो सामना होता. अमेरिका १९१७ च्या एप्रिलमध्यें इंग्लंड-फ्रान्सच्या बाजूनें महायुद्धांत सामील झाली, पण त्यापूर्वी म्हणजे १९१७ च्या मार्चमध्यें रशियांत क्रांति होऊन झारचें सिंहासन उलथून पडलें आणि रशियन आघाडी ढिली झाली. युद्धाच्या आरंभीं रशियानें प्रचंड सैन्य रणांगणावर आणलें. पण देश मागासलेला, सैन्यखर्च, सरंजामशाही पिळवणूक याखालीं चिरडला जाणारा, यामुळें युद्धाच्या पहिल्या दिवसापासून रशियाचा पराभव होऊं लागला. शहरांतील कामगार व रणांगणावरील सैन्य यांची उपासमार होऊ लागली. खेड्यापाड्यांतून शेतकरी वर्गावर अतोनात जुलूम होऊं लागला. लोक असे दुःखी असतां व सैन्य रणांगणावर कच खात असतां पेट्रोग्रॅड या राजधानींत राजा व सरदार वर्ग चैनींत दंग होते. यामुळें क्रांति जवळ येत आहे याचा बाहेरच्या निरीक्षकास उमज पडला नाहीं.

१९१७ च्या आरंभीं रशियन सैन्य रणांगणावर कच कां खात आहे, क्रांतीचा संभव आहे कीं काय याविषयीं चौकशी करण्याकरितां लॉर्ड मिल्नरच्या नेतृत्वाखालीं ब्रिटननें एक शिष्टमंडळ पाठविलें. झारला राजधानींत दंगल होईल अशी भीति वाटून त्यानें रणांगणावरील सैन्याच्या दोन मोठ्या तुकड्या राजधानींत बोलविल्या होत्या. पण मिल्नरला राजधानींत सर्वच आबादीआबाद दिसली. तो म्हणतो,

" क्रांतीसबंधानें बोलल्या जाणाऱ्या गोष्टी या अतिशयोक्तीच्या आहेत.

सैन्याची राजनिष्ठा नष्ट होऊन ते क्रांतिकारक बनूं लागले हें म्हणणें तर असत्यच आहे. ''

मिलनरच्या या अभिप्रायानंतर एकाच आठवड्यांत क्रांतीची आग उसळली व कामगारांनीं बंड सुरू केल्यापासून पांचव्याच दिवशीं सैनिक व कामगार यांच्या संयुक्त बलापुढें झारचें सिंहासन कोसळून पडलें.

झारचे राज्य नष्ट झालें तरी रशियानें लगेच युद्धांतून अंग काढून घेतलें नाहीं. पुढें नऊ महिनेपर्यंत क्रांति अधिकाधिक भडकत चालली होती. भांडवलदारजमिनदारांचें सरकार झारच्या जागीं आले होतें. त्यांचे आर्थिक व साम्राज्यलोभाचे संबंध अँग्लो-फ्रेंचांशीं गुंतले होते. कामकरी आणि सैनिक मात्र युद्धास कंटाळले होते. भांडवलदारजमिनदारांच्या सरकारशीं कामकरी व सैनिक यांचा वाद व झगडा आठ महिने चालला. अखेर जेव्हां सरकार युद्ध थांबविण्यास तयार होईना तेव्हां कामकरीसैनिकांनीं ते सरकार कम्युनिस्टांच्या नेतृत्वाखालीं उलथून पाडलें व कम्युनिस्टांचा नेता लेनिन याच्या नेतृत्वाखाली शेतकरीकामकऱ्यांचें हुकुमशाही सरकार स्थापन झालें. या नव्या सरकारनें जमिनदारी नुकसानभरपाई न देतां नष्ट करून शेतकऱ्यांना जमिनी वाटणें, देशांतले प्राणभूत व पायाभूत धंदे बिनमोबदला राष्ट्रीय मालकीचें करणें आणि युद्ध थांबवून रणांगणावरून सैन्य मागें घेणें हीं आपल्या सरकारचीं धोरणें जाहीर केलीं व ताबडतोब लेनिन हीं धोरणें अमलांत आणण्याच्याहि उद्योगास लागला.

रशियांतील भांडवलदारवर्ग आणि जमिनदारवर्ग व अँग्लो-फ्रेंच राष्ट्रे यांच्यावर या क्रांतीचा परिणाम फार खळबळजनक झाला. रशियन जमिनदार व भांडवलदार यांची देशभक्ति साफ लयास जाऊन जुनी समाजव्यवस्था परत स्थापन करण्यासाठीं ते देशद्रोह करण्यासहि तयार झाले. ब्रूस लॉकहार्ट हा ब्रिटिश मुत्सद्दी त्यावेळीं रशियांत ब्रिटनचा प्रतिनिधि होता. त्यानें रशियांतले मोठमोठे सेनापति जरूर तर जर्मनीचीहि मदत घेऊन लेनिनचें राज्य उलथून पाडण्याच्या तयारीस लागले असल्याची हकीकत ब्रिटिश सरकारला कळविली. लॉकहार्ट याला स्वतांला रशियांतील प्रतिक्रांतिकारकांचें हें धोरण पसंत नव्हतें. आणि या प्रतिक्रांतिकारकांना ब्रिटिश सरकारनें पाठिंबा द्यावा हेंहि पसंत नव्हतें. पण ब्रिटिशांना एकतर कम्युनिझमचें वावडें होतें. शिवाय लेनिन हा जर्मनीचा हस्तक असल्याचा बोभाटा त्यावेळीं खूप झाला होता. म्हणून रशियन

लोक लढाईला तयार असतांहि लेनिन जर्मनीचा हस्तक होऊन युद्ध थांबवितो आहे असें ब्रिटिश मुत्सद्यांच्या मनानें घेतलें व ॲडमिरल कोल्चाक, जनरल डेनिकिन इत्यादि प्रतिक्रांतिकांना ब्रिटननें साहाय्य करण्याचा निर्धार केला.

चर्चिल हा ब्रिटनमध्यें युद्धमंत्री होता. त्याला रशियन बोल्शेव्हिकांनीं केलेली क्रांति न्याय्यहि वाटली नाहीं व प्रामाणिकहि वाटली नाहीं. चर्चिल त्यावेळीं म्हणतो,

"बोल्शेव्हिकाचें ध्येय जागतिक कामगारक्रांति हें आहे. त्यांच्या हातीं रशियाची सत्ता ठळकपणें अथवा फार काळ राहणार नाहीं. रशियाचा राष्ट्रीय आत्मा या बोल्शेव्हिकांत नाहीं. तो रशियांत इतरत्र कोठे तरी खास आहे. त्यास योग्य प्रकारें आवाहन केले गेलें पाहिजे. पीटर धी ग्रेट पासून जे वैभव रशियानें उभारलें त्याचा तो राष्ट्रीय आत्मा हाच प्रतीक आहे." चर्चिल हा बुद्धिमान असल्याबद्दल त्याचा फार लौकिक आहे. पण त्याबरोबरच पुरोगामी विचार डोक्यांत येऊ द्यायचें नाहींत हा त्याचा दुराग्रह फार मोठा असल्याचें हिंदी लोकांस माहीत आहे. परिस्थिति क्रांतिकारक झाली आहे, होऊ शकते हें त्याच्या ध्यानांत कधींच येत नाहीं. कोल्चॅक, डेनिकिन वगैरे प्रतिक्रांतिकारकांना साहाय्य करण्यांत चर्चिलनें कोट्यवधि पौंड उधळले. पण अखेरीस हे सगळे प्रतिक्रांतिकारक पराभूत झाले आणि बोल्शेव्हिकाचें राज्य दृढ झालें. त्यानंतर लिहिलेल्या 'वर्ल्ड क्राइसिस ॲंड आफ्टरमाथ' या ग्रंथात रशियन क्रातींत पाडाव झालेल्या झारचें चर्चिलनें संपूर्ण समर्थन केलें आहे. झारनें जबाबदार मंत्रिमंडळ स्थापन केलें नाहीं याबद्दल त्याची पाठ थोपटताना चर्चिल म्हणतो,

"तीन चतुर्थांश झार आणि एक चतुर्थांश पार्लमेंट, अशा सत्ताविभागणीनें त्या संकटकाळीं हुकुमत कोणाचीच चालली नसती. झारनें चुका केल्या असतील, त्याच्या अंगीं दोष असतील, पण त्यानें सत्ताविभागणी केली नाहीं ही त्याची चूक खास नव्हे, खरोखर विजयाचा पेला त्याच्या ओठाशीं आला आणि लवंडला."

चर्चिलच्या मतें क्रांतिकारकांनीं चोराप्रमाणें हळूच राजवाड्यांत शिरून सत्ता अचानक बळकावली. तो लिहितो,

"रशियाचें दैवच खोटें. इतकें अभागी राष्ट्र दुसरें कोणतेंहि नसेल. संकटांचें सर्व महासागर ओलांडून रशियन सरकारचें जहाज किनाऱ्याकडे सुरक्षित आलें,

बंदर त्याच्या दृष्टिपथात आलें आणि तोंच ते जहाज बुडालें. ऐन वादळात सुरक्षितपणें चाललेले जहाज वादळ संपल्यावर समुद्रतळाशीं गेलें. सर्व प्रकारचा स्वार्थत्याग झारच्या सत्तेनें केला होता आणि श्रमाचें फळ अगदीं हाताशीं आलें होतें, इतक्यात निराशा आणि विश्वासघात यांनीं त्याला घेरलें. मार्चच्या आरंभीं झार जेव्हां गादीवर होता त्यावेळीं रशियाचे साम्राज्य रशियन जनता, रशियन आघाडी सर्व कांहीं सुरक्षित होते."

झारचें राज्य हें जुलमी व नीतिभ्रष्ट होते ही गोष्टहि चर्चिलनें कधीं मान्य केली नाहीं. तो लिहितो,

" झारचें राज्य नीतिभ्रष्ट, नालायक होते असें म्हणणे ही एक ऐट पडून गेली आहे. खरोखर विजय झारच्या हाताशीं आला होता, त्याचवेळी झार भुईवर कोसळला, आणि तो जिवंत असतां किड्यांनीं त्याचें शरीर कुरतडून खाल्लें."

लॉइडजॉर्ज हा पहिल्या महायुद्धांत व नतरहि ब्रिटनचा पतप्रधान होता. तो रशियन क्रांतीचा शत्रुच होता. पण रशियन राज्यक्रांतीसंबंधीची चर्चिलची विचारसरणी लॉइडजॉर्जला पसंत नव्हती. लॉइडजॉर्ज आपल्या 'मेमॉयर्स' मध्यें लिहितो,

"झारच्या आमदानीस ज्या किड्यांनीं कुरतडून त्याची शक्ति खाऊन टाकली अशी चर्चिल तक्रार करतो ते किडे झारशाहीच्या नीतिभ्रष्टतेतूनच जन्म पावले होते. झारशाही कोसळली याचें कारण तिची शक्ति, वजन आणि सत्ता यांचा तंतून् तंतू जीर्ण झाला होता. म्हणून बंडाच्या पहिल्या धक्क्यासरशीं झारशाहीचा सांगाडा कोसळला. 'झारचे जहाज बंदराच्या दृष्टिपथांत आले होते' हे चर्चिलचें विधान अलंकारिक व कलायुक्त असलें तरी वस्तुस्थितीशीं ताडून पाहतां निव्वळ हास्यास्पद आहे......१९१९ सालीं चर्चिलनें योजलेल्या सगळ्या लष्करी भूमिका रशियन क्रांतीनें उध्वस्त केल्या. पण त्या क्रांतीबद्दल चर्चिलची आंधळी तेढ एवढी तीव्र आहे कीं झारशाहीचा अनियंत्रित अंमल कां ढासळला याचीं कारणें समजून घेण्यास चर्चिलची बुद्धि अपात्रच झाली आहे. क्रांति हे झारशाहीच्या पाडावाचें कारण नव्हे. झारशाहीच्या अपयशाचा तो अपरिहार्य परिणाम होता."

लॉइड जॉर्ज हा मंत्रिमंडळांतून निवृत्त झाल्यानंतर वरील मत व्यक्त करीत

होता. तरी पण स्वतः पंतप्रधान असतां रशियन राज्यक्रांति हाणून पाडण्यासाठीं चर्चिलनें रशियांतील प्रतिक्रांतिकारक सेनापतींना जी कोट्यवधि पौंडाची मदत केली तीसाठीं चर्चिल हा लॉइड-जॉर्जला थापा मारून बनवूं शकला होताच. १९१९ सालीं रशियन प्रतिक्रांतिकारक जनरल कोल्चॅकची रशियांत चढाई चालू होती आणि ब्रिटिश सेनानी जनरल नॉक्स हा चर्चिलच्या सूचनेप्रमाणें कोल्चॅकला मदत करण्यासाठीं सैबेरियांत फिरत होता. १९१९ च्या जून मध्ये चर्चिलनें नॉक्सला कळविलें कीं,

"लॉइड जॉर्ज हा आज पंतप्रधान असून सर्वसामर्थ्यवान आहे. त्याचें पाठबळ आपण संभाळलें पाहिजे. रशियाच्या सरहद्दीवरले जे अनेक प्रतिकारक सेनानी लढताहेत व पराभव खात आहेत त्यांना जनतेचा पाठिंबा नाहीं, मग आपण त्यांना पाठिंबा द्यावा का अशी शंका लॉइड जॉर्जला येते आहे. शिवाय या सेनापतीना लोकशाहीप्रेम कितीसें आहे याबद्दलहि त्याला शंका वाटते. तेव्हां, कोल्चॅकला सांगा कीं लोकांना जमिनी आणि घटनासमिति देऊं अशी व्यापक आणि खळबळ उडविणारी घोषणा करून टाक."

कोल्चॅकनें अशी घोषणा केली तर लॉइड जॉर्ज कोल्चॅकच्या सरकारला मान्यता देण्यास तयार होईल अशी चर्चिलची अपेक्षा होती. पण कोल्चॅकला ही गोष्ट कशी शक्य होणार ?. कोल्चॅकचे सर्व सेनापति जमिनीवरून हाकाललेले जमिनदार होते. पूर्व रशियांत जेथे जेथें त्यांचें पाऊल स्थिर झालें तेथें त्यांनीं जमिनी बळकावल्या आणि जे शेतकरी त्यांच्या सैन्यांत लढत होते त्यांनीं जमिनी अशा प्रकारें घेण्यास विरोध दर्शविताच कोल्चॅकच्या सेनापतींनीं त्यांना फटके मारून त्यांचे खून पाडले होते. अशा परिस्थितींत कोल्चॅकला कोणतीहि उदार घोषणा करणें अशक्यच होतें. शेवटीं कोल्चॅकचा पराभव होऊन तो बोल्शेव्हिकांच्या हातीं सांपडला व त्यास ठार करण्यांत आलें.

रशियांतील प्रतिक्रांतिकारकांना एकट्या इंग्लंडनेंच मदत केली असें नव्हे. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, झेकोस्लोव्हाकिया, जपान वगैरे दहाहून अधिक राष्ट्रें या उद्योगांत गुंतलीं राहून आपल्या संपत्तीचा व माणसांचा नाश सोशीत होतीं. अखेर या सर्व प्रयत्नांना अपयश येऊन बोल्शेव्हिक सरकार विजयी व स्थिर झालें. पण भांडवलदारी राष्ट्रांची कम्युनिस्टाविरुद्ध तेढ किती तीव्र आहे हें

यामुळें उत्पन्न झालें. त्यानतरच्या काळांत ही तेढ कमीअधिक तीव्र झाली. पण नष्ट कधींच झाली नाहीं.

इंग्लंड वगैरे राष्ट्रांनीं रशियन राजकारणांत हस्तक्षेप करण्यास सुरवात केली त्यावेळीं त्यांचा हेतु जर्मनीशीं रशियानें वेगळा तह न करता युद्ध चालू ठेवावे हा होता. झारचा पाडाव झाल्यानंतर रशियांत जे जमीनदारभांडवलदारांचें सरकार आलें त्यानें युद्ध चालू ठेवण्याचें ठरविलें व इंग्लंडादि संयुक्त राष्ट्रांनीं या निश्चयाचें अभिनंदन करून या नव्या राजवटीस मान्यताहि दिली. नंतर रशियांतील मेन्शेव्हिक व सोशलरेव्होल्यूशनरी ( म्हणजे सौम्य क्रांतिकारक ) या पक्षानीं स्वीडन या तटस्थ राष्ट्रांत युद्धामध्यें लढणाऱ्या उभय राष्ट्रांतील कामगार प्रतिनिधींची परिषद भरविली व 'नवीन मुलूख जिंकूं नये, नुकसानभरपाई मागूं नये' या भूमिकेवर युद्ध थांबवावें असा ठराव केला. यामुळें इंग्लडादि साम्राज्यवादी राष्ट्रांतील सरकारांच्या हातचीं युद्धसूत्रे हिसकलीं जाऊन तीं निरनिराळया देशांतील कामगारांच्या हातीं जाणार व क्रांतीचीं वादळें माजू लागणार ही मुख्य भीति साम्राज्यवादी मुत्सद्यांना वाटू लागली.

रशियांत नोव्हेंबर १९१७ मध्यें बोल्शेव्हिक ऊर्फ कम्युनिस्ट पक्षाच्या हातीं सत्ता येताच त्यानें, निरनिराळया साम्राज्यवादी सरकारांनीं जगांतील मुलूख जिंकण्यासाठीं जे गुप्त तहनामे केले होते त्यांच्या नकला झारच्या गुप्त फाइलींतून काढून प्रसिद्ध केल्या. यामुळें लोकमत आपणांविरुद्ध जाईल अशी संयुक्त राष्ट्रांना भीति वाटूं लागली. तेव्हां बोल्शेव्हिक हे जर्मनीचे हस्तक आहेत या लोकवार्तेचा संयुक्त राष्ट्रांनीं अधिक बोभाटा करून रशियांतील प्रतिक्रांतिकारकाना मदत करण्यांत आपला हेतु जर्मनीचा पराभव करणें व त्यासाठीं जर्मनीशीं युद्ध चालू ठेवील असें सरकार रशियांत पुन्हा निर्माण करणे एवढाच आहे असें संयुक्त राष्ट्रांतील मुत्सद्दी बोलूं लागले.

त्यावर लेनिननें उपाय सुचविला कीं "संयुक्तराष्ट्रांनीं रशियांतील प्रतिक्रांतिकारकांना मदत करूं नये व मुलुख घ्यायचा नाहीं. नुकसानभरपाई मागायची नाहीं या अटींवर जर्मनीशीं तह करावा; जर्मनीनें जर हा तह पाळला नाहीं तर रशियांतील बोल्शेव्हिक सरकार जर्मनीशीं युद्ध करण्यास तयार होईल." पण लेनिनच्या या शब्दांवर कोणींच विश्वास ठेवला नाहीं. तेव्हां लेनिननें

जर्मनीशीं वेगळा तह केला व युद्ध थांबविलें. यामुळें रशियांतील प्रतिक्रांति-कारकांना साहाय्य करण्यास संयुक्तराष्ट्रांना सवड मिळाली.

## युरोपांतहि क्रांति होणार ?

पुढें संयुक्तांना रशियांत बोल्शेव्हिक सरकार कायम राहणार एवढेंच नव्हे तर जर्मनींत कम्युनिझमची आग भडकत जाईल अशी भीति वाटू लागली. १९१८ च्या जानेवारींत जर्मनी व ऑस्ट्रियाहंगेरी या देशांत कामगारांचे संप झाले यामुळें ही भीति फार वाढली. युद्ध संपल्यानंतर जर्मनीशीं कसें वर्तन ठेवायचें यासंबधानें ब्रिटिश पंतप्रधान लॉइड जॉर्ज यानें चार बड्या राष्ट्रांना एक खलिता पाठविला. त्यांत सारा युरोप व मुख्यतः जर्मनी यांत कम्युनिस्ट क्रांति होण्याचा असलेला संभव कसा टाळावा याचीच चर्चा आहे. लॉईडजॉर्ज म्हणतो,

" सगळ्या युरोपांत क्रांतीची भावना पसरली आहे. युरोपांत केवळ असं-तोषच नव्हे तर युद्धपूर्व परिस्थितीविरुद्धहि कामगारवर्गात बंडप्रवृत्ति निर्माण झालेली आहे. हल्लींच्या परिस्थितींतील सामाजिक, आर्थिक व राजकीय संघटना नष्ट केल्या पाहिजेत ही भावना युरोपच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत पसरली आहे."

जर्मनीच कम्युनिस्ट होईल अशी धास्ती लॉइड जॉर्जनें घेतली. " एकदां ती घटना घडली म्हणजे सगळा पूर्व यूरोप कम्युनिस्ट झंझावातांत सांपडेल व त्यानंतर पूर्वयूरोप आणि रशिया यांतील तीस कोटि प्रजा जर्मन सेना-नींच्या नेतृत्वाखालीं जर्मनीच्या शस्त्रास्त्रांसह पुन्हा पश्चिम युरोप जिंकण्याच्या मोहिमेवर निघेल."

असे होऊं नये यासाठीं " जर्मनीवर संयुक्तांचें सैन्य बसवावे काय ? जर्म-नींतील बऱ्याच लोकांना ते पसंत पडेल. कारण समाजक्रांति ज्यांना नको त्यांच्या दृष्टीनें हाच उत्तम उपाय आहे. पण जर्मनीवर असें सैन्य बसविण्यास आमच्या बाजूच्या राष्ट्रांचाच विरोध येईल. ब्रिटिश साम्राज्यांतील राष्ट्रें अथवा अमेरिका आपलीं सैन्यें जर्मनींत ठेवण्यास कबूल होणार नाहींत. फ्रान्स एक-ट्यानें एवढी मोठी जोखीम पत्करूं शकणार नाहीं. यामुळें, उरल पर्वतापासून कम्युनिझमच्या भडकत सुटलेल्या ज्वाळा ऱ्हाइन नदी ओलांडून येण्याचा धाक उत्पन्न होईल."

म्हणून जर्मनीशीं सौम्य तह करावा आणि रशियाची कोंडी करावी अशी लॉइड जॉर्जची सूचना होती. त्यासाठीं रशियांतील प्रतिक्रांतिकारकांना द्रव्य देणें, सैन्य देणें व रशियाची आर्थिक कोंडी करणे हे सर्व उपाय बोल्शेव्हिक सत्ता हाणून पाडण्याच्या हेतूनें संयुक्तांनीं योजले. यामुळे रशियन जनतेचे अतोनात हाल झाले. लाल सैन्याला वैद्यकीय शस्त्रक्रियेचीं साधनें मिळेनात इतकेंच नव्हे तर जखमा बांधण्यास कापड नाहीं म्हणून वृत्तपत्राच्या कागदांनीं जखमा बांधाव्या लागत.

ब्रिटिश सरकारचें रशियन बोल्शेव्हिकांबाबतचें हें धोरण चुकत आहे असा सल्ला ब्रिटिश मुत्सद्यांना जबाबदार अधिकाऱ्यांकडून मिळत होता. रशियांत क्रांति सुरू झाली त्या वेळेपासून मि. ब्रूस लॉकहार्ट हा ब्रिटिश प्रतिनिधि रशियाच्या राजधानींत क्रांतीच्या आसपास राहून बनलेले आपले मत ब्रिटिश सरकारला कळवीत होता. आपल्या ' मेमोयर्स 'मध्ये लॉकहार्ट लिहितो,

" मॉस्कोंतील परिस्थितीच्या नाडीवर एक बोट ठेवले असतां कळून येईल कीं येथें फारच मोठा अनर्थ ओढवलेला असून रशियासंबंधीच्या जुन्या कल्पना येथे आता चक्काचूर झाल्या आहेत. ज्याला हे पटणार नाहीं तो अगदीं हट्टी, सनातनी असला पाहिजे. लंडनमधील मुत्सद्यांत हा हट्टीपणा होता. त्यांना वाटले ही क्रांति म्हणजे एक अल्पकालीन धावते वादळ आहे. पुन्हां चोहोंकडे शांत व पूर्ववत होईल.

पहिल्यानें संयुक्तांनीं उत्साहाचें सोंग करून रशियन क्रांतीचें स्वागत केलें. नंतर त्या स्वागतभावनेंत भीति प्रगट झाली. त्यांची इच्छा क्रांति लवकर शमून परिस्थिति पूर्ववत व्हावी अशी होती."

लॉकहार्ट ब्रिटिश सरकारला कळवीत होता कीं " प्रतिक्रांतिकारी रशियनांना पाठिंबा देणें हें निरुपयोगी असून लष्करी दृष्ट्या त्यांत धोकाहि आहे. त्यांना रशियांत कोणाचाहि पाठिंबा नाहीं. त्यांना जर आपण पाठिंबा देत राहिलों तर बोल्शेव्हिक सरकार जर्मनीचा पाठिंबा मिळवील."

बोल्शेव्हिक सरकार अत्याचार करते अशा बातम्या प्रसिद्ध होत. पण त्या सर्व अतिशयोक्तीच्या होत्या. उलट प्रतिक्रांतिकारी सेनानी अतीशय क्रूर होते. त्यावेळीं सैबेरियांत गेलेला अमेरिकन सेनापति ग्रीव्ह्ज् सांगतो, " तेथें भयंकर क्रूरपणें खून केले जात, पण जगाला ते खून बोल्शेव्हिक लोक करतात असें जे

वाटतें ते खोटें आहे. पूर्व सैबेरियांतील परिस्थितीसंबंधाने मी सांगतों कीं बोल्शेव्हिकानी एक खून केला असला तर बोल्शेव्हिकविरोधकांनीं शंभर खून केले आहेत असें म्हणण्यांत फारशी चुकी होणार नाही."

संयुक्तांनीं रशियन क्रांति दडपून टाकण्यासाठीं रशियन राजकारणांत जो हस्तक्षेप केला तो चुकीचा व आत्मनाशकहि होता असें मत लॉकहार्ट-सारख्या मुत्सद्यांनीं नमूद करून ठेवलें आहे.

पण संयुक्तांच्या या हस्तक्षेपाचा रशियावर एक कायमचा वाईट परिणाम मात्र झाला. रशियन पुढारी अधिक कठोर, अधिक संशयी बनले. लॉकहार्ट सांगतो, "पुढें पुढें बोल्शेव्हिकांनीं जीं क्रूर कृत्यें केलीं तीं प्रतिक्रांतिकारक आणि क्रांतिकारक यामधील यादवी अधिक तीव्र झाल्यावर केली. आणि याची जबाबदारी प्रतिक्रांति होण्याच्या खोट्या आशेवर विसबून संयुक्तांनीं रशियन क्रांतींत जो हस्तक्षेप केला त्यावर येते हा हस्तक्षेप झाला नसता तर बोल्शेव्हिक क्रांतीचा रस्ता वेगळा झाला असता असे नव्हे. पण आमच्या हस्तक्षेपानें रक्त-पात व दहशत वाढली हें खास."

१९२० मध्यें लॉइड जॉर्जनें रशियांतील माहिती मिळविण्यासाठीं एमेट कमिटी बसविली. तिनें 'बोल्शेव्हिक राज्याची पहिली सहामाही' कशी गेली तें सांगतांना म्हटलें आहे "मंत्रिमंडळांतील दोन सभासदांचे खून झाले, संयुक्तांचा हस्तक्षेप सुरू झाला, यादवी भडकली, गुप्त कट व गुप्त कटांच्या अफवा यांनीं वातावरण कुद्ध झालें. तेव्हां मग व्यक्तिस्वातंत्र्यावर बंधनें आलीं." बोल्शेव्हिक क्रांति संयुक्तांना दडपता आली नाहीं तरी पण क्रांतिकारकांना क्रूर बनवून संयुक्तांनीं बोल्शेव्हिकांवर सूड भरपूर उगविला एवढें यश त्यांना खास मिळालें.

बोल्शेव्हिकांच्या अंगीं हा जो क्रूरपणा आला आणि पाश्चिमात्य लोकशाही पद्धतीसंबंधानें जो तिटकारा ते व्यक्त करूं लागले त्यामुळें पाश्चिमात्य राष्ट्रांतील समाजवाद्यांनाहि उलट बोल्शेव्हिकांसंबधानें तिरस्कार व भीति उत्पन्न झाली. यामुळें, पाश्चात्य भांडवलदारी राष्ट्रांना रशियांतील बोल्शेव्हिक राज्य जरी उलथून पाडता आलें नाहीं तरी मध्ययुरोपात समाजक्रांतीची लाट जी उसळली ती भांडवलदारांनीं युरोपीय सोशॉलिस्टांच्या मदतीनें मागें हटविली.

१९२० सालीं बोल्शेव्हिक रशिया व पोलंड यांचें युद्ध झालें. त्या युद्धांत

पोलंडला मदत पाठविण्यासाठीं ब्रिटिश भांडवलदारांनीं बंदरांत विविध माल पाठविला. पण सोशॉलिस्ट मताच्या गोदीकामगारांनीं बोल्शेव्हिक रशियाविरुद्ध पोलंडला मदत करायची नाहीं असा निर्धार करून बोटीवर माल चढविण्याचेंच नाकारलें. पण युरोपांत कम्युनिस्ट दंगलो हाणून पाडण्याचे कामीं मात्र पाश्चात्य भांडवलदारी राष्ट्रांच्या प्रयत्नांना त्या त्या राष्ट्रांतील सोशॉलिस्टांनीं भरपूर साहाय्य केलें. यामुळें मध्य युरोपांतील इतिहास पहिल्या महायुद्धानंतर रशियन क्रांतीहून अगदीं उलट दिशेनें गेला.

रशियात कम्युनिस्ट क्रांति झाली तरी युरोपांत व बाकीच्या जगांत पाठोपाठ क्रांति होत गेली नाहीं, तर रशियांतील कम्युनिस्ट क्रांति जिवंत राहणार नाहीं असा रशियन क्रांतीचे पुढारी लेनिन आणि ट्रॉट्स्की यांचा अंदाज होता. म्हणून युरोपात क्रांति भडकविण्याचे प्रयत्न त्या त्या राष्ट्रांतील कम्युनिस्टामार्फत रशियन कम्युनिस्टांनीं केले. पण ते सर्व फसले. अनेक कारणानीं ते फसले. युरोपातील लोकांची उपासमार युरोपातील सार्वत्रिक विध्वंसामुळे होऊ लागली. पण संयुक्त राष्ट्रांनीं युरोपीयनांना अन्नाचा फार मोठा पुरवठा केला. तसेंच जर्मनीवर सैन्यच बसविण्यात आलें. आणि युरोपीयन राष्ट्रात हळुहळू फॅसिस्ट संघटनाची वाढ करण्यात आली. युरोपला अन्नपुरवठा करण्यात क्रांतीचे वारे शमवावे हा हेतु अगदीं स्पष्ट होता. सर विल्यम गूड हा मध्य युरोपांत रिलिफ डिरेक्टर होता. १९२० च्या आपल्या रिपोर्टांत तो लिहितो,

" युद्धानंतर घाईघाईनें जीं सरकारें उभीं करण्यात आलीं त्यांचे अधिकार टिकविण्यास अन्न हाच मुख्य आधार होता. अर्धे युरोप बोल्शेव्हिक होण्याच्या बेतात होतें पण १९१९ ते १९२१ या काळात १३ कोटि ७० लक्ष पौंड मध्य व पूर्व युरोपीयन राष्ट्रांना कर्जाऊ देण्यात आलें. त्या पैशांमुळेंच अन्न, कोळसा, आणि वाहतूक यांचा खर्च करणे शक्य झालें. हें साहाय्य झालें नसतें तर ऑस्ट्रिया आणि बहुधा इतर अनेक देश रशियाच्या मार्गानें गेले असते. युद्ध तहकूब झाल्यानंतर अडीच वर्षांनीं युरोपातील बोल्शेव्हिझमचा संभव संपूर्ण नष्ट झाला तो बव्हंशीं या कर्जामुळेंच. "

अमेरिकेनें युरोपला युद्धतहकुबीनंतर जें साहाय्य केलें तें कोणत्या हेतूनें केलें याविषयीं लुई फिशरनें हूवरचा उतारा दिला आहे. हूवर म्हणतो " युद्धतहकुबीनंतर अमेरिकेनें युरोपसंबंधानें जें जें धोरण आंखलें त्या सर्वांचा हेतु युरोप बोल्शेव्हिक होऊं नये अथवा तेथें लष्करशाही निर्माण होऊं नये हाच होता. "

---

जर्मनींत ऱ्हाइन लँड आणि ऱ्हूर येथें संयुक्तांचीं सैन्यें बसविण्यांत आली आणि ऱ्हूरमधील कम्युनिस्ट प्रवृत्तीच्या कामगारांना या ना त्या निमित्तानें ठार करण्यात आलें. पण कम्युनिझम्‌शीं मुकाबला करण्याचा मुख्य उपाय कम्युनिस्ट-विरोधी संघटनांना उत्तेजन देणें हा होता. लॉर्ड ॲबरनॉन हा युद्धानंतर बर्लिन-मध्यें ब्रिटिश वकील होता; तो १९३० च्या नोव्हेंबरमध्यें लिहितो,

"संयुक्तांचें जर्मनीविषयक धोरण असें होतें कीं जर्मनीचें मोठें युद्धसाहित्य उध्वस्त करावें, पण लहान शस्त्रास्त्रें तितक्याच निर्धारानें नष्ट करूं नयेत. सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट यांच्या हातीं शस्त्रें राहणारच, तेव्हां जुन्या समाजव्यवस्थेच्या पुरस्कर्त्यांच्या हातीं मात्र शस्त्रें राहूं नयेत हें धोरण गैर आहे असें माझें मत होतें. Einwohnerwenr आणि Orgsch यांसारख्या संस्था खरोखर पुढें अव्यवस्था उत्पन्न करतील कीं शांतता राखण्यास उपयोगी पडतील हें सांगणें कठीण आहे. पण या संस्था उजव्या गटाच्या असून उजव्या गटापासून जें संकट येण्याचा संभव आहे त्यापेक्षां डाव्या गटापासून येऊं पाहाणारें संकट अधिक मोठें आहे. जर्मनींत जर कम्युनिझम् माजलाच तर आतां उल्लेखिल्यासारख्या संस्था देशांत शांतता व सुव्यवस्था राखण्यास त्यावेळीं उपयोगी पडतील. जर्मनींत या संस्थांची जी लष्करी वृत्ति दिसून येते तीबद्दल फ्रेंच अधिकारी सदा खळखळ करतात. पण जर्मनींत लष्करशाही माजण्याचें संकट आतां कायम टळलें आहे. आतां खरें संकट कम्युनिझम्‌चें आहे. हें कळण्याची अक्कल या फ्रेंचांना नाहीं. वर उल्लेखिलेल्या संस्था मोडून टाका असा फ्रेंचाचा येथील ब्रिटिश अधिकाऱ्यामागें लकडा लागला आहे. पण ही मागणी शुद्ध मूर्खपणाची आहे. आपण ज्या फांदीवर बसलों आहों तीच फांदी कापण्यासारखा हा मूर्खपणा आहे."

ॲबरनॉन यानें उल्लेखिलेल्या संस्था याच फॅसीझम्‌चें बीजारोपण करीत होत्या. त्या लोकशाही व प्रजाराज्य यांना विरोध करणाऱ्या असून संयुक्तावर सूड घेण्यासाठीं युद्ध करावें असें प्रतिपादीत. व्हर्सायच्या तहाचा भंग करून या संस्थांनीं

शस्त्रग्रहण केलें व लष्करी कवाईत सुरू केली. पण कम्युनिझमूला मारण्यास आज ना उद्यां या संस्था उपयोगी पडतील एवढ्याच भावनेनें संयुक्तांनीं त्याची गय चालविली. जर्मन कॉंझर्वेटिव्ह व प्रतिगामी वर्ग या संस्थाना सर्व साहाय्य करीत. हिटलरची ब्राउनशर्ट स्वयंसेवकाची चळवळ यातूनच पुढें फोफावली. पण बोल्शेव्हिझमूचा नाश होण्याचा संभव दिसला तर लोकशाहीचा नाश करण्याच्या प्रतिज्ञा केलेल्या संस्था सुद्धा भांडवलवाराना चांगल्या वाटत. इटालीत युद्धानंतर कामगाराचे संप झाले व तेथें कम्युनिस्ट क्रांति होण्याची भीति उत्पन्न झाली. तेव्हा लोकशाही व कम्युनिझम् या दोहोंचाहि शत्रु असा मुसोलिनी इटालीयन राजाच्या संमतीनें हुकुमशहा झाला. त्यानें लोकशाही बुडविली व कम्युनिस्ट चळवळ नेस्तनाबूद केली. त्याच्या या कर्तृत्वाच्या गौरवासाठीं चर्चिलनें १९२७ सालीं रोम रेडिओवर एक भाषण केले ते खरोखरच मासलेवाईक आहे. त्यावेळीं चर्चिल ब्रिटनचा फडणीस होता. मुसोलिनी व चर्चिल या दोघाचे पुढें जें आयुष्य झालेलें जगानें पाहिलें आहे त्या आयुष्याची पार्श्वभूमि या दृष्टीनें हे भाषण चर्चिलच्या विचारसरणीवर चांगलाच प्रकाश पाडतें. चर्चिल म्हणतो,

"मी जर इटालीयन असतों तर मी आरंभापासून अखेरपर्यंत मुसोलिनीच्या बाजूस राहिलों असतों. कारण मुसोलिनीनें लेनिनिझमूच्या पाशवी क्रौर्याविरुद्ध झगडा केला व यश मिळविले आहे. फॅसीझमूचे आंतरराष्ट्रीय परिणाम पाहता फॅसिस्ट चळवळीनें साऱ्या जगाची सेवा केली आहे हें कबूल केलेंच पाहिजे. लोकशाहीचे पुढारी अथवा कामगारपुढारी याना आजवर एका भीतीनें नेहमी पछाडलेलें असे. आपल्यापेक्षा अधिक जहाल जे असतील ते आपला पाडाव करतील अथवा आपल्यापुढें घोडदौड मारतील ही ती भीति होय. पण इटालीनें हें सिद्ध केले आहे कीं लोकाना योग्य नेतृत्व दिल्यास सुसंस्कृत समाजव्यवस्थेचा स्वाभिमान व स्थैर्य यांचें श्रेष्ठ मूल्य लोक ओळखूं लागतात, त्यांचें रक्षण करण्याची इच्छा बाळगतात आणि मग विध्वंसक शक्तीशीं लढण्याला तयार होतात. रशियन विषावर खरोखर इटालीनें हा उताराच दिला आहे. यापुढें बोल्शेव्हिझमूचें कॅन्सर वाढण्याविरुद्ध निर्वाणीचा इलाज नाहीं असें कोणत्याही मोठ्या राष्ट्राला म्हणावें लागणार नाहीं."

मुसोलिनीच्या याच फॅसीझमूमधून पुढें जर्मनीचा नात्सीवाद फोफावला. त्यानें अखेर इंग्लंडला युद्धास आव्हान दिलें आणि इंग्लंडला आपलें जिणे

रक्षिण्यासाठीं हिटलर व मुसोलिनी यांची खांडोळी झालेली पाहावी लागली. फॅसीझमच्या ज्या आतरराष्ट्रीय यशाचा चर्चिलनें गौरव केला त्याचा नाश स्वतांच्या रक्षणासाठीं करणे चर्चिलला पुढे १७ वर्षांनीं भाग पडलें व त्यासाठीं बोल्शेव्हिकांचीं त्यास आर्जवें करावीं लागलीं.

या ठिकाणीं एक गोष्ट पुनः पुनः ध्यानांत ठेवली पाहिजे कीं युरोपांतील लोकशाहीवादी व समाजवादी पक्ष चर्चिलप्रमाणे फॅसीझमला कधींच अनुकूल झाले नाहींत. तरी पण ते कम्युनिस्टांच्या 'टोटॅलिटेरिअन' पद्धतीसहि नेहमीं विरुद्ध होते. रशियन कम्युनिस्ट हे क्रूर, हुकुमशाहीचे पुरस्कर्ते व लोकशाही आणि शांततावाद यांचे कट्टे वैरी आहेत असा दृढ समज युरोपीय सोशॅलिस्टांचा होता. युरोपांतील कम्युनिस्टहि हट्टी, क्रूर, दहशतवादी, विध्वंसक व नेहमीं गुप्त कट करणारे असल्यामुळें कम्युनिस्ट चळवळ कोठेंहि अशीच असली पाहिजे असा युरोपीअन सोशॅलिस्टांचा दृढ समज झाला होता. महायुद्धानंतर युरोपांतील बहुतेक राष्ट्रांत पार्लमेंटरी पद्धतीचे भलेबुरे देखावे उत्पन्न झाले. तेव्हां जमिनदारी व भांडवलदारी पद्धतीचा नाश करण्यासाठीं कम्युनिस्ट पद्धतीची हुकुमशाही न स्वीकारता पार्लमेंटरी लोकशाही पद्धतीनेंच आपण ही क्रांति करूं अशी आशा युरोपीय पक्षांनीं बाळगली.

युरोपातील हे पक्ष व सामान्य जनता बोल्शेव्हिक रशियाबद्दल सहानुभूति बाळगीत. अँग्लो-फ्रेंच सोशॅलिस्ट व त्या राष्ट्रांतील जनता रशियाशीं लढण्याला नेहमींच प्रतिकूल राहिली. पुढें जर्मनी व इटाली येथील जनतेला बोल्शेव्हिकां-विरुद्ध दीर्घ प्रचार करून प्रक्षुब्ध करण्यांत आलें व तिला साम्राज्याची लालूच लावण्यांत आली, म्हणून त्या देशांतील जनता कम्युनिस्ट रशियाविरुद्ध लढण्यास सिद्ध झाली. अँग्लो-फ्रेंच राष्ट्रांतील सामान्य जनता रशियाबद्दल सहानुभूति बाळगे, तरी त्या राष्ट्रांतील भांडवलदारी राज्यकर्ते रशियाचे कट्टे शत्रु होते. त्यांचाच प्रतिनिधि चर्चिल फॅसीझम् व बोल्शेव्हिझम् यांबद्दल कसें बोलतो हें वर दिलेंच आहे.

या अँग्लो-फ्रेंच व अमेरिकन भाडवलदारांनीं युरोपांतील प्रतीगामी शक्तींना साहाय्य केलें व युरोपांत कम्युनिस्ट क्रांतीला डोकें वर काढूं दिलें नाहीं.

## राष्ट्रसंघ अस्तित्वांत आला

पहिल्या महायुद्धानंतर जन्मास आलेली एक महत्त्वाची घटना राष्ट्रसंघ ही

होय. आंतरराष्ट्रीय युद्धें टाळणें व राष्ट्राराष्ट्रांचे झगडे सामोपचारानें मिटविणें हें या संघटनेचें उद्दिष्ट होतें. पहिल्या महायुद्धापूर्वीपासूनच राष्ट्रसंघासारख्या आंतरराष्ट्रीय संघटनेचा प्रचार झाला होता. पहिल्या महायुद्धापूर्वीचा ब्रिटिश परराष्ट्रमंत्री सर एडवर्ड ग्रे हा युद्ध टाळलें पाहिजे अशा मताचा असून त्यासाठीं बड्या राष्ट्रांचें एक कायमचें कौन्सिल असावें अशी सूचना त्यानें युद्धापूर्वी केली होती. इंग्लंडचें परराष्ट्रधोरण म्हणजे कोणत्याही राष्ट्रास फार बली होऊं द्यायचें नाहीं, बली राष्ट्राविरुद्ध दुर्बलास पाठिंबा द्यायचा आणि राष्ट्राराष्ट्रांचा ताजवा समतोल राखायचा ( बॅलन्स ऑफ पॉवर ) असें होतें. पण याचा परिणाम असा झाला कीं फ्रान्स व जर्मनी या दोघांचा समतोल संभाळण्याच्या प्रयत्नांत जर्मनीचें पारडें फार जड झाले आणि जर्मनी हा आरमार वाढविण्याबाबत इंग्लंडशींच स्पर्धा करू लागला. यामुळे जर्मनीशीं युद्ध अपरिहार्य आहे असें वाटून ग्रेला सत्तासमतोलाचें धोरण हेंच अखेर युद्ध आणतें अशी खात्री वाटूं लागली. म्हणून आंतरराष्ट्रीय स्पर्धा मोडून बड्या राष्ट्रांचें एकोप्याचें एकादे कौन्सिल असावें, त्यानें विचारविनिमयानें राष्ट्राराष्ट्रांचे तंटे तोडावे व युद्ध टाळण्याचा प्रयत्न करावा असें ग्रेला वाटले. पण युद्ध लवकरच सुरू झाल्यानें ही कल्पना मूर्तरूप पावली नाहीं.

युद्ध चालू असतां १९१५ सालीं ॲस्क्विथनें एक भाषण करून राष्ट्रसंघाची कल्पना मांडली. बुद्धिजीवी वर्गातील डाव्या गटाचे लोक आधींपासूनच युद्ध टाळण्यासाठीं जागतिक सरकार स्थापण्याच्या कल्पनेचा पुरस्कार करीत होते. त्यांनीं ‘ यूनिअन ऑफ् डेमोक्रॅटिक कंट्रोल ऑफ् फॉरिन अफेअर्स ’ ‘ फेबिअन सोसायटी ’ ‘ लीग ऑफ् नेशन्स सोसायटी ’ वगैरे संस्था इंग्लंडांत स्थापल्या असून युरोपीयांचा पाठिंबा त्या कार्याला मिळविण्याची खटपट ते करीत असत. कोणत्याहि देशांत लोकशाहीप्रधान सरकार असलें तरी फक्त अंतर्गत कारभारापुरतें राज्यसंस्थेवर लोकशाहीचें नियंत्रण चाले. परराष्ट्रीय संबंध गुप्तच असले पाहिजेत असें मानलें जाई व त्यामुळे ही कंपूशाही तेथें चाले. आणि धनिक साम्राज्यवादी गटाच्या साम्राज्यलोभासाठीं राष्ट्रांना युद्धाच्या जाळ्यांत खेचलें जातें असा संशय डाव्या गटाच्या पुढाऱ्यांना येई. याच ब्रिटिश साम्राज्यवाद्यांनीं नेपोलिअनपूर्वीपासून सत्तासमतोलाचें राजकारण युरोपांत अवलंबिलें आणि त्याचा परिणाम राष्ट्राराष्ट्रांच्या चढाओढींत होऊन जर्मनीनें इंग्लंडशींच

शस्त्रास्त्रस्पर्धा सुरू केली व १९१४ चें महायुद्ध उद्भवलें. अशीं युद्धे टाळायचीं असतील तर प्रत्येक देशाच्या परराष्ट्रीय राजकारणावर लोकशाहीचें नियंत्रण असावे आणि राष्ट्राराष्ट्रांचे तंटे विचारविनिमयाने व सामोपचारानें सोडवावे यासाठीं डाव्या गटाचे तरुण खटपट करीत असत.

१९१४–१८ च्या महायुद्धाने युद्धे टाळण्यासाठीं आंतरराष्ट्रीय संघटना हवी ही विचारसरणी बळावत गेली. निरनिराळ्या देशांतील प्रमुख मुत्सद्यानीहि ती कल्पना उचलून धरली. अमेरिकेचा ध्येयवादी अध्यक्ष विल्सन यानें आंतरराष्ट्रीय संघटना स्थापण्याचे कामीं पुढाकार घेतला आणि १९१४–१८ च्या महायुद्धाचे शेवटीं 'लीग ऑफ् नेशन्स' ऊर्फ राष्ट्रसंघ ही संस्था स्थापन झाली. सत्तासमतोलाचे म्हणजेच आंतरराष्ट्रीय चढाओढीचें परराष्ट्रधोरण थांबवावे आणि आंतरराष्ट्रीय स्नेहसंबंध वाढवून सामुदायिक सुरक्षिततेचें धोरण अवलंबावे हा या राष्ट्रसंघाचा उद्देश होता. विल्सन याने राष्ट्रसंघ स्थापण्याच्या प्रयत्नांत पुढाकारहि घेतला. पण युद्धानंतर अमेरिकेत झालेल्या अध्यक्षीय निवडणुकींत विल्सनचा पराभव झाला आणि अमेरिकेनें युरोपीयन राजकारणांतून अंग काढून घेतलें. यामुळें राष्ट्रसंघ इंग्लंड व फ्रान्स यांच्या हातचें खेळणें बनला. सर्व राष्ट्रांच्या संघटनेची कल्पना मागें पडली. जर्मनी पराभूत म्हणून व रशिया कम्युनिष्ट म्हणून त्या दोन राष्ट्रांना राष्ट्रसंघातून वगळण्यात आलें. पण राष्ट्रसंघातहि इंग्लंड व फ्रान्स यांची स्पर्धा चालूच राहिली. यामुळे युद्धें कायमचीं थांबविण्याचे साधन म्हणून संकल्पिलेला जो राष्ट्रसंघ त्यातच भावी महायुद्धाची पेरणी होऊं लागली. दोन महायुद्धाच्या दरम्यानच्या काळात युद्धे थांबविण्याचे प्रयत्न चालू असताच राष्ट्राराष्ट्रांची स्पर्धा पूर्वीहून अधिक निकरानें चालू राहिली व दुसरें महायुद्ध अपरिहार्य झाले.

पहिल्या महायुद्धानंतर युरोपांत कम्युनिस्ट क्रांति करण्याचे प्रयत्न रशियाने व ती क्रांति हाणून पाडण्याचे प्रयत्न अँग्लो-फ्रेंच-अमेरिकनांनीं केले. त्यात रशियाला अपयश आणि अँग्लो-फ्रेंच-अमेरिकनांना यश आलें. यामुळें युद्ध अथवा समाजक्रांति हे दोन्ही संभव टळल्यासारखे होऊन रशियाला राष्ट्रसंघात घ्यावें असा विचार ब्रिटिश मुत्सद्यांना सुचूं लागला.

१९२२ सालीं जिनोवा येथे भरलेल्या आंतरराष्ट्रीय परिषदेचे वेळीं ब्रिटिश पंतप्रधान लॉइड जॉर्ज याने रशिया राष्ट्रसंघात यावा म्हणून रशियाचा परराष्ट्रमंत्री

चिचेरिन याजवळ गोष्ट काढली. पण चिचेरिनने राष्ट्रसंघाची घटना बद्दलण्या-सारख्या अटी घातल्या व ती योजना फिस्कटली. तेव्हा अँग्लोफ्रेंचाना मुत्सद्दीगिरीचा टोला देण्यासाठीं रशियाने जर्मनीशीं रापालो येथें अनाक्रमणाचा करार करून व्यापाराच्या सवलतींचाहि करार केला. त्यावर रशियाला प्रति-टोला देण्यासाठीं अॅग्लोफ्रेंचानी लोकार्नो येथे जर्मनीशी असाच करार केला. याप्रमाणें राष्ट्रसंघाच्या स्थापनेनतरहि सत्तासमतोलाचें राजकारण चालूच राहिलें. इंग्लंड, फ्रान्स व जर्मनी याची एकजूट करून रशियास व कम्युनिझमला टोला देणें हा लोकार्नो कराराचा हेतु होताच. त्याचबरोबर फ्रान्स व जर्मनी या दोघाशीं स्नेहभाव दाखवून त्या दोघात स्पर्धा लावणें हाहि लोकार्नो कराराचा हेतु होता.

इकडे युरोपांतील कम्युनिस्ट क्रांति फसल्यामुळें रशियात विचारपालट सुरू झाला. ट्रॉट्स्की व स्टालिन यामधील मतभेद या मुद्यावरच अधिकाअधिक तीव्र होत गेले. "जागतिक कम्युनिस्ट क्रातीला आता यश येणार नाहीं आणि उलट भाडवलदार राष्ट्रें रशियांतील कम्युनिस्ट क्रातीला चिरडूहि शकणार नाहींत तेव्हां रशियानें बाहेरच्या जगाशीं 'नादा आणि नादू द्या' असे धोरण अवलंबावें" असें स्टालिनचें म्हणणें होतें. ट्रॉट्स्कीला जागतिक कम्युनिस्ट क्रातीचा नाद सोडवेना. हा मतभेद जसजसा वाढत गेला तसतशी स्टालिनची सरशी होऊन त्याचा गट रशियात सत्ताधीश झाला आणि ट्रॉट्स्की सर्व राजकीय सत्ताक्षेत्रांतून हाकालला जाऊन अखेर त्यास देशत्याग करावा लागला. रशियाच्या उत्कर्षासाठीं भाडवलदार राष्ट्रांना मोठमोठ्या सवलती काहीं काल देऊन त्याची मदत मिळवावी असा स्टालिनचा मनोदय होता. उलट रशियांत नफेबाजी-साठी पैसे गुंतविण्यास पाश्चात्य भाडवलदार राजी होतेच. पण त्याचबरोबर व्यापारधंद्याच्या निमित्ताने रशियांत हस्तक्षेप करता आल्यास तेथील कम्युनिस्ट समाजघटनेचीहि मोडतोड करावी असें धोरण हे भाडवलदार योजीत होते. आपण रशियाशीं कोणत्या अटींवर सहकार्य करू यासंबंधानें कांहीं प्रमुख ब्रिटिश बँकवाल्यांनीं ब्रिटिश पंतप्रधानाला उद्देशून १९२४ च्या एप्रिलात 'टाइम्स' मध्यें एक पत्र प्रसिद्ध केलें. त्यात ते म्हणतात,

"रशियात जर आम्हीं भाडवल गुंतवायचें तर तेथें विदेशी बँकवाल्यांना, व्यापाऱ्याना, धंदेवाल्याना पूर्ण व्यवहारस्वातंत्र्य असावे. रशियन सरकारने

त्याच्या कारभारात हस्तक्षेप करू नये. इतकेच नव्हे तर रशियांतील बँकवाले, व्यापारी व धदेवाले यांच्या खाजगी मालकीच्या संस्था तेथे असाव्या, त्यावर रशियन सरकारची हस्तक्षेपात्मक सत्ता नसावी. तसेंच ज्यांची ब्रिटिश भांडवलदाराना खास माहिती आहे व ज्याच्या प्रामाणिकपणाबद्दल ब्रिटिश भांडवलदाराना खात्री आहे अशा रशियन बँकवाल्याशीं, व्यापाऱ्याशीं व धंदेवाल्याशींच ब्रिटिश भांडवलदार व्यवहार करतील."

सारांश, रशियातील कम्युनिस्ट क्रांति बरबाद करून तेथे खाजगी भांडवलशाही परत आणावी इतकेंच नव्हे तर रशियातल जे भांडवलदार ब्रिटिश भांडवलदाराच्या तंत्राने वागतील त्याच्याशींच ब्रिटिश भांडवलदार व्यवहार करतील असे ब्रिटिश भांडवलदार सूचित करीत होते.

पण पुढेंपुढें हा हटवाद कमी होत गेला. फार नाहीं तरी थोडी मदत पाश्चिमात्य भांडवलदारानी नफ्याच्या हेतूनें रशियाला दिलीच. विशेषतः भांडवलदाराच्या आपसांतील स्पर्धेचा रशियाला फार फायदा झाला. जर्मनीला युद्धानंतर भराभर पुनर्घटना करायची होती, व रशियाचा बाजार हवा होता. यामुळें रशियन पुनर्घटनेची काहीं सामुग्री रशियाने धान्याच्या मोबदला जर्मनीकडून घेतली आणि जर्मनीशीं बाजाराबाबत स्पर्धा करण्यासाठी अँग्लोअमेरिकनानींहि काहीं सामुग्री रशियाला पाठविली. पण एकंदरीनें रशियाला परदेशी मदत फार थोडी मिळाली, व पुनर्घटनेचें बहुतेक कार्य बाहेरच्या मदतीवाचून तडीस न्यावें लागलें.

पहिलें महायुद्ध संपतांच युरोपात कम्युनिस्ट क्रांति होऊं न देण्याचा प्रयत्न जसा अँग्लोफ्रेन्चांनी केला तसा, त्याहीपेक्षां अधिक निकरानें भांडवलशाही उद्योगधंद्याचा युद्धांत झालेला विध्वंस भरून काढण्यासाठीं धंद्याची पुनर्घटना व वाढ करणें हा प्रयत्न त्यांनीं केला. पण असा प्रयत्न करतांना कांहीं नवा दृष्टिकोन, नवें धोरण स्वीकारलें पाहिजे हें या भांडवलदारांच्या गावींहि नव्हतें. १९१४ सालीं, युद्ध सुरू होण्यापूर्वीं भांडवलशाही धंद्यांची जी प्रगति झाली होती व जी युद्धामुळें थांबून पुष्कळशी उध्वस्त झाली ती परत १९१४ च्या पातळीपर्यंत वाढवायची आणि तशीच पुढें चालू ठेवायची एवढेंच भांडवलदाराना माहित होतें. त्याचा परिणाम असा झाला कीं १९२९ साली अमेरिकेंत अकस्मात मंदीची लाट येऊन शेअरबाजार कोसळले आणि ती लाट युरोपातहि पसरून मोठमोठ्या धंद्याची व बँकाची युरोपअमेरिकेंत दिवाळीं निघालीं. यामुळे भांडवल-

शाही व्यवसायात काही तरी मूलग्राही दोष उत्पन्न झाला आहे ही गोष्ट भांडवलदारी अर्थशास्त्रज्ञाच्या लक्षात येऊ लागली. सर आर्थर सॉल्टर ' आतरराष्ट्रीय व्यापाराचे भवितव्य काय ' याची चर्चा करताना लिहितो,

" १९१९ साली आपल्या उद्योगधंद्यांची केवळ जुन्या पायावर उभारणी न करता जुना पायाच आपण व्यापक केला पाहिजे. ही गोष्ट आमच्या लक्षात आली नाही. १९१९ साली १९१३ सालाकडे आम्हीं मागे वळून पाहिले तेव्हा १९१३ सालच्या वैभवाचा आम्हास मोह पडला, ते नंदनवन महायुद्धात आपण उध्वस्त करून घेतले याबद्दल आम्हास खेद झाला, ते नंदनवन परत उभारणें यातच आम्हा सर्वांस कृतकृत्यता वाटली, पण जुना पाया रुन्द करण्याचे कोणासच सुचले नाही. महायुद्धानतर दुःखिताना साहाय्य देणे आणि मोडतोडीची डागडुजी करणे ही कामे जुन्याच पायावर सुरू झाली. राष्ट्रसंघाची स्थापना ही अगदी नवी कल्पना होती. पण ही आतरराष्ट्रीय सघटना उभारताना राष्ट्रांची अंतर्गत सार्वभौम सत्ता तसूभरहि कमी होऊ द्यायची नाहीं आणि युद्धामुळें खाजगी मालमत्तेवर जे निर्बंध लादले गेले होते ते सर्व रद्द करून खाजगी मालकशाहीला पूर्ण वाव राहूं द्यायचा ही भूमिका पत्करण्यात आली. पहिल्याने या भूमिकेस भराभर यश येत गेलें. पण नतर अकस्मात् शेअरबाजारात कडा कोसळला आणि त्याखाली आर्थिक व राजकीय सघटनाहि चिरडल्या गेल्या. युद्धानतर दहा वर्षेंपर्यंत पुनरुद्धाराचें जें विधायक कार्य झालें त्या साऱ्याचा चुराडा झाला. या सर्वांगीण विध्वंसाचें जे मध्यवर्ती असें कारण होतें तें हें कीं जुनीच आर्थिक सघटना उभारण्याचा हा नवीन प्रयत्न होता. नव्या परिस्थितींत ही जुनी सघटना टिकणें शक्यच नव्हते. नव्या शक्तींना नियत्रण घालण्यास जुन्या सघटनेला शक्ति नव्हती हें आम्हास उमगलें नाहीं."

पण हें सत्य १९२९ ची मंदीची लाट येण्यापूर्वी जसें भांडवलदाराना उमगलें नाहीं तसेंच ती मदीची लाट येऊन जाऊन पडझड झाल्यावरहि उमगलें नाहीं. किंवा जें उमगले ते अगदी विपरीतच उमगलें. व्यक्तिस्वातंत्र्य, लोकशाही आणि सौम्य स्वरूपाची आर्थिक चढाओढ हें १९१४ पूर्वीच्या भांडवलशाहीचे वैशिष्ट्य होते. पण १९२९च्या आर्थिक कोलाहलानें भांडवलशाहीचें हें जुनें रूप बदललें आणि ती अधिक उग्र झाली. लहान भांडवलदारा-

नली चढाओढ निकराची होऊन अधिकाधिक बलवानांनीं लहानांना खाऊन टाकले. अनेक कंपन्यांचे गट बनून राष्ट्रीय व आतरराष्ट्रीय आर्थिक सामर्थ्य थोडथोड्या लोकांच्या हातीं आले. महायुद्धानंतर हा क्रम सुरु झालाच होता. त्यातच १९२९ ची मंदी आली. मंदीनंतर हाच संपत्तीच्या केन्द्रीकरणाचा प्रकार अधिक वाढू लागला याच आर्थिक सत्ताधाऱ्याच्या पायाशीं राजकीय सत्ताहि लोळण घेऊ लागल्या. भांडवलदाराच्या महत्त्वाकांक्षा वाढत जाऊन राज्य-सत्तेची सूत्रे ते चालवू लागले, त्या राजसत्तेचा उपयोग आपल्या नफेबाजीस भरभराट आणण्यासाठीं ते करू लागले.

अशा कामीं जनतेचें सहकार्य लागते व जनतेला त्यासाठी उत्साहित करण्यास आकर्षक पुढारी व आकर्षक तत्त्वे लागत असतात इटाली व जर्मनी या देशात मुसोलिनी व हिटलर हे दोन पुढारी भांडवलदाराच्या हातचे खेळणे होऊन राष्ट्रवादाच्या नावानं नाचू लागले. दोघांनीहि राष्ट्रीय एकजुटीच्या नावावर लोकशाही व कामगारसंघटना यांस जलसमाधि दिली आणि लोकांच्या तोंडास साम्राज्यलोभाचें मधाचें बोट लावले. या एकंदर शिकवणीस इटालींत फॅसिझम व जर्मनींत नात्सीझम हे नाव होतं. पण दोहोंचा अर्थ एकच होता. बोल्शेविहिझमचा व व्यक्तिनिष्ठ लोकशाहीचा द्वेष करणें हे या दोन्ही वादाचें वैशिष्ट्य होतं. यातील बोल्शेविह-झमचा द्वेष हा पाश्चात्य भांडवलदाराना फार आवडला. चर्चिल फॅसिझम-बद्दल कसा हुरळून गेला होता हे मागे त्याचे एक भाषण दिले आहे त्यावरून कळून येईल. १९३३ त हिटलर जर्मनींत अधिकारावर आला व जर्मनींतील लोकशाही बुडवून त्यानें जर्मनी एकजूट केला.

## हिटलर हा भांडवलशाहीला आदर्श वाटला.

याचा एकंदर युरोपवर इतका विलक्षण परिणाम झाला कीं राष्ट्रीय बलवर्धन व एकीकरण याचा हिटलर हा आदर्श ठरला. इग्लंडात १९३१त जें ‘ राष्ट्रीय ’ सरकार मॅक्डोनाल्डच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालें त्याचा गौरव करताना पुढें १९३३च्या ऑक्टोबरात मॅक्डोनाल्ड, सायमन व बाल्डविन यांनीं “ आम्हीही हिटलर व मुसोलिनी यांचेप्रमाणें राष्ट्र एकजूट करीत आहों, पण ती गोष्ट आमच्या पद्धतीनें करीत आहों ” असे म्हणून आपली आपण पाठ थोपटून घेतली. या ‘राष्ट्रीय एकजुटीं’त ब्रिटिश मजूरपक्ष मुळींच नव्हता.

कारण मॅक्डोनाल्डला मजूर पक्षाने पक्षातून हाकून लावलें होतें. भांडवल-दाराची एकजूट, कामगारसंघटना अथवा सरकारविरोधी पक्ष याचा अभाव, कम्युनिझमला विरोध आणि साम्राज्यलोभासाठीं शस्त्रास्त्रवाढ ही फॅसीझमची वैशिष्टये होतीं. इंग्लंडात लोकशाही कित्येक शतकें बलवान होत आलेली असल्याने हीं वैशिष्टये तेथें यशस्वी होऊ शकली नाहीत. पण इटाली व जर्मनी येथे त्याना शंभर टक्के यश आले.

ब्रिटिश सरकारला जर्मनी आणि इटाली येथे नात्सीवाद व फॅसीवाद बलवान झाला याबद्दल आनंद वाटत होता. पण त्या दोघांचाहि ब्रिटिशाच्या वासाहतिक साम्राज्यावर डोळा आहे ही गोष्ट ब्रिटिश सरकार दृष्टीआड करू शकत नव्हते. म्हणून आपल्या साम्राज्यावरील संभाव्य संकट टाळण्यासाठी ब्रिटिशानीहि शस्त्रास्त्रवाढ सुरू केली. पण जर्मनी व इटली येथे जितक्या उघडपणे ही शस्त्रास्त्रवाढ होत होती तितक्या उघडपणे इंग्लंडला ती करता येईना. ब्रिटिश जनता शस्त्रास्त्रवाढविरोधी होती. १९३२ सालीं जी निःशस्त्रीकरण परिषद सुरू झाली तिचा अध्यक्ष हेंडर्सन हा ब्रिटिश मजूर पुढारी होता. आणि इंग्लंडात सरकारने व जनतेने त्या निःशस्त्रीकरण-परिषदेबद्दल बराच उत्साह दाखविला होता. पण त्या पूर्वीपासून इंग्लंड गुप्तपणे शस्त्रास्त्रवाढ करीत होतें ही गोष्ट १९३६ साली नोव्हेंबरात त्यावेळचा पंतप्रधान बाल्डविन यानें जाहीरपणे सांगितली. बाल्डविन म्हणाला,

“ आम्ही गुप्तपणे शस्त्रास्त्रवाढ करीत होतों हे खरेंच आहे. पण मी तरी काय करणार ? समजा, मी देशात लोकापुढें गेलो असतो आणि ‘ जर्मनी शस्त्रास्त्रवाढ करीत आहे म्हणून आम्हींहि केली पाहिजे ’ असें लोकाना प्रांजळपणे सांगितले असते तर आमची शांततावादी व लोकशाहीप्रेमी जनता त्या भूमिकेस अनुकूल झाली असती असें कोणीतरी सांगू शकेल काय ? तसें मी स्पष्टपणें बोललो असतो तर १९३१ची निवडणूक आम्ही खात्रीने हरलो असतो. पोटनिवडणुकींत शांततावादी उमेदवारच निवडून येत आणि वर्तमानपत्रांतून शांततावादाचाच नेहमी पुरस्कार होत असे हे मी नेहमीं पहात होतो. मग शस्त्रास्त्रवाढीचा उघड पुरस्कार मला कसा करता आला असता ? ”

जर्मनीच्या शस्त्रास्त्रवाढीस प्रतिकार म्हणून ब्रिटन शस्त्रास्त्रवाढ करीत होतें असें बाल्डविन येथें सांगत असून तें एका दृष्टीने योग्यहि वाटतें. कारण जर्मनी

हा उत्तर समुद्रात ब्रिटनला फार मोठा प्रतिस्पर्धी झाला होता व त्यानें फ्रान्सचा पराभव केला कीं इंग्लंडच्या साम्राज्यावर तो केव्हां उडी घेईल याचा काहींहि नेम नव्हता. पण जर्मनीची शस्त्रास्त्रवाढ ब्रिटनला नको होती काय ? नव्हे, ब्रिटनला ती हवी होती असेंच दिसते. कारण १९३३ साली फ्रान्स आणि पोलंड यानी " जर्मनी शस्त्रास्त्रे वाढवून व्हर्साय तह मोडत आहे " अशी फिर्याद राष्ट्रसंघापुढें मांडली. त्यावेळीं जर्मनी अजून अगदीं दुर्बल होता व राष्ट्रसंघानें तपासणी केली असती तर जर्मनीचें तहभंगाचें वर्तन सिद्ध होऊन त्याची शस्त्रास्त्र-वाढ थांबवितां आली असती. खुद्द जर्मनींत नात्सीवादास अनेक शत्रु होते आणि निशस्त्रीकरणास व कदाचित हिटलरच्या पाडावासहि त्यावेळीं पाठिंबा मिळाला असता. पण जर्मनीने शस्त्रास्त्रवाढ करावी या गोष्टीस ब्रिटनचा पाठिंबाच होता.

रशियन कम्युनिझमला युरोपांत थोपवून धरील आणि रशियावर चढाई करूनहि जाईल अशी शक्ति युरोपात निर्माण होणें इष्ट असून फक्त जर्मनी ते कर्तृत्व करण्यास समर्थ आहे असे ब्रिटिश मुत्सद्यांना वाटे. बाल्डविन हा पंतप्रधान असल्यानें इतक्या प्रांजळपणें बोलू शकत नसे. पण लॉइड जॉर्ज अधिकारावर नसल्याने उघड बोलू लागला. लॉइड जॉर्ज हा लिबरल होता व लिबरल पक्ष जर्मन शस्त्रास्त्रवाढीस विरोधी असे. पण आपल्या पक्षास उद्देशून लॉइडजॉर्ज १९३३ साली बारमथ येथे केलेल्या भाषणात म्हणतो,

" ब्रिटननें सावधपणें पाऊल टाकावें, कारण नाझी सत्तेचा पाडाव जर युरोपीय राष्ट्रें करूं शकलीं तर त्यांच्या हातीं जर्मनींत काय येईल ? तेथें कॉन्झर्वेटिव्ह, लिबरल अथवा सोशॅलिस्ट राज्य येईल असें तुम्हांस वाटते ? छे ! छे ! तेथें एकांतिक कम्युनिझमच येईल. खरोखर असें घडावें ही कोणाचीहि इच्छा असणार नाहीं. कम्युनिस्ट रशियापेक्षां कम्युनिस्ट जर्मनी हा अधिक बलवान व भयंकर ठरेल. कारण कम्युनिस्ट राज्य कसें चालवावें हें जर्मनांना अधिक चांगलें कळेल. "

१९३४ साली हिटलरशीं हस्तांदोलन करा असा उघड प्रचार लॉइड जॉर्जनें सुरू केला. तो सांगतो,

" लवकरच वर्षा दोन वर्षांत जर्मनीकडे, कम्युनिझमविरुद्ध उभारलेला बालेकिल्ला या नात्यानें येथले कॉन्झर्वेटिव्ह पाहूं लागतील. जर्मनीचें स्थान

निसर्गानेंच युरोपच्या मध्यभागीं ठेवले आहे. हा बालेकिल्ला जर कम्युनिझम्-पुढें ढासळला आणि जर्मनीलाच कम्युनिझमने घेरले तर सारा युरोप कम्युनिस्ट होईल. कारण कम्युनिझम्‌चा अंमल इतर कोणत्याहि राष्ट्रापेक्षा जर्मन्स अधिक चांगल्या प्रकारे करतील. दोन तीन वर्षांपूर्वी जर्मनींतला एक मुत्सद्दी मला म्हणाला, ' जर्मनींत नात्सीवाद आला तर त्याची मला फारशी भीति वाटत नाहीं. येथें कम्युनिझम् येणे हें मात्र फार भयंकर आहे. ' म्हणून मी म्हणतों कीं नात्सी जर्मनीच्या निषेध करण्याची घाई करूं नका. आपणाला जर्मनीचा गौरव करावा लागणार आहे. "

इंग्लडांतील कॉझर्वेटिव्हाना हे मत उघडपणे मान्य होते सर आर्थर बाल्फोर १९३३ साली म्हणतो,

" जर्मनीचा पराभव झाल्यानतर पराभवाच्या त्या परिस्थितींत काहींतरी भयकर घडामोड होणें अपरिहार्यच होते. तेथे कम्युनिझम तरी आला असता अथवा दुसरे काहीं आलेंच असते. हिटलरनें हिटलरवाद निर्माण केलेला आपण आज पाहात आहो. हिटलरवाद व कम्युनिझम या दोहोंत मला हिटलर-वादच योग्य वाटतो. खरोखर जर्मनी पुन्हा युद्ध करू शकेल. मला त्याबद्दल मुळीच शका नाहीं. पण त्याबाबत चमत्कारिक दिसणारी गोष्ट आहे ती अशी कीं आज जर्मनी निःशस्त्र आहे त्याऐवजीं त्याला सशस्त्र होऊ देणे आम्हाला भाग पडेल. इतकेच नव्हे तर एक दिवस आपल्याला जर्मनीस सशस्त्र बनवावें लागेल. रशिया सशस्त्र आहे, आणि पूर्वेकडे जपानचा धोका वाढला आहे, अशा परिस्थितींत जर्मनी निःशस्त्र राहणें म्हणजे झाडाचें पिकलें फळ अलगद तोडून घेण्यासारखें ते काम रशियाला सोपें आहे. अशा वेळी जर्मनीला स्वतःचा बचाव करता येणार नाहीं व मग आम्हाला जर्मनीच्या बचावासाठीं धावून जावें लागेल. खरोखर जर्मनी निःशस्त्र असण्यातच युरोपातील शाततेला फार मोठा धोका आहे."

जर्मनीनें वर्साय तह मोडून जाहीरपणे शस्त्रास्त्रवाढ कशी केली हें कळण्यास ब्रिटिश मुत्सद्याची वरील विचारसरणी फार उपयोगी आहे. पण हिटलरचीहि ब्रिटनला भीति वाटत होतीच. हिटलरप्रमाणें मुसोलिनी-चीहि ब्रिटिशांना भीति वाटे. त्याची सत्ता तर भूमध्यसमुद्रात म्हणजे ब्रिटनच्या साम्राज्यरस्त्यावरच बलवान होत होती. पण इटालींत कम्युनिझम्

होऊन तो आपल्या साम्राज्यरस्त्यावर आडवा येण्यापेक्षा हा फॅसीझम् बरा असे ब्रिटिशाना वाटे. शिवाय मुसोलिनीला हिटलरच्या जर्मनीची भीति वाटते हे ब्रिटन ओळखून होतें आणि म्हणून मुसोलिनीचा हिटलरविरुद्ध उपयोग करून घेण्याचें धोरण ब्रिटन योजीत असे.

हिटलरनें शस्त्रास्त्रवाढ आरंभली व जपानने मांचुरिया गिळला तरी राष्ट्रसंघातलीं राष्ट्रें हालचाल करीत नाहींत असे पाहून मुसोलिनीला आपणहि थोडेसे साम्राज्य बळकवावे अशी ईर्षा झाली व त्याने अबिसीनियावर १९३५ सालीं चढाई केली. ब्रिटनच्या साम्राज्य-मार्गावरच हे संकट आलें होतें. पण इंग्लंडने त्यावेळीं इटालीला प्रतिकार केला नाहीं. याचें कारण एकतर जर्मनीची मदत इटलीस होण्याचा धोका होता आणि फ्रान्स इटालीविरुद्ध युद्धात पडेलच अशी खात्री नव्हती. म्हणून मुसोलिनीला न दुखविता त्याला जर्मनीविरुद्ध वापरण्याचें ब्रिटिशानीं ठरविले. त्यावेळच्या ब्रिटिश परराष्ट्रकचेरींतील एक माहितगार अधिकारी मि. ई. एच्. कार यानें लिहून ठेवले आहे कीं,

" १९३५ च्या डिसेंबरात इटाली अबिसीनियात लष्करी पराभवाच्या संभवात सापडला होता; तेथे इटालीची नाचक्की होणे हें अंग्लोफ्रेंचाना धोक्याचें वाटले म्हणून त्यानीं होअरलावल करार करून निम्मा अबिसीनिया इटालीला देऊ केला. त्यामुळें ब्रिटिश लोकमत खवळलें आणि होअर-लावल करार रद्द होऊन होअरला राजीनामा द्यावा लागला, हा प्रकार वेगळा. पण राष्ट्र-संघात इटालीविरुद्ध अबिसीनियाची फिर्याद चालू असता इंग्लंड आणि फ्रान्स इटालीविरुद्ध कोणताहि इलाज करण्यास तयार नसत याचे कारण इटालीस अबिसिनियांत यश यावे असें त्याचें मत होते हें होय."

राष्ट्रसंघापुढें इटालीअबिसीनिया वादाचें प्रकरण आलें म्हणजे इटालीचा प्रतिनिधि बॅरन अलोइझी इंग्लंडफ्रान्सना म्हणत असे कीं,

"मुसोलिनीनें अबेसीनियात आपली सर्व इभ्रत पणाला लावली आहे, मुसोलिनीचा पराभव झाल्यास इटालींत फॅसीझमचा मोड होईल. मग इटालींत कम्युनिझम् झाला तर तुम्हाला चालेल का ?"

हा युक्तिवाद इंग्लंडफ्रान्सना बिनतोड वाटे व त्याचा इटालीस असलेला विरोध नरम पडत असे. १९३६ सालीं हिटलरनें ऑस्ट्रिया जर्मनीस जोडून

घेतला आणि इटालीच्या उत्तरेकडील ब्रेन्नर खिंडीशीं जर्मनीच्या तोफा येऊन उभ्या राहिल्या. त्या वेळेपासून मुसोलिनीची बढाई चालू राहिली तरी मुसोलिनी हा वस्तुतः हिटलरचा हस्तकच बनला. या दोघांनी पुढें स्पेनमधील सेनापति फ्रँको याला स्पॅनिश लोकराज्याविरुद्ध बंड करण्यास उत्तेजन देऊन त्यास सर्व प्रकारे साहाय्य केले. आता इटालीचा उपयोग जर्मनीविरुद्ध करणे ब्रिटनला शक्य नव्हतें, तेव्हा फ्रँकोला इटाली व जर्मनी यापासून फोडण्याचे प्रयत्न अँग्लोफ्रेंचांनी केले. इटाली व जर्मनी फ्रँकोला सर्व साहाय्य देत असता अँग्लोफ्रेंचानी तटस्थतेची सबब पुढें करून स्पॅनिश लोकराज्याला साहाय्य देण्याचे नाकारलें व फ्रँकोला उघड साहाय्य देणाऱ्या हिटलरमुसोलिनीविरुद्ध राष्ट्रसंघामार्फत इलाजहि केला नाही. स्पॅनिश लोकराज्य सरकारच्या बाजूस कम्युनिस्ट फार थोडे होते, तरीपण चर्चिलने लोकराज्याकडे कम्युनिस्ट फार आहेत असा उघड आरोप केला.

ब्रिटिश मुत्सद्यांना जेथे तेथे कम्युनिझमचें पिशाच्च दिसत होते. एफ. एल. ल्यूकास 'मँचेस्टर गार्डिअन'मध्यें लिहितो, "स्पेन असो अथवा अबिसीनिया असो, आमच्या धोरणाचा मूलभूत पाया 'कम्युनिझमची भीति' एवढाच आहे. बोल्शेव्हिजमचा लाल उंदीर आमच्या बँकांच्या तळघरात भोके पाडतो आहे अशी दिवास्वप्ने काहीं इंग्रजाना दिसतात. हिटलर शस्त्रास्त्रे वाढवो, आमच्या साम्राज्यरस्त्यावर येऊन सशस्त्र उभा राहो, वसाहती द्या असे आम्हाला दरडाओ, सर्व काही चालेल, तिकडे या लोकानीं कान, डोळे झाकून घेतले आहेत. फक्त आमच्या लाडक्या बँका या बोल्शेव्हिकापासून सुरक्षित राहोत एवढीच त्याना काळजी आहे. लाल बोल्शेव्हिकाच्या लुटारूपणापासून हिटलरच आपणांस वांचवील असें यांना वाटते. तो वांचवीलहि, पण मग स्वता दुप्पट लूट करील. ब्रिटनमधील या लोकाची ही कम्युनिझमविरोधी दुष्ट भावना नष्ट होईपर्यंत प्रगतीचें पाऊल मुळींच पडणार नाहीं."

हिटलर आणि मुसोलिनी याचे सबंधानें खुद्द ब्रिटिश कॉन्झर्वेटिव्ह पक्षातहि मतभेद होते. चर्चिल एडन वगैरेंना, हिटलर व मुसोलिनी याना फार बलवान बनूं देणें पसंत नव्हतें. कम्युनिझमविरुद्ध त्याचा उपयोग करून घ्यावा आणि ब्रिटिश साम्राज्यास मात्र त्याचे पासून धोका येऊं देऊं नये असे त्याचे धोरण असे. म्हणून हिटलर व मुसोलिनी यामधील दुही कायम ठेवावी आणि

ब्रिटनने आपलीं शस्त्रास्त्रें वाढवीत राहावे असे धोरण ते आंखीत. फ्रँकोला हिटलर व मुसोलिनी यापासून फोडून घेण्यांत शहाणपणा आहे असे त्यांना वाटे आणि हिटलर व मुसोलिनी याची मनधरणी करण्याला त्यांचा कट्टा विरोध असे. उलट चेंबर्लेन हा हिटलर व मुसोलिनी यांच्या भांडणावर विसंबणारा नव्हता. इंग्लंडने युद्धाची तयारी करण्यावरहि त्याचा विश्वास नव्हता.

असें दिसतें कीं जर्मनी व रशिया यांचें युद्ध अटळ असून ते जितके लवकर होईल तितके चेंबर्लेनला हवें होतें. अशा युद्धात निदान प्रथम तरी तटस्थ राहून ब्रिटिश साम्राज्याची घडी सावरावी असें चेंबर्लेनचें धोरण असावे. जपानने चीन गिळकृत केला याची चेंबर्लेनला भीति वाटण्याऐवजीं जपानला चीनमध्ये भांडवल लागेल व ते आपण देऊं असे मनोराज्य चेंबर्लेन रचीत होता. म्हणून चेंबर्लेनने मुसोलिनी व हिटलर याचेशीं स्नेह जोडण्याचे प्रयत्न केले. १९३७ च्या निवडणुकींत कॉंझर्वेटिव्ह पक्ष अधिकारावर आला व चेंबर्लेन मुख्य प्रधान झाला, तेव्हा मुसोलिनी व हिटलर या दोघानाहि इंग्लडात आपणाला अनुकूल असा पंतप्रधान अधिकारावर आला अशी खात्री झाली. मुसोलिनी हिटलरला भीत होताच, पण ब्रेन्नर खिंडीत इटलीच्या डोकीवर जर्मन तोफा डागलेल्या असतांना हिटलरविरुद्ध कुरकूर करणे त्यास शक्य नव्हते. यामुळें हिटलरला आपण त्याचा मित्र आहों असे भासवावे व त्याचें लक्ष दुसरीकडे वेधावे असें धोरण मुसोलिनी योजीत असे.

## म्यूनिच करार

अशा वेळीं, झेकोस्लोव्हाकियातील सुडेटन जर्मनांचा मुलूख व्हर्साय तहानें झेकोस्लोव्हाकियास जोडण्यात आला होता तो आपणांस परत मिळावा अशी हिटलरनें झेक सरकारकडे मागणी केली व झेक सरकार तयार न झाल्यास युद्धाची धमकी दिली. युद्ध झाल्यास तें पसरणार व सर्वांना त्यापासून धोका येणार अशी मुसोलिनी व चेंबर्लेन या दोघानाहि खात्री होती. झेकोस्लोव्हाकियावर जर्मन स्वारी झाल्यास फ्रान्सने झेकांना मदत करावी असा फ्रँकोझेक करार झालेला होता आणि फ्रान्सनें झेकोस्लोव्हाकियास साहाय्य केलें तर रशियानेहि साहाय्य करावें असा रूसो-झेक

करारहि झाला होता. हे दोन्ही करार ध्यानात घेऊन झेक सरकारने लढण्याचें ठरविलें व सैन्याची जमवाजमव सुरू केली. पण फ्रान्सने प्रथम कच खाल्ली आणि चेंबर्लेनने फ्रान्सच्या कच खाण्यास पाठिंबा दिला. तेव्हा फ्रेंच पंतप्रधान दलादिये याने झेक सरकारला 'आपल्या मदतीवर विसंबू नका' असे कळविलें. इंग्लडनें आपला मुत्सद्दी रन्सिमन यास झेकोस्लोव्हाकियात 'कणीक मऊ करण्यास' पाठविलें. झेकोस्लोव्हाकियाचा सुडेटन प्रांत जर्मनीस देऊन यावेळीं युद्ध टाळावे असा सल्ला लंडनच्या 'टाइम्स'नें दिला. आणि १९३८ च्या ३० सप्टेंबर रोजीं जर्मनींत म्युनिच येथे चेंबर्लेन, मुसोलिनी, दलादिये व हिटलर यांची बैठक भरून झेकांनीं सुडेटन मुलूख हिटलरला द्यावा असा खलिता तयार केला व तो झेक सरकारला पाठविला.

झेकांची संमति आगाऊ मिळविण्याचें सौजन्य दाखविण्याची या चौघांना गरज वाटली नाहीं. झेकांचा सुडेटन मुलूख हा झेक राष्ट्राचे संरक्षणाचे दृष्टीने फार महत्त्वाचा होता. तो जर्मनीला देण्याने झेक राष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट झाल्यासारखेंच झालें मुसोलिनी, चेंबर्लेन व दलादिये यानीं झेक डुकर हिट-लरच्या टेबलावर दाबून धरलें व हिटलरनें आरामशीरपणें त्यात आपली सुरी खुपसून त्यातलें काळीज काढून घेतलें, असा हा प्रकार झाला. पुढे सहा महि-न्याचे आतच हिटलरने झेकोस्लोव्हाकियाच्या मुलुखातून आरपार रस्ता मागून घेतला आणि झेकोस्लोव्हाकियाचें स्वातंत्र्य नाममात्रच शिल्लक राहिलें

या सर्व घटनांचा रशियावर भयंकर परिणाम झाला. १९३४ सालीं जर्मनी राष्ट्रसंघातून बाहेर पडला, त्याच साली राष्ट्रसंघात रशियाने प्रवेश केला होता. रशियाचा परराष्ट्रमंत्री मॅक्झिम लिटव्हिनॉफ् हा शांतिवादाचा पुरस्कर्ता असून फॅसीझमविरुद्ध सर्व राष्ट्रांनीं एकजूट करावी व जर्मनीला शस्त्रास्त्रे उतरविण्यास भाग पाडावें असे तो राष्ट्रसंघात प्रतिपादीत होता. इंग्लंडफ्रान्स-मधील राज्यकर्ते त्याचें ऐकत नव्हते तरी पण इंग्लंडफ्रान्समधील जनतेला लिटव्हिनॉफ्चें म्हणणे योग्य वाटत होतें व रशियाच्या धोरणास अँग्लोअमे-रिकन जनता अनुकूल होत होती.

याच वेळीं रशियातील हुकुमशाहीची कठोरता कमी करून देशात अधिक लोकशाही स्वातंत्र्य द्यावें असे मत लेनिनग्रॅडचा गव्हर्नर किरोव व प्रसिद्ध रशियन साहित्यिक मॅक्झिम गोर्की हे प्रतिपादू लागले. स्टालिनप्रभृति

सोव्हिअट पुढाऱ्याना हें मत पटू लागलें. १९३६ सालीं नवी ' लोकशाही-प्रधान ' घटनाहि अमलात आली. पण ट्रॉट्स्की संप्रदायाचे जे अतिजहाल पुढारी होते त्याना हे लोकशाहीकरण पसंत पडले नाहीं.

असें सांगतात की हे लोक जर्मन नात्सींचे साहाय्य घेऊन स्टॅलिनला उलथून पाडण्याचें कारस्थान रचीत होते. या कटवाल्यापैकीं कोणीतरी किरोव्हचा खून केला आणि अशा अनेक पुढाऱ्यांचे खून करण्याचा मोठा कट आहे व तो बराच खोलवर रचला गेला आहे हे उघडकीस आले. तेव्हा स्टॅलिन-गटाने लोकशाहीच्या साऱ्या योजना रद्द ठरविल्या. झिनोव्हिफ्, कॅमेनेव्ह, बुखारिन यासारख्या एके काळच्या क्रांतिकारक पुढाऱ्यावर कटाचे आरोप शाबीत होऊन त्याना मृत्यूच्या शिक्षा देण्यात आल्या. ॲंग्लो-फ्रेंच राष्ट्रें जर्मनी, इटाली व जपान याजपुढें शरणागतीचे धोरणानें वागून रशियाविरुध्द त्यांना चिथाऊ लागलीं. अखेर झेकोस्लोव्हाक प्रकरणानें ॲंग्लो-फ्रेंचांचें कारस्थान उघड झाले.

झेक सरकारला फ्रेंचांनीं मदत नाकारल्यावरहि रशियानें मदत देऊ केली. तेव्हा " तुम्ही रशियाच्या मदतीने जर्मनीशीं लढाल तर आम्ही जर्मनीला शस्त्रास्त्रें देऊन तुमच्याविरुद्ध लढण्यास मदत करूं " अशी इंग्लंड व फ्रान्स यांनीं झेकाना तंबी भरली. खुद्द झेकोस्लोव्हाकियातील जमीनदारानीं व भांडवलदारांनीं जर्मनीला शरण जाणेच योग्य असे मत दिले. तेव्हा झेकोस्लोव्हाकियाचा अध्यक्ष डॉ. बेनेस याने म्यूनिच करारावर सही केली. अशा प्रकारें सुडेटन मुलख मिळाल्याने व झेकोस्लोव्हाकिया जर्मनीच्या कह्यात आल्याने जर्मनीस धान्य, यंत्रसामुग्री, खाणी इत्यादींनीं संपन्न असा मुलख मिळून, रशियावर चाल करून जाण्यास उत्कृष्ट असा प्रदेश, सैन्य व रणसाहित्य जर्मनीच्या हातीं आलें.

म्युनिच कराराने ॲंग्लोफ्रेंचाचें रशियाविरोधी धोरण रशियाला कळून आलें. म्युनिचला जाण्यापूर्वी आपल्या धोरणाचें समर्थन करतांना चेंबर्लेन म्हणाला.

" झेकोस्लोव्हाकियानें रशियाचे साहाय्य घेऊन जर्मनीशीं लढण्यापेक्षां झेकोस्लोव्हाकियाचें बलिदान करणें हेंच योग्य. कारण झेकोस्लोव्हाकिया रशियाच्या मदतीनें जर्मनीशीं लढला व जर्मनीने झेक व रशिया या दोघांचाहि पराभव केला तर जर्मनी एवढा बलाढ्य होईल की तो सारीं वसाहतिक साम्राज्यें व पाश्चात्य राष्ट्रांचे सर्व हितसंबंध धोक्यात आणील आणि रशियाचा जर

विजय झाला तर अर्धा युरोप कम्युनिस्ट होईल व पश्चिम युरोपीय राष्ट्रांचे हितसंबंध धोक्यात येतील."

पण चेंबर्लेननें झेकोस्लोव्हाकियाचें बलिदान करण्याचें हें जें प्रांजळपणें कारण दिलें, त्यापेक्षा त्याचें खरें कारण अधिक खोल होतें. रूसो-जर्मन युद्ध झाल्यास कोणाचा विजय होईल याबद्दल त्याला अनिश्चितता नको होती. जर्मनीचा रशियाशीं लढण्याचा निर्धार चेंबर्लेनला माहित होता. झेकासारखे शूर लढवय्ये व झेकोस्लोव्हाकियाचे मोठमोठे कारखाने रशियाच्या साहाय्यास जावे हे चेंबर्लेनला नको होतें. रशियावर स्वारी करण्यास उत्कृष्ट रणयोग्य भूमि असें झेकोस्लोव्हाकियातील बोहेमियन पठार व रशियाकडे जाणारी शेकडो मैलाची उत्कृष्ट ऐतिहासिक सडक चेंबर्लेनने म्युनिच कराराने जवळ जवळ हिटलरच्या हवालीं केली व रूसोजर्मन युद्ध झाल्यास रशियाचा नक्की पराभव होईल अशी तजवीज त्याने करून ठेवली.

नंतर जर्मनी ब्रिटनला डोईजड होणार नाहीं याचीहि तजवीज चेंबर्लेन करीत होता. कारण १९३३ पासून इंग्लंडचें शस्त्रास्त्रवाढीचें धोरण अमलांत आलें होतें. रशिया आणि जर्मनी यांचें युद्ध झाल्यास आणि रशियाचा पराभव नक्की ठरल्यास जर्मनी रशियाशीं लढण्यात गुतला असता पाठीमागून जर्मनीवर हल्ला करण्याची व नतर पराभूत .रशियाचाहि समाचार घेण्याची तयारी चेंब-र्लेनची होतीच. दोन एडके टक्कर खेळूं लागून जेरीस आले म्हणजे दोघानाहि झोडपून काढूं असें चेंबर्लेनचे धोरण असल्याचे त्यावेळी ब्रिटिश वृत्तपत्रातन आलें होतें.

होअरलावल कराराच्या वेळीं अर्धा अबिसिनिया मुसोलिनीस देऊन टाकण्याच्या फ्रान्सच्या धोरणास होअरनें समति दिली. तेव्हां इटालिअन फॅसिस्टापुढें होअरनें लोटांगण घातलें असा आरोप करून ब्रिटिश जनतेनें होअरलावलकराराविरुद्ध ओरड केली व होअरला राजीनामा द्यावा लागला. पण म्युनिच करारावळीं ब्रिटिश पार्लमेंट जर्मनी व रशिया या दोघा-पुढेंहि घाबरलें आणि म्युनिच करारास समति देऊन जर्मनीस शरण गेलें असें दिसले. पुढें हळूहळू ब्रिटिश जनता व पार्लमेंट याना आपली चूक कळून आली. ब्रिटिश पार्लमेंट अस्वस्थ होऊं लागलें, जर्मनीपुढें पुन्हा पुन्हा फक्त शरणच जायचें कीं काय असा प्रश्न पार्लमेंटात सरकारला विचारण्यात येऊं

लागला. तेव्हा पोलंड व रुमानिया याजवर हल्ला झाला तर ब्रिटन त्याच्या रक्षणास जाईल अशी हमी चेंबर्लेननें १९३९च्या आरभीं जाहीरपणें दिली.

पण ही हमी देण्यातहि ब्रिटिशाचा प्रामाणिकपणा किती होता हे सागणें कठिण आहे. कारण पोलडला सरक्षण द्यायचें तर रशियाचें सहकार्य मिळविणें अवश्य होतें. पण रशियाशीं बोलणीं करण्यासाठी जबाबदार अधिकारी पाठविण्याचें ब्रिटननें टाळून निवळ कारकुनवजा माणसें बोलणीं करण्यासाठीं पाठविली. ब्रिटनला रशियाचें सहकार्य पोलडच्या रक्षणाचे कामीं घेण्याची इच्छाच नाही असें ब्रिटनच्या या वर्तनावरून रशियाचे मत झालें.

रशियापुढें प्रश्न बिनतोड होता. जर्मनीनें पोलंडवर स्वारी केली कीं रशियाला आपल्या बचावासाठीहि पोलंडच्या सरक्षणास धावून जाणें अवश्यच होतें. यामुळें ब्रिटनला रशियाचें सहकार्य मिळविण्याची जरूर नव्हती इतकेंच नव्हे तर रशिया पोलंडचे व रुमानियाचें रक्षण करणारच असल्यानें इंग्लंडला पोलंड व रुमानिया याच्या रक्षणास धावण्याची जरूरीहि पडणार नव्हती हें लक्षात घेऊनच चेंबर्लेननें पोलड व रुमानिया याच्या रक्षणाची हमी घेतली व ती केवळ ब्रिटिश पार्लमेंटाचें तोड बद करण्यापुरतीच घेतली हे रशियाच्या लक्षात आले. तेव्हा जर्मन हल्ल्यापासून आपला बचाव कसा करावा या विचारानें स्टालिन डोके खाजवू लागला.

---

## : ३ : दुसऱ्या महायुद्धकाळीं

त्या वेळीं स्टालिनला जी युक्ति सुचली आणि त्याने योजली तिनें जग चकित झाले व पाश्चिमात्य राष्ट्रे भयभीत झाली. रशियाने जर्मनीशीं १९३९च्या ऑगस्टच्या २४ तारखेस अनाक्रमणाचा करार केला आणि ब्रिटिश प्रतिनिधीला ‘ आम्हाला तुमच्याशीं आता काहीं बोलायचें नाहीं ’ असें सागून घालवून दिलें. त्यानतर ७ च दिवसानी दुसरें महायुद्ध सुरू झालें. १ सप्टें-

तारखेला जर्मनीनें पोलंडवर चढाई केली, ३ तारखेस ब्रिटनने जर्मनीशी युद्ध पुकारलें आणि पुढे पंधरवड्यात रशियाने आपली सैन्ये अर्ध्या पोलंडात आणून जर्मनीबरोबर पोलंडची अर्धी अर्धी वाटणी करून घेतली, तेव्हा साऱ्या जगाला धक्का बसला. ॲंग्लो-फ्रेंच राष्ट्रांतील समाजवाद्यांना रशियाबद्दल जी थोडीशी सहानुभूति वाटे ती यामुळे साफ नष्ट झाली.

## रशिया परदेशांत अप्रिय झाला

रशियानें घेतलेला पोलंडचा भाग हा मूळचा रशियाचाच होता व तो १९२० साली रशियाचा पराभव करून पोलंडनें जिंकून घेतला होता. पण ज्या फॅसीझमचें लोकशाहीशी व सोव्हिअट पद्धतीशीहि हाडवैर होतें त्या फॅसिस्ट राष्ट्रांशी लोकशाही राष्ट्रें लढत असता रशिया त्या फॅसिस्ट राष्ट्रांशी सख्य करतो, आणि त्या फॅसिस्ट राष्ट्रानें पोलंडवर राक्षसी आक्रमण केले असता त्या आक्रमणात भागीदारी करतो हा रशियाचा नैतिक अत्याचार होय अशी लोकशाही राष्ट्रांतील जनतेची खात्री झाली.

१९१७ सालीं रशियांत कम्युनिस्ट क्रांति झाल्यापासून रशियातील हुकुमशाही राजवटीबद्दल ॲंग्लोफ्रेंच लोकशाही राष्ट्रांत विविध मतें असलीं तरी सामान्य जनतेत व समाजवादी आणि मजूर पक्षांत रशियांतील समाजवादी प्रयोगाबद्दल भरपूर सहानुभूति होती. म्हणूनच हिटलरने व मुसोलिनीनें जर्मन व इटालीयन जनतेस रशियाविरुद्ध प्रक्षुब्ध केले व युद्धास तयार केले, तरी पण इंग्लंड व फ्रान्स या देशांतील सोव्हिअट-विरोधी गटांना आपल्या धोरणास जनतेचा पाठिंबा मिळविता आला नाहीं. पण इंग्लंडफ्रान्समधील जनतेच्या या रशियाप्रेमी भावनेस रूसो-जर्मन अनाक्रमण करारामुळें जबरदस्त धक्का बसला आणि रशियानें जेव्हां जर्मनीशीं करार करून रणांगणावर पोलंडची लांडगेतोड व वाटणी केली तेव्हां रशियन सोव्हिअट पद्धति हीहि फॅसिस्टच आहे असें ॲंग्लो-अमेरिकन जनतेस वाटूं लागलें. नतर थोड्याच दिवसात रशियानें फिन्लंडकडे रशियाची संरक्षण-फळी मजबूत व्हावी म्हणून काहीं मुलूख मागितला व फिन्लंडनें तो नाकारल्या-मुळे रशियानें फिन्लंडवर चढाई केली, यामुळे रशिया साम्राज्यवादीहि आहे असा ॲंग्लोफ्रेंच जनतेस प्रत्यय आला.

रशिया लोकशाही राष्ट्रांत दुसऱ्या महायुद्धारंभीं अप्रिय होण्यास आणखी एक फार मोठें कारण घडलें. जगातील सर्व कम्युनिस्ट हिटलर, मुसोलिनी व फॅसीझम् यांचे नेहमी हाडवैरी असत. फॅसीझम व नात्सीझम् याविरुद्ध प्रचार करणें हे त्यांचे एक प्रमुख कार्य असे. पण रूसोजर्मन करार झाल्यानंतर हा प्रचार एकदम थांबला. दुसरें महायुद्ध सुरू झाल्यानंतर ऑक्टोबरमध्ये रशियन परराष्ट्रमंत्री मोलॅटोव्ह यानें एक भाषण केलें. त्यांत ॲंग्लोफ्रेंच राष्ट्रें साम्राज्यवादासाठीं लढत असून जर्मनी राष्ट्रवादासाठी लढत आहे असें विधान केलें. आणि इंग्लंड, फ्रान्स वगैरे देशांतील कम्युनिस्ट हे फॅसीझमविरोधी लढ्यांत आपापल्या सरकाराला साहाय्य करण्याऐवजीं आपापल्या सरकारला विरोध करून फॅसिस्ट एजंटासारखे वागूं लागले. यामुळे जगातील कम्युनिस्ट हे लोकशाहीविरोधी फितुर असून त्यांना उदराप्रमाणें ठेचलें पाहिजे अशी विचारसरणी लोकशाही राष्ट्रांत प्रसृत झाली. पुढें १९४१च्या जूनमध्ये जर्मनीनें रशियावर स्वारी केली तेव्हां रशियाचें व जगातील कम्युनिस्टांचें धोरण एकदम बदललें व दुसऱ्या टोकास गेलें. जगातील कम्युनिस्ट व रशिया फॅसीझम्वर पुन्हा शिव्या ओकूं लागले आणि ॲंग्लोफ्रेंच अमेरिकन राष्ट्रें ही लोकशाही राष्ट्रें असून त्यांची बाजू ही ' लोकयुद्धा ' ची बाजू आहे असें बोलूं लागले. भारतासारख्या ब्रिटिश साम्राज्याखालीं भरडल्या जाणाऱ्या व ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध बंड करून उठलेल्या राष्ट्रास कम्युनिस्टांनीं हे ' लोकयुद्धा ' चे मंत्रपाठ शिकविले आणि येथील साम्राज्यविरोधी बंडवाल्यांना त्यांनीं फॅसिस्ट एजंट म्हणून हिणविलें. या सर्व इतिहासामुळे रणांगणावर ॲंग्लो-फ्रेंच-अमेरिकन राष्ट्रें व रशिया यांची जरी एकजूट दिसली तरी रशिया हें संधिसाधु राष्ट्र असून जगातील कम्युनिस्ट हे रशियाचे गुलाम आहेत अशी जगातील लोकशाही-प्रेमी व समाजवादी वृत्तीच्या लोकांची भावना झाली. युद्धानंतर घडलेल्या कोणत्याहि घटनेनें रशिया व जागतिक कम्युनिस्ट चळवळ या विषयींचें हें लोकमत बदलूं शकलेलें नाहीं.

दुसरें महायुद्ध सुरू होण्यापूर्वी सात दिवस रशियानें जर्मनीशीं अनाक्रमणाचा करार करून युद्धापासून अलग राहण्याचें ठरविलें. या घटनेचा युरोपीय लोकमतावर फार प्रतिकूल परिणाम झाला. ॲंग्लो-फ्रेंच सोशॅलिस्ट रशियाच्या या धोरणावर चिडले आणि पुढें पोलंड व फिन्लंड यांसंबंधानें रशियानें जे चढा-

ईचें धोरण अवलंबिले, त्यामुळें ही चीड फारच वाढली. अँग्लो-फ्रेंच भांडवलदार व कॉन्झर्वेटिव्ह मताचे लोक हे नेहमींच रशियाविरोधी होते, त्यांना आता काहींसा सोशॅलिस्टांचाहि पाठिंबा मिळूं लागला व पश्चिम युरोपात सर्वथैव सोव्हिअटविरोधी वातावरण निर्माण झालें. पण जर्मनीचा तडाखा इतका जोराने बसूं लागला की रशियासबंधानें विचार करायला कोणास फारसा वेळच नव्हता. किंबहुना कम्युनिझम् कसाहि असो जर्मनीशीं लढताना रशियासारखा मित्र जर्मनीवर दुसऱ्या बाजूने प्रहार करण्याला आपण मिळवूं शकलो नाहीं याचें चार्चिलसारख्याना वाईट वाटलें असावे असें दिसते. चर्चिल हा शुद्ध व्यवहार-वादी आहे. जर्मनीचा नात्सीवाद त्याला अमान्य नव्हता. लोकशाही ही दुर्बल असते, नात्सीवाद हा राष्ट्र एकजूट व समर्थ बनवितो याचें चर्चिलला कौतुक वाटे. जर्मनीत हिटलर अधिकारावर आला याचें चर्चिलला वाईट वाटलें व त्यानें हिटलरची मनधरणी करण्याच्या चेंबर्लेनच्या धोरणाला निकराचा विरोध केला. याचें कारण हिटलर ब्रिटनचें साम्राज्य बुडवायला बसला आहे अशी चर्चिलची खात्री झाली होती हे होय. पण हिटलरचें तत्त्व त्याला मान्य होते. पहिल्या महायुद्धात जर्मनीचा पराभव होऊन जर्मनीचा चुराडा झाला तरीसुद्धा जर्मनीचें पुनरुज्जीवन करून हिटलरनें त्याला बलवान केले याचें चर्चिलला कौतुक वाटे. १९३८ सालीं केलेल्या एका भाषणात चर्चिल म्हणतो, " ब्रिट-नचा जर युद्धात पराभव झाला असता तर जगातील राष्ट्रात आमचा जो उच्च दर्जा आहे तो परत मिळवून देण्यासाठीं आमच्यातहि कोणीतरी हिटलर निघाला असता अशी मला खात्री आहे. "

यात चर्चिलला लोकशाही नको असा अर्थ नाहीं. त्याला अमुक एका समाज-व्यवस्थेचे महत्त्व वाटत नाहीं. आपला देश बलाढ्य, आघाडीवर, वैभवसपन्न असावा एवढीच त्याची इच्छा असते. चेंबर्लेनप्रमाणें जर्मनीपुढें मान वाक-विण्यास त्याची तयारी नव्हती आणि स्वदेशाच्या रक्षणासाठी रशियाची मदत घ्यावी लागली तर तो त्याबाबत कचरणारा नव्हता. दुसऱ्या महायुध्दापूर्वी चेंबर्लेनऐवजीं चर्चिल ब्रिटनमध्यें पंतप्रधान असता तर जर्मनी एवढा माजला नसता आणि रूसोजर्मन करार होण्याऐवजी ॲग्लोरशियन करार होऊन युध्दाच्या आरंभापासूनच रशिया युध्दात अँग्लोफ्रेंचाच्या बाजूने आला असता असें वाटतें. रशियानें पोलंडवर स्वारी केली व अर्धे पोलंड जर्मनीशीं करार

करून कापून घेतलें त्यावेळीं सारे जग चकित झालें व रशियावर चरफडले. पण चर्चिलनें रशियाला दोष न देतां पोलंडचा जो भाग मूळ रशियाचाच होता, तो घेण्याचा रशियाला हक्क होता, फक्त 'आमचा मित्र म्हणून रशियानें तो घ्यायला हवा होता' असें एका भाषणांत बोलून दाखविले. हें भाषण चर्चिलनें केलें त्यावेळीं तो मंत्रिमंडळात होता तरी अजून पंतप्रधान झाला नव्हता. पण युद्ध भडकत गेले तर इंग्लंडात सर्वपक्षीय एकजूट करण्यास चर्चिल हाच समर्थ होता व तोच पंतप्रधान होणार हें पुष्कळांनीं ताडलें होतें. रशियाहि फार दिवस तटस्थ राहू शकत नाहीं, जर्मनी आज ना उद्यां रशियावर हल्ला करणार हेंहि पुष्कळांच्या लक्षात आले होते. अशा वेळीं चर्चिल पंतप्रधान असल्यास हिटलरविरुद्ध अँग्लो-रशियन एकजूट खास होऊं शकेल असें चर्चिलच्या वर उल्लेखिलेल्या भाषणावरून अनेकांच्या लक्षात आलें होते. पुढें ती गोष्ट पुष्कळ अंशानें खरी ठरलीहि.

पण सर्वसामान्य भांडवलदार व कॉन्झर्वेटिव्ह यांची कम्युनिझमविरोधी तेढ युद्धकाळात कायम टिकली इतकेंच नव्हे, तर अँग्लोफ्रेंचांचे जर्मनीविरुद्ध जें युद्ध चालू आहे त्याला रशियाविरोधी युद्धाचें स्वरूप यावें अशी खटपट सर्व युद्धकाळात कोणी ना कोणी भांडवलशाहीपक्षपाती लोक करीत असून निदान युरोपांत युद्धोत्तर काळात कम्युनिझम् पसरू नये याविषयीं अँग्लो-फ्रेंच-अमेरिकन राष्ट्रांतील सर्वच मुत्सद्दी खटपट करीत होते. रशियानें फिन्लंडवर ज्यावेळीं स्वारी केली त्यावेळीं ब्रिटननें रशियाविरुद्ध युद्ध पुकारून फिन्लंडला मदत करावी असे मत युद्धमंत्री होरेबेलिशा यानें व्यक्त केलें. त्याचें मंत्रिमंडळानें ऐकलें नाहीं म्हणून त्यानें अखेर राजीनामा दिला. पुढें रशियावर जर्मनीनें स्वारी केली आणि जर्मनी स्टालिनग्राडपर्यंत रशियाला मागे रेटीत गेला. त्यावेळी मूरब्रॅबझम हा इंग्लंडात विमानउत्पादन खात्याचा मंत्री होता. तो एका खाजगी बैठकींत म्हणाला,

"स्टालिनग्राडमध्ये जर्मनी व रशिया निकारानें लढून एकमेकांचा चेंदा करतील आणि ब्रिटनला आपोआप युरोपचें आधिपत्य मिळेल."

अर्थात त्याच्या या भाषणाचें वृत्त मंत्रिमंडळापर्यंत पोचलें, लोकांत जाहीर झालें आणि मग मूरब्राबॅझमलाहि राजीनामा द्यावा लागला. रशियाची जर्मनीविरुद्ध मदत चर्चिलला हवी होती व एकदां मिळाल्यावर ती गमवायला चर्चिल

तयार नव्हता. पण युरोप कम्युनिस्ट होता कामा नये आणि युद्धानंतर रशियाचें वर्चस्व कोठेंहि वाढू नये यासाठीं चर्चिल व इतर सर्व भांडवलवादी मुत्सद्दी यांचा सतत प्रयत्न होता. यामुळे, पहिल्या महायुद्धाचे शेवटी भांडवलदारांनी कम्युनिझमविरोधी लढा आरंभला, पण दुसऱ्या महायुद्धात आरंभापासून अखेर-पर्यंत जर्मनीविरोधी लढा चालू असताच कम्युनिझम विरोधी लढाहि निकाराने चालू होता. जोंवर रशिया तटस्थ होता आणि ॲंग्लो-फ्रेंच राष्ट्रांतील कम्युनिस्ट जणूं काय जर्मनीचे हस्तक असल्यासारखेच वावरत होते तोंवर कम्युनिस्टांची उघड उघड निर्भत्सनाच होत होती व सामान्य जनतेत त्यांच्याबद्दल मुळींच आदर उत्पन्न होणें शक्य नव्हते. पण रशियावर जर्मनीनें स्वारी केल्यानंतर ॲंग्लोफ्रेंच राष्ट्रांतील कम्युनिस्ट हेहि हिटलरविरोधी बनले व त्यांनी 'भुईखाली' जाऊन हिटलरविरोधी गनीमी लढा सुरु केला. या कम्युनिस्टांची संख्या सर्वत्र थोडी होती तरी समाजवादी, लोकशाहीवादी व देशाभिमानी असे सर्व गट 'भुईखालच्या' गनीमी लढ्यात सामील झाले. रशियावर स्वारी करण्यापूर्वींच्या बावीस महिन्यांत हिटलरने जरी सारा युरोप पादाक्रांत केला तरी रशियावर जर्मनीची स्वारी झाल्यानंतर युरोपांत कम्युनिस्टांनी जनतेचे जे गनीमी लढे सुरू केले त्यानें हिटलरला बेजार केले व पुढील हिटलरच्या पराभवाचा पाया खणून ठेवला.

## क्रांति दडपण्याचे प्रयत्न

पण याच गनीमी लढ्यातून समाजक्रांतीचीहि भीति उत्पन्न झाली. यामुळे ॲंग्लो-फ्रेंच-अमेरिकन राज्यकर्ते हिटलरशीं लढतां लढतां 'कम्युनिस्ट क्रांती'-शींहि लढत राहिले. म्हणून दुसऱ्या महायुद्धांत जर्मनीविरुद्ध ॲंग्लोफ्रेंचांचा झालेला उघड लढा जितका महत्त्वाचा आहे त्यापेक्षां 'भुईखालच्या' क्रांतिकारकांशीं त्यांना करावा लागलेला लढा हा अधिक महत्त्वाचा आहे. जर्मनीशी चाललेला लढा १९४५ सालीं हिटलरबरोबरच संपला. पण क्रांति-विरोधी लढा युद्धकालींच सुरू होऊन अजून चालला आहे व कदाचित तिसरे महायुद्ध तो ओढवून आणतो कीं काय अशीहि भीति वाटत आहे.

जर्मनीची स्वारी रशियावर झाली त्यावेळीं रशियाची शक्ति किती आहे याचा कोणासहि अंदाज नव्हता. रुसो-जर्मन करार रशियानें केला तो आपल्या अंगीं लढण्याचें सामर्थ्य नाहीं असें वाटूनच केला असा अनेकांचा अंदाज होता.

जर्मनीने रशियावर स्वारी केली व रशियन सैन्य भराभर मागे हटू लागलें. यामुळें इंग्लंड व अमेरिका येथील मुत्सद्दी रशियाचा जास्तींत जास्त तीन महिन्यात मोड होईल असे अंदाज् लागले. यामुळे रशियाला पहिले तीनचार महिने फारशी मदत ॲंग्लो-फ्रेंच-अमेरिकनाकडून मिळाली नाही अथवा त्यानी जर्मनीस पश्चिमेच्या बाजूने सतावून टाकण्याचेंहि कार्य केलं नाहीं. रशियावर जर्मनीने स्वारी केली यामुळे पश्चिम युरोपात आनदीआनदहि झाला. कारण जर्मनीविरुद्ध तेवढीच अधिक मदत मिळणार होती. रशिया या युद्धात वाचेल असेहि कोणाला वाटत नव्हते. यामुळे भाडवलदारी मुत्सद्याना आनदास अधिक कारण होते.

रशियावर जर्मन स्वारी झाल्यामुळे रशिया ॲंग्लो-अमेरिकनाचा मित्र झाला होताच. तशा आणाभाकाहि त्या दोघात झाल्या व इंग्लड आणि रशिया याचा वीस वर्षांचा सख्ख्याचा तह झाला. पण रशियावर विश्वास ठेवण्यास ॲंग्लो-फ्रेंच राष्ट्र तयार नव्हती. ब्रिटिश शास्त्रज्ञाना ॲटमचें विच्छेदन करता आले. पुढें त्यापासून ॲटमबॉंब पूर्ण करण्याचें अवाढव्य खर्चाचें कार्य ब्रिटनला झेपणारें नव्हते. तेव्हा चर्चिलने हे ॲटमविच्छेदनाचें रहस्य रूझवेल्टला सागितले, पण रशियाला त्याचा थागपत्ता लागूं दिला नाही.

चर्चिल हा जर्मनीविरोधी चढाईची योजना करीत असता रशियाला युद्धोत्तरकाळीं पायबद घालण्याचीहि तजवीज त्याच वेळीं करीत होता असें रूझवेल्टच्या मुलगा कर्नल एलिअट याने लिहून ठेवलें असून हॅरी हॉपकिन्स व ज. इसेनॉर यानींहि असे उल्लेख केले आहेत. बाल्कन्समध्ये ब्रिटनचें खूप भाडवल गुतले होते आणि जर्मनीचा पराभव झाल्यावर रशिया तेथे झडप घालील अशी चर्चिलला भीति वाटे. म्हणून जर्मनीविरुद्ध रशियास मदत करण्यासाठीं दुसरी आघाडी जी सुरू करायची ती पश्चिम युरोपात न करता बाल्कन्समध्यें करावी आणि जर्मनीचा पराभव करतां करता आपण बाल्कन्स व्यापून बसावे असा चर्चिलचा बेत होता. पण इसेनॉरला हें धोरण मान्य झालें नाहीं अथवा बहुधा रशियानेंच बाल्कन्समध्यें पाऊल टाकू नका असें ॲंग्लो-अमेरिकनाना बजावलें असावे.

फ्रान्स, बेल्जम, हॉलंड, नॉर्वे वगैरे राष्ट्रें हिटलरनें रशियावर स्वारी करण्यापूर्वीच पायाखालीं तुडविली. त्याबरोबर तेथें ‘ भुईखालची ’ गनीमी

प्रतिकाराची चळवळहि सुरू झाली. पण रशिया तटस्थ असून कम्युनिस्ट जर्मनीला अनुकूल होते यामुळे गनीमी युद्धास जोर चढेना. १९४१ च्या जून-मध्ये जर्मनीनें रशियावर स्वारी केली आणि युरोपातील गनीमी युद्धात कम्युनिस्ट सामील होऊन गनीमी युद्धास जोर चढू लागला. त्याबरोबरच त्या गनीमी युद्धास समाजक्रातीचेहि अंकुर फुटू लागले.

फ्रान्स, बेल्जम, हॉलंड, नॉर्वे, पोलंड, इटाली, ग्रीस या देशात गनीमी लढे झाले. या गनीमी सघटनानीं हिटलरशाहीचा पाडाव होताच त्या त्या देशांतील बँका, वहातूक, प्राणभूत धदे याचे आणि देशातील आर्थिक सघटनेचें राष्ट्रीय नियत्रण करणे हे ध्येय गाठण्याचा निश्चय केला. फॅसिझम नष्ट करून लोक-शाही जर स्थापायची तर आर्थिक सागाडा जुना भाडवलशाहीसरजामशाहीचा न ठेवता समाजवादी दृष्टिकोण आर्थिक क्षेत्रात अवलंबला पाहिजे तरच खरी खुरी लोकशाही स्थापन होईल अशी या लढवय्याची खात्री झाली होती व याच धोरणाने गनीमी लढे ते लढत होते.

पण हीच गोष्ट भाडवलदारी सत्ताधाऱ्याना व मुत्सद्याना मान्य नव्हती. गनीमी लढ्यात जसे क्रातिकारक होते तसे प्रतिगामी राष्ट्रवादीहि होते व त्या दोघात नेतृत्वासाठी चुरस लागली असून भाडवलदारी मुत्सद्दी प्रतिगामी गनीम्याचा पाठपुरावा करीत होते. फ्रान्समध्ये डी गॉलच्या अनु-यायानीं हिटलरविरोधी प्रतिकार फळी उभारली होती. तीत कम्युनिस्ट, सोशॅलिस्ट व राष्ट्रवादी फॅसिस्टहि होते. स्वतः डी गॉल हा राष्ट्रवादी फॅसिस्ट होता व तो युद्धोत्तरकाळीं समाजक्राति होऊ देणार नाहीं अशी भाडवलदार मुत्सद्याना खात्री असल्याने ते डी गॉलच्या अनुयायाना सर्व प्रकारची मदत करीत. युगोस्लोव्हिया आणि ग्रीस येथील परिस्थिति आटोक्याबाहेर चालली असें या मुत्सद्याना वाटलें व तेथील क्रांतीची लाट थोपविण्याचा प्रयत्न त्यांनीं युद्ध चालू असताच सुरू केला.

इटालींत या प्रयत्नाना बरेंच यश आले. जर्मन वर्चस्वाची फळी युरोपांत प्रथम इटालींत फुटली. राजा व्हिक्टर इमॅन्युअलने मुसोलिनीला पदच्युत करून ज. बादोलियो यास पंतप्रधान नेमले. त्याने काहीं दिवस युद्ध चालू ठेवण्याचा देखावा केला. तेव्हां इंग्लंडातील कांहीं इटालीअनानीं 'डेलि टेलिग्राफ' पत्रांतून बादोलिओनें युद्ध थांबवावे अशी प्रचारमोहीम चालू केली.

'डेली टेलिग्राफ' लिहितो "बादोलिओ जर फार काळ अमेरिकन आघाडी-विरुद्ध लढत राहील तर अखेर गनिमी प्रक्षोभाच्या वणव्यांत तो पकडला जाईल. प्रवाहाच्या मध्यावर राहून प्रवाहाशीं झगडणे हें त्याने सोडावें आणि अजून अवधि आहे तोंवर संयुक्ताच्या बंदरात शिरावे हें बरें."

हा लेख सिनॉर फ्रँझेरो या इटालिअनानें लिहिला होता. सिनॉर फ्रँझेरो हा पुष्कळ वर्षे इंग्लंडांत फॅसीझम्‌चा प्रचार करीत होता. त्यानें या लेखांत 'इटालीचा राजा व बादोलिओ याना जनतेचा भरपूर पाठिंबा आहे, कम्युनिस्टांना फारसें महत्त्व देण्याचे कारण नाहीं' असें लिहिलें. नंतर चार दिवसांनीं लिहितांना तो आणखी स्पष्ट बोलला. तो म्हणाला,

"भुईखालच्या चळवळींत नीट निरखून पाहिलें म्हणजे तेथे एक लिबरल पक्ष दिसतो. पण तो अगदींच निर्बल आहे. तेथे एक सोशॅलिस्ट पक्ष आहे. पण तें नुसते नाव असून तो पक्ष खरोखर कम्युनिस्ट पक्षच आहे. त्याची संख्या थोडी असली तरी तो संघटित आहे. त्याच्या जवळ फंड आहेत, एक चांगलें वृत्तपत्र आहे. ते प्रचार फार चागला करतात. बादोलिओ अमेरिकनांपुढें पराभूत होऊन जर पदच्युत झाला तर त्याचे जागीं एकादें लिबरल सरकार येईल. ते अमेरिकनाना शरण जावो अथवा न जावो तें औट घटकाहि नांदणार नाहीं आणि त्याची जागा कम्युनिस्ट घेतील. सारा राज्यकारभार कम्युनिस्टांच्या हातीं जाईल."

असें घडूं नये म्हणून काय करांवे ? तर बादोलिओनेच शरणागति घ्यावी आणि मग अमेरिकनानी जुन्याच राज्ययंत्राकडून कारभार चालवावा, सोशॅलिस्टाना, कम्युनिस्टाना समाजक्रांति करण्यास वाव देऊं नये असे फ्रँझेरो बादोलिओला व अमेरिकनाना शिकवीत होता.

युरोपमध्यें संयुक्त राष्ट्रांकडून जेथें जेथे जर्मनीची व इटालीची पीछेहाट होईल तेथें तेथे 'अलाइड मिलिटरी गव्हर्मेंट ऑफ् ऑक्युपाईड टेरिटरीज्' म्हणजे या लांबट नावाच्या ए. एम्. जी. ओ. टी. या आद्याक्षरावरून नामाभिधान पावलेलें 'ॲमगॉट' सरकार स्थापलें जात असे. जर्मनीची फळी इटालींत प्रथम फुटली तेव्हां तेथें हें 'ॲमगॉट' स्थापन झालें. या सरकारनें भुईखालच्या क्रांतिकारकांची मदत घेण्याचें साफ नाकारलें. सिसिलींत

'ॲमगॉट' प्रथम आले, त्याचा अध्यक्ष मेजर जनरल लॉर्ड रेनेल हा होता. तो मूळचा एक बँकर असल्याने जुनी समाजव्यवस्था काळजीपूर्वक कशी सभाळली पाहिजे हे त्याला कळत होते. त्याने १९४३ च्या ऑगस्टमध्ये लडनमधील 'न्यूज क्रॉनिकल' ला एक मुलाखत दिली. तींत तो म्हणाला,

"आम्ही फॅसिस्ट अथवा फॅसिस्टविरोधी अशा कोणत्याहि गटाची मदत घेणार नाही. तूर्त प्राथमिक शिक्षण आम्ही धर्मगुरूंचे हाती देणार आहो. सध्या सभा भरविण्याचे अथवा सघटना स्थापण्याचे स्वातंत्र्य नसून मला पुढील हुकुम मिळेपर्यंत मी ते स्वातंत्र्य देणार नाही. कायदा आणि सुव्यवस्था यासाठीं मुसोलिनीचे सिव्हिल पोलिस आम्हाला मिळाले आहेत. ते काही खास मुसोलिनीचे नव्हते. कारण त्यानी राजनिष्ठेची जी शपथ घेतली ती राजाच्या नावाने घेतली आहे."

याप्रमाण फक्त मुसोलिनी व बादोलिओ याना बाजूस सारून व ज्या क्रातिकारकानीं फॅसिस्ट सत्ता आतून पोखरून काढली त्याना जवळ येऊ न देता ॲमगॉटने जुनेच फॅसिस्ट राज्ययत्र तसेच कायम ठेवले. खाजगी उद्योगधंदे मूळच्या मालकाच्या हवाली करण्यासाठीं ॲमगॉटनें आपल्या ताब्यात ठेवले. सामाजिक व आर्थिक पुनर्घटना करण्याची लॉर्ड रेनेलची मुळीच इच्छा नव्हती. तो म्हणाला,

"आंतरराष्ट्रीय कायदा अथवा ॲमगॉटला दिलेले अधिकार याच्या कक्षेन आम्हाला समाजसुधारणेच्या योजना हाती घेता येतच नाहींत. इटालीअनाच्या खाजगी मालकींत आम्ही हस्तक्षेप करू शकत नाहीं. आम्ही व्यापलेल्या प्रदेशात नवे कर लादू शकत नाहीं." युरोपात युद्धातून कम्युनिझम् निर्माण होऊं नये. यासाठी जुन्या समाजघटनेचें रक्षण करणें जुन्याच नोकरशाहीच्या हाती राज्यकारभार देणे नागरिकस्वातंत्र्य सुरू न करणें आणि 'भुईखालच्या' फॅसीझमविरोधी बडवाल्याना दूर सारणें, असें ॲमगॉट सरकारचें हे धोरण होत. इटालीतील या प्रकारास उद्देशून सॅम ग्रॅफ्टन हा अमेरिकन लेखक १९४३ च्या ऑगस्टमध्ये लिहितों,

"युरोपातील लोक भुईखालचा गनीमी लढा करून विजयी होत होत वर येतात तोंवर आम्ही त्याच्या शौर्याचें कौतुक करतों. पण ती माणसे वर आलीं की 'हे कम्युनिस्ट गुंड' 'ते युरोपला वणवा लावणार आहेत' असें म्हणून

आम्ही त्याचा धिक्कार करतो. दोन्ही वेळीं माणसें तीच, फक्त आमचें धोरण बदलतें."

अँग्लो-अमेरिकनांचे हेतु 'रेनॉल्ड्स् न्यूज्' या पत्रानें अधिक स्पष्टपणें मांडले आहेत. तें पत्र म्हणतें,

"अँग्लो-अमेरिकन हे सोशालिस्ट लोकशाही स्थापण्यासाठीं लढत नसून भांडवलदारी लोकशाही स्थापण्यासाठीं लढत आहेत. युरोपांत हिटलरचा पाडाव झाल्यावर सामाजिक क्रांति होईल हें त्यांना माहीत आहे. ॲमगॉट स्थापण्याचा मुख्य हेतु प्रथम हिटलरशाहीचा जुलमी अंमल व नंतर त्या जुलमी सत्तेचा पराभव या प्रचंड संघर्षांतून जी क्रांतिकारक शक्ति उत्पन्न होईल तिजमधून एकदम भयंकर स्फोट निर्माण होऊं न देतां ती वाफ थोडथोडी सोडून पार्गून टाकायची हा होता. जुनी भांडवलदारी लोकशाही अशक्य करून टाकणारी क्रांति उद्भवूं न देणें हें अमेरिकेचें व ब्रिटिशांचेंहि धोरण होतें."

युद्धानंतर सर्व युरोपभर कमी अधिक प्रमाणांत हेंच धोरण अवलंबिण्यांत आलें. बेल्जम, हॉलंड, डेन्मार्क, नॉर्वे या देशांत लोकांना लोकशाही हक्कांची जुनी सवय पुष्कळ होती. तेथील भांडवलशाही अधिक सुसंस्कृत होती यामुळें गनीमी बंडवाले व भांडवलदार यांचेमध्यें तडजोड होऊन भांडवलदारांचींच पण व्यापक लोकशाही हक्कांचीं सरकारें तांबडतोब अस्तित्वांत आलीं. बेल्जममध्यें थोडी गडबड झाली त्याबरोबर चर्चिलला कम्युनिझमची भीति वाटून त्यानें ब्रुसेल्समध्यें टॅंक्स पाठविले. पण त्यावेळीं ब्रुसेल्समध्यें ब्रिटिश, फ्रेंच व इतर देशांचे बातमीदार होते त्यांनीं ब्रुसेल्समध्यें कोणीहि कम्युनिस्ट नाहींत असें जाहीर केलें. या देशांतून दंगली न होतां तडजोडीनें नवीन घटना अस्तित्वांत आल्या, पण युद्धापूर्वीचे प्रतिगामी राज्यकर्ते हेच परत राज्यावर आले आहेत असें पुढें जनतेच्या प्रत्ययास आलें.

फ्रान्समध्यें कम्युनिस्टांचें वर्चस्व वाढलें नाहींच, पण सोशलिस्टांचें बरेंच वाढलें. युद्धानंतर ज. डी गॉल हा पंतप्रधान झाला. पण त्याला हिटलरप्रमाणें सर्वाधिकारी व्हायचें होतें, तसें होतां आलें नाहीं. पुढें त्याची उचलबांगडीहि झाली. पण फ्रान्सला स्थिर स्वरूपाचें मंत्रिमंडळ लाभूं नये हा जुना प्रकार दुसऱ्या महायुद्धानंतरहि कायम आहेच.

इटालींत फॅसिस्ट सरकारचा पाडाव झाल्यानंतर फॅसिस्ट पोलिसांच्या हातीं

सत्ता कशी देण्यात आली ते वर सांगितलेंच आहे. फॅसिस्टांचा पाडाव करणाऱ्या भूमिगत क्रांतिकारकानीं जनतेच्या ग्रामपंचायती स्थापल्या होत्या, उत्तर इटालीतील कारखान्यातून फॅसिस्ट अधिकाऱ्याना हाकून लावून कामगारानीं वर्कर्स कौन्सिल्स स्थापन केली आणि कारखाने ताब्यात घेतले. ही संघटना मजबूत होण्याइतका अवधि लाभला असता तर फॅसिस्ट पोलिसाचें राज्य स्थिर होवूं शकलें नसते. म्हणून ॲमगॉटची सत्ता जसजशी इटालींत पसरत चालली तसतशा या ग्रामपंचायती मोडून खेडीं धर्मगुरूंच्या हवाली केली गेली व वर्कर्स कौन्सिले मोडून कारखाने मालकाना परत देण्यासाठीं सरकारनें स्वताकडे घेतले.

## : ४ : ग्रीसचें उदाहरण

बाल्कन द्वीपकल्प हा ब्रिटनच्या फार चिंतेचा मुलूख. त्यात रशियाचा शिरकाव होऊं नये आणि कम्युनिस्ट क्रांति होऊं नये याची ब्रिटनने फार काळजी घेतली. पण फक्त ग्रीसमध्ये चर्चिलला यश आले. युद्धकाळी व युद्धानंतर ॲंग्लो-अमेरिकनानीं क्रांति दडपून टाकण्याचे प्रयत्न कसे केले त्याचें ग्रीस हें उत्तम उदाहरण आहे.

१९४३ त इटालीतून जर्मन आघाडी अमेरिकन सैन्यापुढें कोसळूं लागताच बाल्कन द्वीपकल्प व दक्षिण युरोप यांच्या योजना चर्चिल आखूं लागला. १९४३ च्या ऑगस्टमध्ये क्यूबेक रेडिओवरून भाषण करताना चर्चिल म्हणाला,

" युगोस्लाव्हियाचा राजा आणि ग्रीसचा राजा याना त्यांचीं राज्यें परत मिळावीं अशी माझी इच्छा आहे. "

हे दोन्ही राजे सरंजामदार, प्रतिगामी भांडवलदार व परदेशी साम्राज्यवादी यांच्या पाठिंब्याने दुसऱ्या महायुद्धापूर्वी राज्य करीत होते. जर्मनीची व इटा-

लीची मुसडी येताच इतर अनेक युरोपीय राजाप्रमाणें यानीं पळ काढला होता. त्याना परत गादीवर बसविणें म्हणजे जुनी समाजव्यवस्था कायम ठेवण्यासारखे असून चर्चिलनें नुसती इच्छाच व्यक्त केली नाहीं तर ती इच्छा सत्य सृष्टींत आणण्यासाठीं महायुद्धातील लढ्याइतके निकराचे प्रयत्न केले.

पैकीं युगोस्लाव्हियात चर्चिलला यश आले नाहीं. तेथें फॅसिझमविरोधी आघाडी कम्युनिस्ट पक्षानें टिटोच्या नेतृत्वाखालीं उभारली व इटाली-जर्मनी याच्या आक्रमणास निकराचा प्रतिकार करून त्याची सत्ता आतून पोखरून काढली. टिटोच्या या लढ्याच्या काळात चर्चिलचा मुलगा रॅडॉल्फ चार्चिल टिटोच्या लढयाचें निरीक्षण करण्यासाठीं येऊन गेला होता. त्याने बापास टिटोबद्दल काय सल्ला दिला असेल तो असो. पण युगोस्लाव्हियाच्या राजाला गादीवर बसविण्याच्या चर्चिलच्या योजनेस टिटोने मान तुकविण्याचें साफ नाकारलें.

त्यामुळे युद्धोत्तर दुःखनिवारण व पुनर्वसतीकरण करण्यासाठीं सयुक्त राष्ट्रसघाने जे खाते सुरू केलें होते ( युनायटेड नेशन्स रिलीफ ॲन्ड रीहॅबिलिटेशन असोसिएशन—यू. एन्. आर. आर. ए.—'अन्रा' ) त्या अन्राखात्याकडून युगोस्लाव्हियास मदत येण्याची प्रथम बंद करण्यात आली. कारण ही मदत ॲंग्लो-अमेरिकन सैन्यामार्फत युगोस्लाव्हियात पाठविण्यांत येईल अशी अट अन्रा सस्थेनें घातली, पण टिटोने ती अट मान्य केली नाहीं. पुढें अन्राने आपला हट्ट सोडला व काहीं मदत टिटोच्या हवालीं केली, पण ती पुढें पुन्हा थाबविण्यात आली. यामुळे युगोस्लाव्ह जनतेचे फार हाल झाले. पण टिटोने सयुक्त राष्ट्रास शरण न जाता परदेशीं गेलेल्या राजाचें राज्यपद बरखास्त करून प्रजाराज्य जाहीर केले व कम्युनिस्ट राजवट स्थापन केली.

## ग्रीसमध्यें ब्रिटिश कारस्थान

ग्रीसची भूमि मात्र चर्चिलला बरीच मऊ लागली. तेथें प्रथम ब्रिटननें व नतर अमेरिकेनें क्रातिकारकाशीं घनघोर संग्राम करून राजा व प्रतिगामी वर्ग याचें आसन मजबूत केलें. आपण ब्रिटिश साम्राज्य निकालांत काढणार नाही अशी चर्चिलची प्रतिज्ञा होती. या साम्राज्याच्या सुरक्षिततेसाठीं पूर्व भूमध्य समुद्रांत रशियाचा शिरकाव न होणें अवश्य असल्यानें काळ्या समुद्राबाहेर रशियाला मज्जाव होणें इष्ट होतें. म्हणून ग्रीसमध्यें प्रतिगामी सत्ता व ॲंग्लो-अमेरिकनाचें वर्चस्व स्थापण्यासाठीं चर्चिल झगडला

व अखेर त्यांनं यश मिळविलें. १९४३ च्या ऑगस्टमध्यें चर्चिलने क्यूबेक येथं भाषण करून ग्रीसचा राजा गादीवर यावा अशी जी इच्छा व्यक्त केली तिचा अर्थ टीकाकाराच्या लक्षात त्याच वेळी आला होता. चर्चिलच्या त्या भाषणानंतर पधरवड्यानें लंडनच्या ' टाइम्स ' मध्ये स्मर्नाचा त्याचा बातमीदार लिहितो,

" ग्रीक राजाला गादीवर बसविण्याचा चर्चिलचा आग्रह आहे, याचा अर्थ लोकांना कसा दिसतो ? ज्या मेटाक्झसनें पार्लमेंट बुडवून फॅसिस्ट राजवट स्थापन केली त्याला सभाळून घेऊन पाठिंबा दिल्याचा आरोप या ग्रीक राजावर उघडपणे केला जात आहे ही गोष्ट लपून राहिलेली नाही. ग्रीक लोक हा अत्याचार विसरलेले नाहीत अथवा त्यांनी राजाला क्षमाहि केलेली नाहीं. ब्रिटिश लोकांनीं लक्षात ठेवावे की ब्रिटिश सरकार ग्रीक राजाला पुन्हा ग्रीसवर लादण्याचा प्रयत्न करीत आहे आणि राजा स्वीकाराल तरच तहाच्या अटी सौम्य होतील असा दम भरला जात असल्याची टीका ग्रीसमध्यें ब्रिटनवर करण्यांत येत आहे. ग्रीक लोकांच्या मनात असा संशय डाचत राहणें हे खुद्द ग्रीक राजाला आणि ब्रिटनच्या इभ्रतीला अपायकारक आहे. "

पण अशा इशाऱ्यांना चर्चिल बधणारा नव्हता. त्याने ग्रीसमधील आपलें कारस्थान निकरानें सुरू केले. युरोपात फॅसिस्ट आक्रमणास पहिला व निकराचा प्रतिकार ग्रीसमध्यें झाला. पहिल्यानें आलेला इटालीयन हल्ला ग्रीसनें परतविला, तेव्हा अखेर जर्मन सैन्य तेथें आलें. तेव्हा भुईखालचे गनीमी बडवाले पराभव पावले, तरी पुन्हा भुईखालीं लढत राहिले. त्यावेळीं ब्रिटिश सैन्य उत्तर आफ्रिकेतून ग्रीसमध्ये गेलें व तेथें ४० हजार ब्रिटिश सैन्य मारलें जाऊन ब्रिटनला माघार घ्यावी लागली. या वेळीं गनीमी लढा करण्यात कम्युनिस्टांची संख्या थोडी असून रिपब्लिकन्स व सोशॅलिस्ट यांचा मोठा भरणा गनीमी बडवाल्यात होता. या सर्वांची मिळून ई. ए. एम्. ( ईआम ) नावाची प्रमुख संघटना असून तिचें लढाऊ दल ई. एल्. ए. एस्. ( ईलास ) या नावानें प्रसिद्ध होतें. ग्रीसचा राजा देश सोडून गेला तो प्रथम लंडनमध्ये क्लॅरिज हॉटेलमध्यें होता. तेथून बहुधा चर्चिलच्या सूचनेनें तो केरोंतील शेपर्ड हॉटेलमध्ये येऊन राहिला.

चर्चिलनें केलेल्या भाषणाच्या सुमारास ईआमचे एक शिष्टमंडळ त्याला भेटलें. "आम्ही संयुक्तांच्या बाजूनें फॅसीझमविरुद्ध लढलो, म्हणून आम्हाला तुम्ही लोकप्रतिनिधि मानून आमच्या द्वारा राज्यकारभार करा" अशी राजाकडे ईआमने मागणी केली. पण राजाने स्पष्ट नकार दिला आणि रूझवेल्ट व चर्चिल याजकडे साहाय्याची मागणी केली. तिला रूजवेल्टने नकार दिला, पण चर्चिलने राजास पाठिंबा देण्याचे ठरवून क्यूबेक रेडिओवर वर उल्लेखिलेले भाषण केले.

ग्रीक राजानें ईॲमची विनंति अमान्य करताच ब्रिटिश आधिपत्याखालीं असलेल्या ग्रीक सैन्यात बंड झाले. काही ग्रीक अधिकाऱ्यानी बंड मोडताना सैनिकास निर्दयपणे मार दिला म्हणून ब्रिटिश अधिकाऱ्यानी त्या ग्रीक सेनानीना पकडले. पण खास चर्चिलचा आदेश आला तेव्हा त्या सेनानींना सोडून ब्रिटिश अधिकाऱ्यानीं तीन चतुर्थांशाहून अधिक ग्रीक सैनिकाना कैद केले. बाकीचे निवडक फॅसिस्ट व राजपक्षपाती असे होते त्याची 'राजपक्षपाती मौंटनब्रिगेड' 'सेक्रेड बटॅलिअन' तयार करण्यात आली. त्याचवेळीं ग्रीससाठीं नेमलेल्या ब्रिटिश एजंटानें जर्मन अमलात अधिकारावर असलेला जो रालीस त्याच्या अप्रत्यक्ष संमतीने त्यावेळचें जर्मन अमलातलें सिक्युरिटी सैन्य आणि सिक्युरिटी पोलीस याच्याशी बोलणी करून, जर्मनी पराभव पावून मागें हटेल त्यावेळीं देशाचा बंदोबस्त ठेवण्याचें काम आम्ही तुमच्याच हातीं देऊ असे त्यास आश्वासन दिले. पण गनीमी बंडवाल्याचा पाठिंबा त्याना आहे असें दिसल्या-वाचून लोकावर त्या पोलिसचें व सैन्याचें वजन पडणार कसें ? म्हणून ईआ-मशी संबंध नसलेले कोणी गनीमी आहेत काय याचा शोध करण्यात आला.

शेवटी नेपोलिअन झेर्वस नावाचा एक तरुण त्याच्या हातीं आला. त्याने फॅसिस्टांशीं सहकार्य केलेंच होतें. पण प्रतिकारातहि त्याने भाग घेतल्याचा लौकिक होता. त्याला लोकप्रिय नेता म्हणून ब्रिटिशानीं नाचविण्याचें ठरविले. हा झेर्वस काय लायकीचा माणूस होता हे सांगताना पुढें १९४७ साली ट्रूमनचा प्रतिनिधि पॉल पोर्टर 'कोलिअर्स वीक्ली'मध्ये लिहितो,

"जनरल नेपोलिअन झेर्वस हा फारच संशयास्पद माणूस आहे. याने थोडी फार प्रतिकाराची चळवळ केली होती. त्याच्या सर्व हालचालींना नात्सी सहकार्याचा वास मारतो आहे. पण ज्याना परिस्थितीचा गैरफायदा घ्यायचा

होता त्यांना झेर्वसचा उपयोग झाला. नव्या धोरणाबद्दल जे जे संशय व्यक्त करतील त्याचा निकाल लावण्यास झेर्वस फार उपयोगी ठरला. ”

जून १९४४ मध्ये लेबॅनॉनमध्यें ब्रिटिश सैन्यानें ग्रीसमध्ये शिरून जर्मनाना मागे हटवीत अथेन्समध्ये प्रवेश कसा करायचा याची रंगीत तालीम झाली. त्यावेळी ईलासविरुद्ध व जर्मन सत्तेतर्फे बंदराची व मालमत्तेची राखण करणारे जे सिक्युरिटी पोलीस व बटॅलिअन त्यानी ब्रिटिश सैनिकाचे स्वागत करावें असे ठरले. त्याप्रमाणें सेप्टेंबरमध्ये ब्रिटिश सैन्य ग्रीसमध्ये उतरले; पण त्यावेळीं जर्मनीची पिच्छेहाट इलासनें केली होती व ब्रिटिश सैन्याचे स्वागत सिक्युरिटी पोलिसनें करण्याऐवजी इलासच्या सैन्यानेच केले. सिक्युरिटी पोलीस व बटॅलियन जर्मनाना अनुकूल असल्यानें इलासने त्यापैकीं अनेकाना पकडून तुरुंगात घातलें होते आणि इलासचें लढाऊ दळ ब्रिटिश सैन्याच्या स्वागतास येऊन उभें राहिलें होतें. ब्रिटिश सैन्याचें स्वागत करताना त्याचे डोळे आनंदाश्रूनीं भरून आले, ब्रिटिश सैनिकाना त्यानी पुष्पहार घातले, अनेकांना त्यानी खांद्यावरून मिरवत नेले. या ब्रिटिश सैन्याच्या अधिपतीनीं आधींच सिक्यूरिटी पोलिसाशीं हातमिळवणी केली आहे याची अंधुक कल्पनाहि या भोळ्या इलास वीराना नव्हती. ब्रिटिश सेनापति जनरल स्कोबी याने हें गोड स्वागत हसतमुखानें स्वीकारल्यावर आपलीं नखे हळुहळू बाहेर काढण्यास सुरवात केली. इलासने प्रथम सर्व शस्त्रास्त्रें आपल्या स्वाधीन करावी असा स्कोबीने हुकूम सोडला. तेव्हा इलासने मॉनर्किस्ट मौंटन ब्रिगेड व सेक्रेड बटॅलियन यांचींहि शस्त्रे काढून घ्यावीं असा आग्रह धरला. पण मॉनार्किस्ट ब्रिगेड जरी ग्रीसची असली तरी ब्रिटिश आधिपत्याखाली असल्याने तिला निःशस्त्र करण्यास स्कोबीनें नकार दिला. तेव्हा ही बटॅलियन सशस्त्र ठेवणारच तर ग्रीसमध्यें आणूं नका अशी इलासनें मागणी केली. स्कोबीने तीहि नाकारली. तेव्हा इलासला निःशस्त्र करण्याच्या हुकुमाचा निषेध करण्यासाठीं ३ डिसेंबरला एक मोठी मिरवणूक निघाली. तीवर सिक्युरिटी पोलिसानीं गोळीबार केला. या गोळीबाराचें पुढे पांच दिवसांनीं वर्णन करताना अमेरिकेतलें प्रख्यात साप्ताहिक ‘ न्यू रिपब्लिक ’ यांत कर्नल शेपर्ड लिहितो,

“ मीं तो सर्व प्रकार स्वतः पाहिला आहे. रॉयलिस्ट सैनिकानीं मिरवणुकीवर

मशिनगन चालविली. तेव्हां अथेन्समधील लोकानीं निकरानें प्रतिकार केला. मग रॉयलिस्ट सैन्यानें सिक्यूरिटी बटॅलिअनला तुरुंगातून मुक्त करून मिरवणुकीवर छू केलें. त्याच्या अंगावर अजून जर्मन गणवेष तसाच होता. नंतर ब्रिटिश सैन्य व त्याच्या हिंदी पलटणीहि लोकाचा प्रतिकार हाणून पाडण्यासाठीं वापरण्यात आल्या. ”

याच गोळीबाराची हकीकत ब्रिटिश पार्लमेंटाचा एक सभासद कॅप्टन ब्लॅकबर्न यानें दिली आहे. तो म्हणतो,

“ ईआम जेव्हा जर्मनीशीं लढा देत होती त्यावेळीं हे ग्रीक पोलीस जर्मनीची चाकरी करीत होते. या इआमच्या पुरस्कर्त्यांची ३ डिसेंबरला मिरवणूक निघाली होती. ती रस्त्यावरून शातपणें चालली असून तीत स्त्रिया व मुलेंहि होतीं. तिजवर या पोलिसानीं गोळ्याचा वर्षाव केला. त्यामुळे १६ माणसे मेलीं व १४८ जखमी झाली. ”

यानतर इलासने बंड उभारले व चाळीस दिवसपर्यंत सतत धुमश्चक्री चालू राहिली. ब्रिटिश जनरल स्कोबी याने हे बड मोडून काढण्यात पुढाकार घेतला. पुढें १९४७ साली ब्रिटनच्या या पराक्रमाचे वर्णन करताना चर्चिल लिहितो,

“ मी ६ डिसेंबर १९४४ ला स्कोबीला एक तार केली आणि ग्रीसमध्ये तू तटस्थ राहूं नको, पापाडूच्या मत्रिमडळास पाठिंबा दे व कम्युनिस्टास झोडपून काढ असे सुचविले. या कामासाठीं तीन ब्रिटिश डिव्हिजन्स अथेन्समध्ये नेल्या होत्या. ”

स्कोबीला ग्रीसमध्ये प्रथम जर्मनाशीं लढण्यासाठीं पाठविण्यांत आलें. पण स्कोबी तेथें जाण्यापूर्वी इलासने जर्मनाना पिटाळून लावले होते. स्कोबीनें तेथें जाऊन फक्त इआमच्या शाततामय मिरवणुकीवर गोळीबार केला. आणि नंतर इलासनें केलेलें बड चेचून टाकलें. या सर्व प्रकरणासबधाने अथेन्समध्यें त्यावेळीं हजर असलेला अमेरिकन लेखक मि. लेलड स्टोवे पुढे १९४७ मध्ये न्यू रिपब्लिक पत्रात लिहितो,

“ ग्रीसमध्यें १९४४ अखेर झालेल्या यादवीची चर्चा करताना रॉयलिस्ट मौंटनब्रिगेडची निर्मिती व इलासचें बंड या विषयीच्या चर्चिल सरकारच्या जबाबदारीचा उल्लेख केलाच पाहिजे. अथेन्समध्यें गनीमी प्रतिकाराचें तप्त वातावरण अजून शिल्लक असताही ब्रिगेड निर्माण झाल्यामुळेच यादवीला

सुरवात झाली. अथेन्समधील त्या दुःखद दिवसात कोणाची भूमिका कोणती आहे याची मीं तपासणी केली. आणि ब्रिटिशांचे हृद्गत मला कळून आलें. तेथील ब्रिटिश वकील सर रेजिनाल्ड लीपर मला म्हणाला, 'येथे डाव्या गटाची हुकुमशाही होणें हें आम्ही अशक्य करून टाकलें आहे. याचा इटाली, फ्रान्स, बेल्जम, हॉलंड येथे फार चांगला परिणाम होईल.' माझ्या माहितीप्रमाणे वस्तुस्थिति अशी होती कीं इआमने हुकुमशाही स्थापण्याचें ठरविलें नव्हतें. सर्वपक्षीय सरकार स्थापावें अशीच मागणी केली होती. पण चर्चिल-लीपर गटाला लोकमतावर आधारलेलें प्रजाराज्य सरकार नकोच होतें. प्रजावाद्यांकडे ७० टक्क्याहून अधिक लोकमत असताना राजाला गादीवर बसवायचें असा ब्रिटिश मुत्सद्यांचा दुराग्रह होता."

पुढे १९४६ सालीं पार्लमेंटचा मजूर सभासद सीमूर कॉक्स याने "ग्रीसमधील डाव्यागटाच्या लोकांना सरकार बनू द्यायचें नाहीं याच हेतूनें चार्चिल सरकारनें ग्रीसमध्यें पाऊल टाकलें" असा आरोप केला आणि "ब्रिटिश मदत मिळाली नसती तर आम्हाला सत्ता मिळाली नसती असें ग्रीसच्या रीजटनेंच मला सांगितलें" असा पुरावाहि दिला.

१९४४ अखेर झालेलें हें बंड ब्रिटिश बागनेटांनी दडपून टाकल्यानंतर ज्यांनी नागरिकांचे सामान्य कायदे मोडले असतील अशा लोकांखेरीज बाकीच्या बंडवाल्यांना माफी द्यावी व त्यांच्यावर सूड उगविण्यात येऊं नये असें ब्रिटिशांनी ठरविलें. पण ब्रिटिश सेनापतीच्या या आदेशाची बजावणी कशी झाली याची हकीकत 'न्यू स्टेट्स्मन् ॲन्ड नेशन' या पत्रात एका ब्रिटिश अधिकाऱ्यानें १९४७ च्या नोव्हेंबरात पुढीलप्रमाणे दिली आहे. हा माफीचा आदेश बंडवाल्यांचे पुढारी आणि उजव्या गटाचे ग्रीक पक्ष यामध्यें झालेल्या करारावरून देण्यात आला होता. तो करार व्हार्किसा करार या नावाने प्रसिद्ध आहे.

सदर अधिकारी म्हणतो, "हा करार झाल्यापासून एकाच आठवड्यात नवीनच स्थापन झालेल्या नॅशनल गार्डने अत्यंत अत्याचारी पद्धतीनें या कराराचा भंग केला. हे नॅशनल गार्ड बहुतेक सारे फॅसिस्ट जर्मनीच्या अमलाशी सहकार्य करणारे होते. या करारावर विसंबून जे बंडवाले देशात राहिले अशा बंडवाल्यांना या नॅशनल गार्डनें तुरुंगात घातलें आणि त्यांना बडवून काढलें. एका लहानशा सैंपाकघरांत पुरुष, स्त्रिया व मुलें अशीं सोळा माणसें कोंडण्यात

आलीं होतीं. त्यातले दोन पुरुष त्याच्याच रक्ताच्या थारोळ्यात पडले होते. त्यांच्या डोकीवर व पाठीवर भयकर मार लागला होता. खोलीला एकच लहानशी खिडकी होती. पण ती उघडू देण्यात येत नसे. ६५ वर्षांचा एक म्हातारा तेथें होता. ईआमचें वृत्तपत्र विकल्यामुळे त्यास अटक झाली होती. त्याला बाधून घालून त्याच्या पायाच्या तळव्यावर दाडक्यांनीं मारण्यात आले होते. अटक का झाली हें त्याना सागण्यात आले नाहीं. कोणावरहि खटला भरण्यात आला नाहीं. बहुतेकाना ९ महिनेपर्यंत तुरुंगात ठेवण्यात आले. ग्रीसमध्ये कम्युनिस्ट अथवा डाव्या गटाचे लोक कोणत्याहि चळवळी करीत नसताना हे अत्याचार चालू होते. शेवटीं अधिकारी व्हार्किसा करार उघड उघड मोडीत आहेत अशी डाव्या गटाची खात्री झाली. त्यांनी निषेधाच्या सभा घेतल्या, मित्रराष्ट्राना तारा पाठविल्या, वृत्तपत्रातून चळवळ केली. हे सर्व कायदेशीर मार्ग निष्फळ ठरल्यावर मात्र त्यानी शस्त्र हाती घेतलें व त्यानतर हल्लीची यादवी सुरू झाली. ज्या ब्रिटिशानी ग्रीसमध्ये प्रवेश करताच डाव्या गटावर दडपशाही केली त्याना व्हार्किसा करारानतर तटस्थ राहण्याचा आदेश ब्रिटिश सरकारनें दिला होता. आणि मग ग्रीक सरकारचे सैनिक अत्याचार करीत असता ब्रिटिश सैन्य अगदी स्वस्थपणें पहात राहिले. ”

१९४४ साली चर्चिल सरकारनें ग्रीसबाबत जें धोरण अवलबिले त्याला रशिया व ब्रिटन याचे दरम्यान झालेल्या एका कराराची पार्श्वभूमि होती. “रुमानियात पुनर्घटना करण्यास रशियास मुक्तद्वार असावें आणि ग्रीसमध्ये पुनर्घटना करण्यास ब्रिटनला मुक्तद्वार असावे ” असा करार चर्चिलनें स्टालिनला जून १९४४ मध्यें सुचविला व तो स्टालिननें मान्य केला होता. त्याप्रमाणे चर्चिलनें ज. स्कोबीला ग्रीसमध्ये पाठविलें आणि वर वर्णिल्याप्रमाणे त्याने सर्व व्यवस्था लावली.

विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं १९४५ सालीं इंग्लंडात नव्या निवडणुका होऊन चर्चिलच्या सयुक्त मंत्रिमंडळाचा पाडाव झाला व ॲटलीचें मजूर मंत्रिमंडळ अधिकारावर आलें तरी पण ग्रीसविषयक धोरण ब्रिटननें बदललें नाहीं. महायुद्धकाळात चर्चिलच्या संयुक्त मत्रिमंडळामध्ये ॲटली, क्रिप्स, बेव्हिन वगैरे मजूर पुढारी होतेच. १९४५ सालीं ॲटलीचें मजूर मंत्रिमंडळ अधिकारावर आलें त्यावेळीं नव्या मंत्रिमंडळाचें विरोधी पक्षातर्फे स्वागत करतांना एडन म्हणाला,

" परराष्ट्रसंबंधाच्या कोणत्याहि महत्त्वाच्या मुद्द्यावर आमचा बेव्हिनशीं कधींहि मतभेद झाला नाहीं, " तेव्हा बेव्हिनने मान डोलविली.

१९४४ च्या डिसेंबरात चर्चिलचें धोरण स्कोबी वागनेटानीं ग्रीसमध्ये अमलात आणीत असता इंग्लडात मजूरपक्षपरिषदेत बेव्हिन चर्चिल मंत्रिमंडळाच्या ग्रीसमधील धोरणाचे समर्थन करीत होता. बेव्हिन म्हणाला,

"ग्रीसमध्यें जे निर्णय आम्हीं ठरविले व अमलात आणले ते केवळ एकट्या चर्चिलचे नव्हते. ते साऱ्या मंत्रिमंडळाचे होते. या सर्व चर्चांत माझ्या मजूर पक्षीय मित्रासमवेत मीं भाग घेतला होता. चार वर्षे या चर्चा चालल्या होत्या. हे प्रश्न युद्धाअखेरीस कसे सोडवावे याच्या योजना आम्ही ठरवीत होतो. त्या सर्व निर्णयात मी भागीदार आहें. या सर्व प्रयत्नाकडे मागे वळून पाहता ते चूक होते असें माझ्या सदसद्विवेक बुद्धीस वाटत नाही. "

याच भाषणात " ब्रिटिशांच्या ग्रीसविषयक धोरणाचा मूळ हेतु रणनीति विषयक होता " अशी बेव्हिननें कबूलीहि दिली. " भूमध्य समुद्रातलें आपलें स्थान सोडण्यास ब्रिटिश साम्राज्य राजी होणार नाहीं" असें बेव्हिनने प्राजळपणें बोलून दाखविलें. अर्थात् ग्रीसमध्ये जुलमी राजवट स्थापणें हा आपला हेतु आहे असें बेव्हिन कधींच म्हणाला नाहीं. " ग्रीसला अन्न व इतर साहाय्य देणें, काळाबाजार थाबविणें उद्योगधंदे सुरू करणें आणि परिस्थिति निवळताच न्याय्य अशा निवडणुका करणें " हा आपला हेतु असल्याचें तो सागतो. पण १९४४ च्या डिसेंबरपासून १९४५ अखेर पर्यंत झालेले वर वर्णिलेले जुलमी प्रकार घडल्यानंतरही १९४५ च्या डिसेंबरात " आमचा हेतु ग्रीसमध्यें कायदा आणि सुव्यवस्था राखणें आणि ग्रीसमधील सर्व मताना मान्य असें ईआमपक्षसुद्धा सर्व पक्षाचें सरकार स्थापणें हा आहे " असें बेव्हिन म्हणालाच.

बेव्हिनचें धोरण चुकत आहे ही जाणीव मजूर पक्षातील अनेक सभासदांना होती. १९४४ च्या डिसेंबरांत मजूर परिषदेंतल्या बेव्हिनच्या ग्रीसविषयक भाषणावर आक्षेप घेतांना एक मजूर पुढारी अनुरिन बीव्हॅन म्हणाला,

" इलासला शस्त्रत्याग करण्यास सांगण्यांत येत आहे. पण त्यामुळें परिस्थिति कशी होईल ? ग्रीसमध्यें लोकशाही तत्त्वें अमलात येण्याची हमी म्हणजे ब्रिटिश कॉन्झर्वेटिव्ह सरकारनें दिलेलें अभिवचन एवढेंच ना ? बेव्हिन म्हणतात, ' मी माझा शब्द नेहमीं पाळतों. ' खरें आहे. पण आतां ही हमी ते पुरी

करू शकणार नाहींत. मग त्या हमीवर विश्वास ठेवा असें बेव्हिन लोकाना का सागतात ? ग्रीक सोशॅलिस्टानी येथल्या कॉझर्वेटिव्हावर विश्वास ठेवावा असें बेव्हिननीं त्याना सागणें हें सयुक्तिक आहे काय ?"

ग्रीसमध्ये काही अत्याचार झाले अथवा होत आहेत याची दखलहि बेव्हिनने कधी घेतली नाही. पार्लमेटात ग्रीसमधील ब्रिटिश धोरणासबंधाने बोलताना तो गोड गोड तत्त्वे सागे. ग्रीसशी एक आर्थिक करार करण्याचें समर्थन करताना बेव्हिन १९४६ च्या जानेवारीत म्हणतो,

"माझी खात्री आहे की लोकशाही कोणत्याहि राष्ट्रावर बाहेरून लादता येत नाहीं, ती तेथल्या भूमीतून उगवली पाहिजे. लोकांच्या पाठिंब्यावरती आधारली पाहिजे आणि सामान्य माणसाना योग्य असे किमान जीवदान दिल्यावाचून लोकशाही भरभराटणार नाही. ग्रीक लोकानी युद्धात फार यातना भोगल्या. आता या करारानें त्याच्या जीवनास पुन्हा चागली सुरवात होऊन त्याचा पुनरुद्धार होईल." पण हे गोड शब्द कृतीत कधींच येऊ शकले नाहींत. कारण ग्रीसमध्ये कम्युनिझम् येईल या भीतीनें सर्व ब्रिटिश मुत्सद्याना सारखेच पछाडले होते. डाव्या गटाचे सर्व लोक कम्युनिस्ट आहेत अशी त्यांची खात्री होती. म्हणून राजा आणि त्याचे फॅसिस्ट पाठीराखे याच्या हातीं सत्ता देण्याचा निश्चय चर्चिलप्रमाणें बेव्हिनचाहि होताच.

अखेर ग्रीसमध्ये सरकार उभे कसे करायचें असा प्रश्न आला. उजव्या टोकाचेंहि सरकार नको व डाव्या टोकाचेंहि नको असें ठरवून बेव्हिननें सुचविल्याप्रमाणें दोन्हीकडून नेमस्त असणाऱ्या मध्यम गटाचे सरकार स्थापन झाले. पण त्याला कोणाचाच पाठिंबा मिळेना. अधिकारी एकांतिक उजव्या गटाचे होते. त्यानीं डाव्या गटाच्या लोकावर अघोर दडपशाही गाजविली एवढाच या उपद्व्यापाचा परिणाम झाला.

कोणतेच सरकार स्थिर होईना म्हणून बेव्हिननें ३१ मार्च १९४६ रोजीं ग्रीसमध्ये सार्वत्रिक निवडणुकी करण्याचें जाहीर केलें. या निवडणुकीस ८८ वर्षांचा वयोवृद्ध नेमस्त पंतप्रधान सोफोलिस हा अनुकूल नव्हता. तो म्हणाला,

"मतदारांच्या याद्या खोट्या आहेत, पोलिसात सर्व फॅसिस्ट आहेत, सिव्हिल-सर्व्हिस व सैन्य याच जातीचें आहे. फॅसिस्ट राजपक्षीयांनीं सर्व सरकारी योजना अडवून पाडल्या आहेत. त्याच्या हातीं चार-पंचमांश सिव्हिल

सर्व्हिस, न्यायकोर्टें, सैन्य वगैरे आहेत. साऱ्या देशभर फॅसिस्टाच्या हातीं सत्ता असून त्यानी जवळ जवळ आपलें राज्यच थाटले आहे. ते सशस्त्र आहेत, त्याना वाटेल तसे ते वागतात. सर्व ग्रीसमधून येणाऱ्या बातम्या पाहता राजपक्षीयाखेरीज कोणीहि उमेदवार म्हणून उभे राहण्याला अथवा मते देण्याला स्वतंत्र नाहींत. ”

सोफॉलिसच्या या मतास त्याच्या आणखी दोन मंत्र्यानीं पाठिंबा दिला व निवडणुका रहित होत नाहींत म्हणून त्यांनीं राजीनामेहि दिले. अशा परिस्थितींत निवडणुका झाल्या तर उजवा गटच विजयी होईल हे बेव्हिनला सहज कळण्यासारखें असून “ हा उजवा गट ताबडतोब राजाला अधिकारावर आणील ” अशी भीति सोफॉलिसने बेव्हिनला स्पष्टपणें कळविली होती.

शेवटीं सोफॉलिसची एक सूचना बेव्हिननें मान्य केली. निवडणुकी जरी १९४६ च्या मार्चमध्यें घेतल्या तरी पुढें दोन वर्षें राजाला सिंहासनावर आणावे कीं नाहीं याबद्दल सार्वमत घेऊं नये ही ती सूचना होय. त्यावेळीं सोफॉलिसला भेटलेल्या काहीं मजूर पक्षीय सभासदांस सोफॉलिस म्हणाला,

“ बेव्हिन हा शब्द पाळणारा माणूस आहे असें मानलें जाते. तो यावेळीं आपला शब्द पाळील व निवडणुकीनतर दोन वर्षेपर्यंत सार्वमत घेणार नाही अशी मी आशा बाळगतो. पण हें घडलें नाहीं तर यादवी टळणार नाहीं. बेव्हिनला सांगा कीं माझी तुम्हाला आठवण असेल आणि ग्रीसवर तुमचें प्रेम असेल तर सार्वमतासंबंधीचें आपलें मत पाळा. ”

स्वतां बेव्हिनची योजना हीच होती व ती त्याने १९४५ च्या नोव्हेंबरात पार्लमेंटात मांडली होती. त्या भाषणात बेव्हिन म्हणाला, “ मीं ग्रीसच्या रीजंटला देशापुढें पुढील कार्यक्रम ठेवण्यास सांगितलें आहे. प्रथम १९४६ च्या मार्च अखेर ग्रीक पार्लमेंटच्या निवडणुकी, नंतर १९४८ च्या मार्चमध्यें सार्वमत. ” पण बेव्हिननें हें वचन न पाळता मार्चमध्यें निवडणुका झाल्यावर थोड्याच आठवड्यांत सार्वमतहि घेतलें व राजा तख्तनशीन झाला. “ निवडणुका मार्चमध्यें घेण्याचा आग्रह ग्रीक सरकारचा आहे माझा नव्हे ” असेंहि पार्लमेंटांत सागण्यास बेव्हिननें कमी केलें नाहीं.

## ग्रीसमध्यें राजपक्षीयांचे अत्याचार

याप्रमाणें ग्रीसमध्यें राजा गादीवर आल्यानंतर ग्रीसमध्यें कोणती परिस्थिति

निर्माण झाली यासंबंधानें ' न्यूयॉर्क हेरल्ड ट्रिब्यून ' आणि ' न्यूयॉर्क डेली न्यूज ' या पत्रांच्या बातमीदारानीं १९४६ च्या सप्टेंबरमध्यें लिहिलें कीं,

" ग्रीक सरकार लिबरल्स, मजूर पक्षीय व त्याचीं कुटुंबे याचा अमानुष छळ करीत आहे. मालाच्या मोटारी भरभरून स्त्रिया व मुलें तुरुंगाकडे अथवा वनवासास पाठविली जातात. ' अन्रा ' मार्फत लोकाना दिले जाणारें अन्न आणि मलेरियाप्रतिबंधक औषधे हिसकावून घेतलीं जातात. मलेरिया-प्रतिबंधक उपाय करण्यातले तज्ज्ञ हे सारे कम्युनिस्ट आहेत असे मानून त्याना अटक करण्यात येते. "

सदर बातमीदार सर्व देशभर हिंडले. त्याना भिंतीवर ' लोकशाही म्हणजे खून ' ' लोकशाही म्हणजे हातोडा व कोयता ' अशा अर्थाचीं पत्रकें लावलेली आढळली. निवडणुकात कित्येक सबंध खेड्याचे मतदाराचे हक्कच काढून घेण्यात आले. कित्येक निरुपद्रवी कुटुंबेंच्या कुटुंबें पद्धतशीरपणे अन्नावांचून उपाशी ठेवण्यात आलीं. केवळ कम्युनिस्टच नव्हे तर डेमोक्रॅट्स, लिबरल्स, रिपब्लिकन्स या साऱ्याचा फन्ना उडवायचा निश्चय नव्या सरकारच्या अधिकाऱ्यानी केला होता.

१९४६ च्या मार्चमधील ग्रीक निवडणुका कशा झाल्या यासंबधानें १९४७ मध्यें कर्नल शेपर्ड अमेरिकेतल्या 'न्यूरिपब्लिक' पत्रात लिहितो, "माझ्या अंगावर ब्रिटिश गणवेश होता, यामुळें एका राजपक्षपाती अधिकाऱ्याला मजबद्दल विश्वास वाटून तो म्हणाला, " आम्ही अगदीं शभर टक्के राजपक्षीय उमेदवार निवडून आणणार आहो "

निवडणुका झाल्या तेव्हां मंत्रिमंडळात असणारा मि. हॅविनिस म्हणाला,

" झेर्वसनें अत्याचार व दहशतवाद याचा वापर सर्रास केला. उमेदवाराची नावे जीं आलीं ती त्याच्याच पसतीचीं होतीं."

राजपक्षाला मतें देण्याची तयारी असणाऱ्यानाच मतदानास जाता येत होते. इतरांचें जिणेंच अशक्य झालें होतें. " राजपक्षीय नोकरशाहीच्या अनियंत्रित दहशतबाजीमुळें रिपब्लिकनाचा भयकर छळ झाला. जो राजपक्षीय नाहीं तो कम्युनिस्ट होय असा सिद्धातच माडण्यात आला होता."

निवडून आलेलें ग्रीक पार्लमेंट कसें आहे याचें वर्णन करताना ग्रीसमध्यें त्यावेळीं असलेला अधिकारी लिहितो,

“ त्या पार्लमेंटात मध्यगटाचे अथवा डाव्या गटाचे कोणीहि नव्हते. नव्या ग्रीक सरकारातील अनेकानी नात्सी सरकारशीं सहकार्य केले होतें. इतरानीं त्या नात्सी सरकारपुढें मान तुकविली होती. सैन्याधिकारी सर्व राजपक्षीयांतून निवडले आहेत. अगदी नेमस्त रिपब्लिकन हाहि कम्युनिस्ट होय असा या अधिकाऱ्याचा सिद्धात आहे. जर्मन सत्ताधाऱ्यांनीं देशभक्ताशीं लढण्यासाठीं जे पचमदळी जमविले होते त्याचा ग्रीक सैन्यात भरणा झाला आहे. पोलिसमधील बहुतेकांनीं प्रथम मेटॅक्सस सरकारात व नंतर जर्मन अमलात नोकरी केली होती. जर्मनानी ग्रीस जिकल्यावर गनीमी बडवाल्यांना चेचण्यासाठी त्यानी पंचमदळ्यांचीं सिक्यूरिटी बॅटलिअन्स उभारलीं होतीं. कम्युनिस्टाना ठेचून काढणें हेच त्यांचे काम होतें. खेडीच्या खेडी जाळून काढणें, देशभक्ताना शोधून ठोकणे हें काम ते करीत. पुढें याच बटॅलिअनांचा उपयोग ब्रिटिशानी बड चेचण्यासाठी केला. आणि आता ट्रुमन यानाच बलवान करू पाहतो आहे.”

नात्सी अमलात सशयिताच्या ज्या याद्या होत्या त्याच याद्या घेऊन नव्या राजाच्या अमलात ‘कम्युनिस्ट’ वेचले जात. ग्रीसमध्ये राजा गादीवर आल्यावर एकंदरीने राज्य कसे काय चालू लागले यासबंधाने सीमू प्रिडिन १९४७ च्या एप्रिलात न्यूयार्क हेरल्ड ट्रिब्यूनमध्यें लिहितो,

“ राजाच्या १२ महिन्याच्या अमलानंतर काहींहि साध्य झालेलें नाही. भाडणें वाढली, दुःख वाढलें, तेढी वाढल्या. एक वर्षाची या ग्रीक सरकारची कारकीर्द भयंकर झाली आहे. प्रत्येक विरोधक हा कम्युनिस्टच असतो असा याचा सिद्धात आहे. मंत्रिमडळ कमालीचें नालायक आहे. आधीं कम्युनिस्टाचा नाश मग कोणतीहि सुधारणा असें सागण्यांत येतें. कम्युनिस्टाना ठेचण्याच्या तयारीसाठी सगळें परराष्ट्रीय चलन खलास झालें. मतभेद थोडाहि व्यक्त करणाऱ्याना डोंगरात पळून जावें लागतें. ‘ पुरेशी मदत न द्याल तर ग्रीस कम्युनिस्ट होईल ’ अशी पाश्चात्य राष्ट्रांना धमकी घालण्यांत येते. बरींच वर्षे हें सरकार अधिकारावर राहील तर कम्युनिस्ट तें सहज पोखरून काढतील. ”

स्टुअर्ट अल्सॉप यानें १९४७ च्या फेब्रुवारींत ‘ न्यूयॉर्क हेरल्ड ट्रिब्यून’ला पाठविलेल्या पत्रांत या ग्रीक सरकारचें शब्दचित्र पुढीलप्रमाणें रेखाटण्यात आलें आहे.

" ग्रीक सरकार फॅसिस्ट आहे असे सांगण्यात येते. पण त्याचें खरे वर्णन ते अत्यंत नालायक आहे हे होय. हे उजव्या गटाचें सरकार असून बड्या व्यापाऱ्यांचें याच्यावर वर्चस्व आहे. हे सर्व व्यापारी प्राप्तीवरील कर चुकविण्याची खबरदारी घेतात. लोक अत्यंत दुःखी असून त्यांचा कम्युनिझम्‌कडे ओढा आहे. हा ओढा कमी करण्यासाठी ज्या योजना हाती घेणें अवश्य आहे त्यांचा विचार करण्याचीहि लायकी या मंत्रिमंडळात नाहीं. अमेरिकेच्या मदतीवर मजा करायला मिळते ती उपभोगण्याहून अधिक महत्त्वाकांक्षा कोणाहि मुत्सद्याजवळ नाही. या मुत्सद्याच्या हाताशी कल्पनातीत नालायक असें सिव्हिल सर्वंट आहेत. कायद्यानें त्यांना आयुष्यभरच्या नोकऱ्या दिल्या आहेत. दारूच्या गुत्त्यात फॅसीझम्‌च्या थोड्याशा वल्गना चालतात. पण ग्रीक सरकारचे खरें अपयश अमेरिकन डॉलर खर्चून अमेरिकन चैनीच्या वस्तु बडे लोक खरीदीत असतां गरीब मुलें विदेशी हॉटेलांच्या दाराशीं भीक मागतात, यात दिसून येतें. आणि एक ग्रीक दुसऱ्या ग्रीकाचा द्वेष करूं लागला आहे ही सर्वांत भयंकर गोष्ट आहे. "

'अन्रा' मार्फत दिली जाणारी कोट्यवधि पौंडाची मदत सरकारी अधिकारीच काळ्याबाजारात नेतात असें अन्राच्या तपासनीसांना आढळून आलें. राजा गादीवर आल्यापासून बंडवाल्यांनीं बंड माजविलें. रोजच्या रोज ' कम्युनिस्ट ' म्हणून हाकाललेले लोक बंडवाल्यांना सामील होत व बंड वाढत जाई.

वर अमेरिकन डॉलर्स ग्रीसमध्ये आल्याचा उल्लेख आहे तें डॉलर्स ' ट्रूमन तत्त्वा 'अन्वयें जी मदत अमेरिकेनें ग्रीसला देण्यास सुरवात केली तींतून येत असे. अमेरिकेचा अध्यक्ष ट्रूमन यानें ५ मार्च १९४७ रोजीं एक घोषणा केली आणि युरोपांत लोकशाही व व्यक्तिस्वातंत्र्य यांच्या रक्षणासाठीं साहाय्य देण्याचें जाहीर अभिवचन दिलें. त्यापूर्वी युरोपातील अनेक राष्ट्रांकडून आपलें दारिद्र्य दूर करण्यासाठीं साहाय्य द्या अशा याचना ट्रूमनकडे गेल्या होत्या आणि हें दारिद्र्य दूर केलें नाहीं तर युरोपांत कम्युनिझम् माजेल अशी धास्त ट्रूमननें घेतलीं होती. ट्रूमनकडे गेलेल्या याचनात ग्रीसच्या राजाचीही याचना होती.

## अमेरिका ग्रीसमध्यें आली

ब्रिटनच्या मदतीनें तो गादीवर आला खरा. पण इंग्लंडनें प्रथम ग्रीसमध्यें खूप खर्च केला व तें दरिद्री झालें. पुढें ते द्रव्य देऊं शकेना. कम्युनिझमची भीति ही एक फार चांगली सबब अमेरिकेकडे भीक मागण्यास निर्माण झाली होती, तिचा उपयोग करून ग्रीसच्या राजानें टमनपुढें पदर पसरला व त्यात जे डॉलर पडूं लागले तेच ग्रीसमध्ये अधिकाऱ्यांच्या चैनीसाठीं वापरण्यात येऊं लागले. ग्रीसमध्यें यादवी चालू असता अमेरिकेनें तेथील बंड दडपण्यासाठीं राजाला उघड मदत करणें हें परराज्याच्या अंतर्गत कारभारात हस्तक्षेप करण्या-सारखे होते व त्यामुळे संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या नियमाचा भंग होत होता. तेव्हां ग्रीसमध्ये बंडवाल्याना बाहेरून मदत मिळतें म्हणून तेथील राजालाही मदत आम्ही देत आहों, पण सयुक्त राष्ट्रसघटनेचा ऊर्फ युनोचा विरोध असेल तर आम्ही हें धोरण बदलू असें अमेरिकेनें जाहीर केलें.

बहुधा यामुळेच ग्रीसमधील बंडवाल्याना परराष्ट्राची मदत मिळते काय याची चौकशी करण्यासाठीं यूनोनें एक कमिशन पाठविलें. या कमिशनवर अकरा सभासद होते. अँग्लोअमेरिकन गटाच्या सभासदांचें यात बहुमत होते. कमिशनच्या सभासदांना मतस्वातंत्र्य बेताचेंच होतें. बेल्जमच्या सभासदानें आपल्या पंतप्रधानाच्या तारेवरून आपले आधीं व्यक्त केलेलें मत बदललें, त्यावरून हें दिसून आलें. कमिशनने पुष्कळ साक्षीपुरावा तपासला व तो यूनोच्या जनरल असेंब्लीपुढें मांडला. त्यावरून ग्रीसच्या शेजारच्या बल्गेरिया, युगोस्लाव्हिया, अल्बानिया वगैरे कम्युनिस्ट राष्ट्रांकडून ग्रीसच्या बंडवाल्याना प्रत्यक्ष मदत मिळते असा पुरावा फारसा मिळालाच नाहीं. पण अमेरिकन मदत मात्र चालू राहिली.

ग्रीसचा राजा जॉर्ज गादीवर आल्यानतर काहीं दिवसानीं मेला व त्याचा अल्पवयी पुतण्या गादीवर आला. अमेरिकेची मदत ग्रीसमध्ये एकदां जाऊं लागली तशी ती दुथड्यांनीं वाहणाऱ्या गंगेसारखी जाऊं लागली. विविध प्रकारचा प्रत्यक्ष माल, पैसा, सल्लागार, शिक्षक, सैन्य व तज्ज्ञ तयार करणारे अधिकारी, राज्यकारभारतज्ज्ञ, एंजीनीअर्स, यंत्रज्ञ, शास्त्रज्ञ वगैरेंच्या पलटणींच्या पलटणी ग्रीसमध्यें धावूं लागल्या. या सर्वांचें पुढें होतें काय होते, आणि आपला

उद्देश साधतो कीं नाहीं याची तपासणी करण्यासाठीं पॉल पोर्टर नावाचा ट्रूमनचा वकील ग्रीसमध्ये मुद्दाम जाऊन आला. त्यानें, १९४७ च्या सेप्टेंबरमध्यें ' कोलिअर्स वीक्लीं ' त, आपणास ग्रीसमध्यें काय दिसून आले याचें अतीशय भयाण चित्र काढलें आहे. ' पाहिजे--ग्रीसमध्ये चमत्कार झाला पाहिजे ' या मथळ्याखाली हा लेख लिहिलेला आहे. पोर्टर लिहितो,

" सारें राष्ट्र वरपासून खालपर्यंत भविष्यकाळाबद्दल निराश झाले आहे. ही लोकाची निराशा हीच आपल्या विचाराची प्रमुख बाब असली पाहिजे. कारण आपण जी सारी मदत ओतीत आहो ती लोक आपले शैथिल्य सोडून स्वताचा उद्धार करतील या आशेने ओतीत आहो. मरहूम राजा जॉर्ज याच्याशीं जेव्हा मी प्रथम बोललो तेव्हा तो म्हणाला, ' बहुतेक सरकारी नोकर हे नुसते पेंढारी आहेत आणि मुत्सद्दी आहेत ते कॉफीच्या दुकानातले गप्पीदास आहेत. सिव्हिल सर्विस ही भाडोत्री मुत्सद्याची पेन्शन सर्व्हिस आहे. ' त्याचे हे शब्द कठोर आहेत, पण ते खरे आहेत. सिव्हिल सर्विस फाजील वाढली आहे, तिला पगार कमी आहे, ती नीतिभ्रष्ट आहे. यामुळें राज्यकारभारात पूर्ण अव्यवस्था माजली आहे. नालायकी व निष्फलता यामुळे इतक्या भयंकर अवस्थेस पोचलेला एकहि राज्यकारभार माझ्या पाहण्यात नाही. कर वसूल करणें, आर्थिक नियत्रणे अमलांत आणणें, रस्ते दुरुस्त करणे असली साधीं कामें करण्यास सुद्धा ही सिव्हिल सर्व्हिस विश्वासपात्र नाहीं. हल्लींच्या ग्रीसच्या राज्यकर्त्यांना काहीं तत्त्वज्ञान आहे असें कोठेंच नमूद नाही. लोकाचीं दुःखें दूर करण्यास काही करावे ही इच्छाच नाहीं. माझ्या माहितीप्रमाणें या ग्रीक सरकारला काहीं राजकीय धोरणच नाहीं. आपणाला अधिकारावर रहातां यावे यासाठी परक्याची मदत मागावी, युद्धकाळात आपण स्वार्थत्याग केल्याची जाहिरात करावी आणि कम्युनिझम्‌विरोधी प्रयत्नाचें प्रतीक म्हणून राजाच्या अस्तित्वाकडे बोट दाखवावे करावें म्हणजे अमर्याद मदत मागता येते एवढें त्याना माहित आहे. ही मिळणारी विदेशी मदत मूठभर बँकवाले व व्यापारी याच्या चैनी व सवलती टिकविण्यासाठीं खर्च होत असून हे गटच ग्रीसमधील अदृश्य शक्ति होत. राज्यसत्तेमागें राहून आपले आर्थिक हक्क सभाळावें मग राष्ट्राच्या आर्थिक परिस्थितीचें वाटोळे झाले तरी चालेल अशी याची वृत्ति आहे. करपद्धति आहे ती याच वर्गाला फायदेशीर आहे. हुंडणावळीच्या नियत्रणाला

त्याचा निकराचा विरोध आहे. कारण मग कैरो अथवा अर्जेंटायना येथील बँकात त्याचे नफे साचून पडले आहेत ते त्याना वापरता येणार नाहींत. ''

पण या परिस्थितीच्या दर्शनानें अमेरिकेनें माघार घेतली नाही. उलट अधिकाधिक मदत अमेरिका ग्रीसमध्ये कम्युनिझमला थोपविण्यासाठीं ओतीत आहे, लष्करी जबाबदाऱ्या घेत आहे. दोन लक्ष ग्रीक सैन्य अमेरिकेनें उभारले असून त्याचे सर्व अधिकारी अमेरिकन आहेत. अमेरिकेनें ग्रीसची चलन-पद्धति आपल्या हातीं घेऊन चलनवाट थांबविण्याचे प्रयत्न सुरू केले आहेत. अमेरिकन तज्ज्ञ सिव्हिल सर्व्हिसमध्ये नाक्याच्या जागीं ठेऊन सिव्हिल सर्व्हिस सुधारण्याचा प्रयत्न केला जाणार आहे. आर्थिक व लष्करी तज्ज्ञ सर्व मदत-योजना नीट पार पाडली जाते की नाही हे पाहात आहेत. हा सर्व आटापीट ग्रीक जनतेच्या कल्याणासाठीं केला जात नसून ग्रीक सोव्हिअट रशियाच्या अथवा कम्युनिस्टाच्या जाळयांत सापडू नये, काळ्या समुद्रातून भूमध्य समुद्रांत बाहेर पडण्याला रशियाला रस्ता मिळूं नये ही अमेरिकेची महत्त्वाकांक्षा आहे. त्यासाठीं ग्रीसचीं मंत्रिमंडळें कोण असावी याविषयींहि अमेरिकेची हुकुमत चालू लागली आहे असें जेसप अल्सॉप सांगतो. पण ग्रीसच्या जनतेचे साहाय्य सरकारला मिळविता येत नाही.

अमेरिकेच्या या हस्तक्षेपाचा परिणाम बंडवाल्याचा मोड होण्यात आता झाला आहे एवढें कबूल केलेच पाहिजे. पण ग्रीसचें राज्य कितपत स्थिर पायावर उभे आहे हें मात्र अजून ठरायचे आहे. जगाच्या उद्धाराचें कंकण अमेरिकेनें बांधले असून त्यासाठी अमेरिका स्वार्थत्याग करीत आहे व कम्यूनिझम्‌विरुद्ध अमेरिका ही एकच संरक्षणफळी आजच्या जगांत आहे असा फार बोभाटा ऐकूं येतो. या अमेरिकन मदतीचें फल परिणामी किती प्रतिगामी असते हें कळण्यासाठीं ग्रीसमधील अमेरिकेच्या खटाटोपाचे स्वरूप येथें जरा विस्तारानें दिले आहे.

---

## : ५ : ब्रिटिश मजूरपक्ष आणि रशिया

रशियात राज्यक्रांति झाल्यानंतर ब्रिटनमधील मजूर पक्ष हा जगात जास्तींत जास्त प्रमाणात सोव्हिअट रशियास अनुकूल असणारा पक्ष होता. पहिल्या महायुद्धाचे वेळीं हेंडरसन हा ब्रिटिश मजूर पक्षाचा पुढारी असून त्या नात्याने त्याला मंत्रिमंडळातहि घेण्यात आले होते. त्यावेळीं मजूर पक्षाने युद्ध कसे संपवावे यासंबंधाने त्याने आपला सिद्धांत मांडला. जेते राष्ट्र व जितराष्ट्र असे उच्च-नीचतेचे वर्गीकरण न करता बरोबरीच्या नात्यानें सर्व राष्ट्रांनीं विचार-विनिमयानें तह घडवून आणावा अशी भूमिका त्याने मांडली. अर्थात् जर्मनी हा प्रमुख शत्रु असला तरी त्याच्याशीं असा तह करावा, हें लिबरलांतील कांहीं डाव्या गटाच्या लोकांना तरी पटण्याजोगे होते. मात्र रशियाने क्रांति केल्यामुळे रशियासंबंधाने ब्रिटनमध्यें साशंकता उत्पन्न झाली. पण क्रांति झालेल्या रशियाशीहि ब्रिटननें स्नेहभावानेंच वागावें असे मजूर पक्षाचें मागणें होते. युद्धसमाप्तीसंबंधीची मजूर पक्षाची ही भूमिका त्यावेळच्या ब्रिटिश सरकारने मान्य केली नाहीं. या व इतर कारणांमुळें हेंडर्सननें मंत्रिमंडळातील आपल्या जागेचा राजीनामा दिला. पुढें पहिलें महायुद्ध संपल्यावर बोल्शेव्हिक रशियाशीं ब्रिटिश सरकार कसा संबंध ठेवतें हा प्रश्न महत्त्वाचा झाला.

### सोव्हिअट रशियाचा कैवार

१९१८ च्या नोव्हेंबरांत जर्मनीचा पराभव होऊन युद्ध संपले. त्यानंतर डिसेंबर मध्ये मजूर पक्षानें ब्रिटिश सरकारचे रशियासंबंधीचें धोरण काय आहे अशी पृच्छा केली. पण कांहींच उत्तर मिळाले नाहीं. उलट ब्रिटिश सरकारने प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणे रशियांतील प्रतिकारकांना सर्व प्रकारची मदत पाठवून रशियाच्या अंतर्गत भांडणांत हस्तक्षेप करण्यास सुरवात केली. त्यामुळें १९१९ सालीं मजूर पक्ष व ट्रेड युनिअन कौंग्रेस यांच्या संयुक्त बैठकीपुढें ' रशियात हस्तक्षेप करणें बंद करा ' अशी सूचना आली. या हस्तक्षेपाचा प्रतिकार कसा करावा याचाहि विचार सदर संयुक्त परिषदेंत व्हावा अशी सूचनेस पुस्ती

जोडलेली होती. त्याच साली व्हिटसन येथे मजूर पक्षाची परिषद भरली असता बोल्शेव्हिक रशियात ब्रिटन जो सशस्त्र हस्तक्षेप करीत आहे त्यास प्रत्यक्ष प्रतिकार करावा अशी सूचना आली होती. उजव्या गटाच्या लोकानीं तीस विरोध केला. असा प्रत्यक्ष प्रतिकार हा सनदशीर नव्हे असे त्याचें म्हणणें पडलें. तेव्हा बॉब स्मिली नावाचा पुढारी म्हणाला,

" प्रत्यक्ष प्रतिकार हा गैरसनदशीर मानण्यात येतो, पण येथले सरकार रशियात हस्तक्षेप करीत आहे तें सनदशीर आहे काय ? ही लोकाची फसवणूक सरकारने केलेली नाहीं काय ?

हर्बर्ट मॉरिसन म्हणाला, " ब्रिटन, फ्रान्स आणि इतर साम्राज्यवादी राष्ट्रे यानी रशियाविरुद्ध जे युद्ध चालविले आहे ते फक्त बोल्शेविक रशिया व लेनिन याचे विरुद्धच आहे, आपला त्यात काहीं संबध नाही असें समजू नका. कारण बोल्शेव्हिक रशियाविरुद्ध युद्ध म्हणजे आतरराष्ट्रीय सोशॅलिझम् व ट्रेड यूनिअन चळवळ याजविरुद्धच ते युद्ध आहे असें समजा. अशा युद्धाचा प्रतिकार ट्रेड यूनिअन चळवळीच्या अगी असलेल्या सर्व राजकीय व औद्योगिक शक्तीनें केला पाहिजे."

हा हस्तक्षेप थाबविण्यासाठीं ब्रिटिश मजूर पक्षानें एक दिवसाचा सार्वत्रिक संप १९१९ सालीं पुकारला व सरकारी धोरणाविरुद्ध त्या दिवशीं रस्तोरस्तीं जगी निदर्शने झालीं. रशियात प्रतिकारकाचा संपूर्ण पाडाव झाल्यामुळें ब्रिटिश सरकारला आपला हस्तक्षेप आपोआपच थाबवावा लागला. पुढें १९२० सालीं पोलंड व रशिया याचें युद्ध सुरू झाले. त्यावेळी ब्रिटनमधून पोलंडला दारूगोळा पाठविण्यात यायचा होता व तो जॉलीजॉर्ज या बोटीवर चढवायचा होता. पण गोदी कामगारानीं संप केला व रशियाविरुद्ध जाणारा दारूगोळा बोटीवरच ध्यायचा नाहीं असा गोदीकामगार संघाने ठरावच करून टाकला.

रूसोपोलिस युद्धात प्रथम रशियाची सरशी होऊन बोल्शेव्हिक सैन्यें वॉर्सावर येऊं लागली. त्याबरोबर ब्रिटिश परराष्ट्रमंत्री लॉर्ड कर्झन यानें रशियाला मागे हटण्यास फरमावून युद्धाची धमकी दिली. या धमकीविरुद्ध मजूर पक्षानें सर्व कचेऱ्याना तारा पाठवून सर्व इंग्लंडभर असंतोषनिदर्शनें घडवून आणली. त्याचे दुसरे दिवशी ट्रेड यूनिअन कॉंग्रेस, ब्रिटिश मजूर पक्ष आणि पार्लमेंटातील मजूर पक्ष यानीं जाहीर केलें कीं, " पोलंडच्या कारणानें इंग्लंड

सोव्हियट रशियाशीं युद्धाचा बनाव घडवून आणीत आहे, पण असें युद्ध हें मानव जातीविरुद्ध युद्ध असून कामगार आपल्या सर्व सामर्थ्यानिशी असे युद्ध हाणून पाडल्यावाचून राहणार नाहीत."

नतर लंडनमध्ये एक नॅशनल कॉन्फरन्स बोलाविण्यात आली. तिनें "सोव्हिअट रशियाविरुद्ध लष्करी, आरमारी अथवा इतर कोणत्याहि प्रकारचा हस्तक्षेप झाल्यास त्याचा प्रतिकार करण्याची आम्ही शपथ घेत आहो" असा टराव मजूर केला. तसेच रशियाला ब्रिटिश सरकारनें मान्यता द्यावी व रशियाशीं सर्व प्रकारचे व्यापारी सबध ठेवावे यासाठीं खटपट करण्याचा आदेशहि देण्यात आला. या सभेत आजचा ब्रिटिश परराष्ट्रमत्री अर्नेस्ट बेव्हिन याने महत्त्वाचें भाषण केले. तो म्हणाला,

"जागतिक शातता स्थापण्याच्या कार्यक्रमातील जे कर्तव्य तुम्हापुढे माडण्यात येत आहे ते मजूरी अथवा कामाचे तास या स्वरूपाच्या आपल्या नेहमीच्या मागण्यापेक्षा फार अधिक महत्त्वाचें आहे. आम्हाला असे वाटू लागलें आहे कीं काहीं गुप्त व प्रतिगामी शक्ति परिस्थितीचा असा बनाव घडवून आणीत आहेत कीं रशियाची चूक होत आहे असे दृश्य निर्माण व्हावें म्हणजे संयुक्त राष्ट्राना रशियाविरुद्ध युद्ध करण्याला सबब मिळेल. रशियातील अनेक झार बादशहानी लाखो लोकाच्या कत्तली केल्या, तरी ब्रिटिश सरकारने हस्तक्षेप केला नाही. पण लोकक्राति झालेली दिसली कीं 'हा धोका नष्ट करा' असे आम्हास मागण्यात येते. गेल्या तीन वर्षांचे सरकारचें धोरण असें आहे. हें धोरण असेच वाढत असता मजूर पक्ष स्वस्थ बसून पाहणार नाहीं. आम्ही आमचें धोरण आजच स्पष्टपणें येथे माडून ठेवतों. रशियाविरुद्ध जर येथल्या सरकारने युद्ध आरभले तर त्याचा येथें एवढा फोट होईल कीं त्याचा परिणाम काय होईल हें कोणीहि सांगू शकणार नाही."

जे. आर. क्लइन्स म्हणाला, 'कामगारसंघटनांची जर इच्छा नसेल तर त्यांना युद्धात गोवले जाऊ नये यासाठीं आपणाला पार्लमेंटरी मार्ग उपयोगी पडणार नसून प्रत्यक्ष प्रतिकाराचा मार्ग हाच एक उपयोगी मार्ग आहे."

जे. एच्. थॉमस म्हणाला, 'आज जो ठराव आम्ही तुमच्यापुढें माडीत आहों त्याची बजावणी नुसत्या पार्लमेंटरी प्रयत्नानें होणार नाहीं. या ठरावाला पाठिंबा देतांना हें लक्षात ठेवा कीं तुम्ही कांहीं नुसत्या सपाला पाठिंबा देत

नाहीं. हा ठराव स्वीकारणें म्हणजे देशातील राज्यघटनेलाच आव्हान देण्यासारखें आहे."

जे. एच्. थॉमस् त्या वर्षी ट्रेडयूनिअन काँग्रेसचा अध्यक्ष होता हे लक्षात ठेवण्यासारखें आहे. १९२४ साली मॅक्डोनल्ड याच्या नेतृत्वाखाली जे मजूर मंत्रिमंडळ इंग्लंडात अधिकारावर आले तें अल्पमतात असून लिबरलांच्या पाठिंब्यावर त्याला जगावे लागतें. तरीपण त्यानें सोव्हिअट रशियाला मान्यता दिली आणि राजकीय व आर्थिक संबंध रशियाशी सुरू केले. पुढील काळात ब्रिटिश मजूर पक्षास इंग्लंडातील अंतर्गत परिस्थितीशीं झगडावे लागले. पण रशियासंबंधानें ब्रिटिश मजूर पक्षाचें धोरण स्नेहभावाचेंच असे. १९२९-३१ चें मजूरमंत्रिमंडळ अल्पजीवीच ठरलें. पुढील काळात मुसोलिनी व हिटलर यांचें बल वाढत गेले त्याबरोबर सोव्हिअट रशिया व ब्रिटिश मजूर पक्ष यांचा स्नेहभावहि वाढला.

पुढें सोव्हिअट रशियात जे राजद्रोहाचे खटले झाले आणि दंडपशाही जी झाली व पाश्चिमात्य लोकशाहीसंबंधानें रशियन प्रचारक जो तिटकारा दाखवीत त्यामुळें ब्रिटिश मजूर पक्षाचें मत संशयाकुल होऊं लागलें. रूसो-जर्मन करार, पोलंडची फाळणी व रशियाची फिन्लंडवर झालेली स्वारी यानें ब्रिटिश मजूर पक्षाच्या रशियाविषयक भावनेला धक्का बसला. पण जर्मनीनें रशियावर स्वारी केल्यामुळे इंग्लंड व रशिया यांचें पुन्हा सख्य झालें आणि कॉन्झर्वेटिव्ह पक्ष जरी रशिया व कम्युनिझम् याविरुद्ध दुटप्पीपणानें वागत असे तरी ब्रिटिश मजूर पक्ष व रशिया यांचें युद्धोत्तर काळात निरंतर सख्य राहील अशी अटकळ करण्यांत येई

जर्मनीचा पराभव होताच जपानच्या पराभवाची वाट न पाहता ब्रिटिश मजूर पक्षाने संयुक्त मंत्रिमंडळांतून राजीनामे देऊन निवडणुकांची तयारी केली. तिचा हेतु युद्धोत्तर आंतरराष्ट्रीय संबंध मजूरपक्षास संमत अशा धोरणाचे ठेवता यावे हाच होता. १९४५ च्या निवडणुकींत ब्रिटिश मजूर पक्षाने जो जाहीरनामा काढला त्यांत मजूर पक्ष अधिकारावर आल्यास कोणते धोरण अवलंबील ते पुढील शब्दात मांडलें होतें :-

" ब्रिटिश कॉमन्वेल्थ, अमेरिका व रशिया यांचें सहकार्य व साहचार्य जें युद्धकाळांत झालें तें शांततेच्या काळीं अधिक दृढ केलें पाहिजे. एक गोष्ट लक्षात

ठेवली पाहिजे की युद्ध जवळ जवळ येत होते त्या काळात युद्ध सुरू होईपर्यंत येथल्या टोरी पक्षाला रशियाची एवढी धास्ती वाटे की त्यानी रशियाशीं सहकार्य निर्माण करण्याची संधि गमावली व त्याबरोबर युद्ध टाळण्याची संधिही गमावली. आता ब्रिटिश मजूर पक्ष आंतरराष्ट्रीय संघटना निर्माण करण्याच्या कार्यास हात घालीत असता त्याजजवळ एक फार अनुकूल भूमिका आहे. ती अशी की जगातील सर्व श्रमजीवी वर्गांचे हितसंबंध आता सजातीय झाले आहेत. नात्सी जुलुमाविरुद्ध दीर्घ काल झगडा चालविल्यानं आम्हा श्रमजीवि वर्गांना एक श्रेष्ठ दर्जा आला असून आमचं वजन वाढले आहे."

निवडणुकीपूर्वी ब्लॅकपूलला भरलेल्या परिषदेत बेव्हिनने ब्रिटनच्या रशिया-विषयीच्या धोरणावर भाषण केले. मजूरपक्ष अधिकारावर आल्यास आपलें धोरण काय राहील हे तो सांगत होता. बेव्हिन म्हणाला,

" मी या परिषदेला एक गोष्ट नीट ध्यानात ठेवण्यास सांगतो. राज्यक्रांतीनें समाजाचें, स्वरूप बदलते, पण भूपृष्ठाचें स्वरूप बदलत नाही. राज्यक्रांति झाली तरी पूर्वीच्या अमदानींतील भौगोलिक गरजा कायम राहतातच. मी १९२० पासून रशियाविरुद्ध लढू नये या मताचा आहे. माझे हें मत कांहीं आज नव्यानं बनलेलें नाहीं. १९२० पासून माझे मत आहे की त्यावेळीं जो शांततेचा तह म्हणून करण्यात आला—तो खरोखरच तह नसून ती शस्त्रतहकुबीच होती—तो अपयशीच झाला. त्या अपयशाचें कारण रशियाबद्दल संयुक्त राष्ट्रांच्या मनात अढि असून त्यामुळे त्यानीं रशियाला व्हर्साय येथे तह परि-षदेला बोलाविले नाहीं हें होय. तेथं रशियाला बोलावण्यात आले असतें तर न गोठणाऱ्या खुल्या समुद्रात रशियाला बंदर हवें आहे तो प्रश्न सुटला असता. रशियाच्या परराष्ट्रधोरणातला तो एक फार महत्त्वाचा मुद्दा असून एवढ्या मोठ्या राष्ट्राची न गोठणाऱ्या खुल्या समुद्रातील बंदराची गरज ही खरी गरज आहे. बहुधा लॉर्ड बीकन्सफील्ड एकदा म्हणाला होता, कीं इंग्लंड आणि फ्रान्स एकजूट झाले तर तो आंतरराष्ट्रीय शांततेचा विमा उतरल्यासारखें होईल. पण इंग्लंड, फ्रान्स आणि रशिया एकजूट झाल्यास शांततेची पक्की खात्रीच झाली.' आता शस्त्रास्त्रे अधिक व्यापक झाली आहेत. त्यामुळें आपण अधिक पुढें जाऊन अमेरिका, ब्रिटन व रशिया यांच्या सख्ख्याचा विमा उतरला पाहिजे. त्यासाठीं अवश्य तीं बंधनें आम्हीं पत्करलीं पाहिजेत."

## विरोधास सुरवात

बेव्हिननें हें भाषण केल्यानंतर जी निवडणूक झाली तींत खरोखर मजूर पक्ष बहुसंख्येने निवडून आला त्याला मन्त्रिपद मिळालें व बेव्हिन स्वतां परराष्ट्रमंत्री झाला. पण रशियाला न गोठणाऱ्या खुल्या समुद्रात बंदर मिळवून देण्याचें धोरण त्यानें कधींच अमलात आणले नाहीं. ग्रीसमध्ये रशियाविरोध आणि कम्युनिझम्‌विरोध हें जें चर्चिलचें धोरण बेव्हिननें पुढें चालू ठेवले आणि शेवटीं ग्रीसचीं सूत्रे अमेरिकेच्या हाती सुपूर्द केली तसेंच याहि बाबतींत बेव्हिननें केलें.

१९४५ च्या सेप्टेंबर-ऑक्टोबरमध्यें म्हणजे जपानचा पराभव झाल्यानतर लंडनला परराष्ट्रमन्त्र्याची परिषद भरली. त्या परिषदेंत रशियानें न गोठणाऱ्या खुल्या समुद्रात आपणाला बंदर हवें म्हणून दार्दानेल्सचा प्रश्न काढला. बेव्हिनचें वर उल्लेखिलेले भाषण फक्त कांहीं आठवड्यापूर्वींच झालें होतें व रशियावर ब्रिटनचा अविश्वास व्हावा असें नवें कारण काहींहि घडलें नव्हते तें भाषण मनांत ठेऊनच रशियानें ही मागणी केली होती. रशियानें सदर परराष्ट्रमंत्रि-परिषदेंत सुचविलें कीं,

“ ( १ ) तुर्कस्तानमधील अर्मेनियाचे कार्स व अर्धाहान हे दोन परगणे रशियातील अर्मेनियाला जोडावे,

( २ ) बॉस्फोरस व दार्दानेल्स या सामुद्रधुन्यांच्या नियंत्रणांत तुर्कस्तान-बरोबर रशियाला भागीदारी मिळावी,

( ३ ) हें नियंत्रण यशस्वी करता यावें यासाठीं सदर सामुद्रधुन्यांची तटबंदी करावी,

( ४ ) आणि इटालिअन ट्रिपोलींत रशियाला आरमारी तळ मिळावा. ”

ही परराष्ट्रमंत्रिपरिषद गुप्तच होती. पण परिषदेंतल्या हकीकती बाहेर कळल्या, त्यावरून समजलें कीं बेव्हिननें टेबलावर मुठी आपटून, सतापून रशियाच्या मागणींस स्पष्ट नकार दिला. पुढें नोव्हेंबरमध्यें या प्रकरणाचा अप्रत्यक्ष उल्लेख करून बेव्हिन म्हणाला,

“ ब्रिटिश कॉमन्वेल्थनें कोणास इजा केली नव्हती, कॉमन्वेल्थ युद्धांत लढलें. होतें. तरी पण कॉमन्वेल्थच्या गळ्यावर जर एकाद्या बड्या राष्ट्रानें सुरी टेकली तर थोडा संशय आल्याशिवाय कसा राहील ? ”

रशियाने केलेली मागणी अगदींच अयुक्तिक होती असें बेव्हिनला वाटलें काय ? बव्हिननेंच रशियाला न गोठणाऱ्या खुल्या समुद्रांतलें बंदर देणें योग्य आहे असें ऐन निवडणुकीपूर्वी जाहीरपणें म्हटलें होते. 'मॅंचेस्टर गार्डियन'नें जुलै १९४५ मध्ये बहुधा बेव्हिनच्या भाषणासच उद्देशून दार्दानेल्सच्या प्रश्नाची पार्श्वभूमि दिली होती. 'गार्डियन' लिहितो,

"एकदा अलेक्झांड्रिया येथे आरमारी तळ बांधून ब्रिटनच्या हवालीं केला म्हणजे जुन्या काळी घेण्यात येणाऱ्या खबरदारीची गरज नाहीं. १९०३ साली इंपीरिअल डिफेन्स कमिटी जी बसली होती तिने रशियाला दार्दानेल्स व बॉस्फोरस या सामुद्रधुन्या खुल्या सोडण्याने आमच्या भूमध्य समुद्रातील रणयोजनेस धोका पोचणार नाही असें मत दिले होतें. १९०७ साली इंग्लंड व रशिया यांचें सख्य घडविण्याचा प्रयत्न चालला असता सर एडवर्ड ग्रेने रशियाला कळविले की सामुद्रधुन्यांचा रस्ता रशियाला बंद करण्याची आम्हाला मुळींच गरज नाहीं, पण खरी अडचण ब्रिटिश लोकमताची आहे. लोकांच्या मनात जुनी अढी अजून कायम आहे. लोकांच्या मनात रशियाबद्दल सख्याची भावना निर्माण होईपर्यंत रशियानें थांबले पाहिजे. रशियाच्या रण-विषयक योजनेच्या नेहमी दोन बाजू असतात. काळ्या समुद्रात बाहेरील जहाजांना येण्यास बंदी करणें आणि भूमध्य समुद्रात रशियन जहाजांना येण्यास मुभा असणे. पैकी पहिले उद्दिष्ट रशियाच्या दृष्टीने अवश्य असल्यानें अधिक महत्त्वाचे आहे. रशियाची ही मागणी चढाईच्या दृष्टीची नसून बचावाच्या दृष्टीची आहे ही एक गोष्ट ब्रिटनच्या लक्षात आली असती तर ब्रिटनचे धोरण संशयग्रस्ततेचें झाले नसते; क्रिमियन युद्धाने आणलेली संकटे आणि १८७८ साली अगदी युद्धावर बेतले होते ती परिस्थिति हे सर्व टाळता आले असते. आता इंग्लंड व रशिया यांची मैत्री झाली आहे. आता पूर्वग्रहामुळें दृष्टि अंध असण्याचें कारण नाही. अमेरिकेला न्यू फाउंडलंडमध्ये आणि ब्रिटिश वेस्ट इंडीजमध्ये भाड्याने लढाऊ तळ देणें जर योग्य आहे तर बॉस्फोरस व दार्दानेल्स सामुद्रधुन्यात लढाऊ तळ रशियाला हवेसे वाटणें हे रास्त असून केवळ तुर्कांच्या सौजन्यावर रशियानें विसंबून राहावें असें अपेक्षिणें अयोग्य आहे. आमचे लढाऊ तळ जगभर आहेत. अर्थात् रशियाचा फार मोठा औद्योगिक मुलूख व युक्रेन हा शेतीचा

मुलूख यांवर कोणाची झडप येऊ नये यासाठीं आपला समुद्रमार्ग रक्षिणें हें रशियाला अवश्य वाटणारच."

तुर्कस्तान व दार्दानेल्स यांजपासून रशियाला कोणती भीति वाटते याविषयीं अलारिक जेकब हा 'सडे एक्सप्रेस'चा बातमीदार लिहितो,

"तुर्कस्तान व सामुद्रधुन्याचा प्रदेश येथें रशियाचें नाजूक अंग उघडें पडलें आहे. रशियाच्या सेबस्टोपोल शहरापासून तुर्कस्तानचे उत्तरेकडील आरमार-तळ फक्त १७० मैल अंतरावर आहेत. बेल्जम व हॉलंड येथे विदेशी सैन्य आले असता ब्रिटनला जी भीति वाटेल तीच तुर्कांच्या आरमारतळावर परदेशी लष्करी लोक आल्यास रशियाला वाटेल." पण दार्दानेल्सच्या प्रश्नाचा बेव्हिनने विचारहि करण्याचें नाकारलें. १९४२ सालीं झालेला २० वर्षांचा अँग्लोरशियन सरव्यल्याचा करार ५० वर्षांचा करावा अशी मागणी रशियाकडे बेव्हिनने केली. हा करार वास्तवीक बिनमुदत होता आणि एकाही पक्षास तो रद्द करून घ्यायचा असल्यास वीस वर्षांशेवटीं तो रद्द करून घेता येत होता. फक्त आगाऊ एक वर्षांची नोटिस दिली म्हणजे झालें. ही वीस वर्षांची वैकल्पिक मुदत ५० वर्षांची व्हावी अशी बेव्हिनची मागणी होती. त्यावर स्टालिन म्हणाला,

"मुदत वाढवायला हरकत नाही. पण प्रथम करार केला तो जर्मनीचा पराभव डोळ्यापुढें ठेऊन केला होता. आता युद्धोत्तर परिस्थितींत त्याच्या अटी बदलायच्या तर नव्या परिस्थितीस योग्य अशा नव्या शर्ती घालाव्या लागतील." अर्थात् बेव्हिननें तो विषय पुन्हा काढला नाही हे सांगणे नकोच.

---

## : ६ : अमेरिकेचा प्रवेश

पण ग्रीस अथवा दार्दानेल्सबाबत बेव्हिन चर्चिलचेच धोरण पुढें चालवीत होता एवढें म्हणण्यानें त्याच्या धोरणाचें वर्णन पुरें होत नाहीं. तो ब्रिटनचें परराष्ट्रीय धोरण अमेरिकेच्या हवाली करीत होता. दुसऱ्या महायुद्धांत अमेरिका अत्यंत

प्रबळ झाली व ब्रिटन अगदीं दुबळे झालें, म्हणून साम्राज्यांतले तनखे यायचे कमी झाले व साम्राज्याचें राजकारण महागडे झालें. तेव्हां साम्राज्यमार्ग सुरक्षित ठेवण्याची ब्रिटनची जोखीम अमेरिकेच्या हवालीं करणें एवढेंच काम बेव्हिनचे होते. प्रसिद्ध अमेरिकन लेखक वॉल्टर लिपमन यानें 'न्यूयॉर्क हेरल्ड ट्रिब्यून' मध्यें इंग्लंडच्या सोशॅलिस्ट मंत्रिमंडळाला चांगल्या कानपिचक्या देऊन हा मुद्दा विशद केला आहे. तो लिहितो,

"ब्रिटनला जो सत्तासमतोल भूमध्य समुद्र व मध्यपूर्व येथे परत यायला हवा आहे, तो परत आणण्यास अमेरिका तेथे खुषीनें येईल. पण ती स्वतःच्या अटींवर येईल, आपल्या हेतूसाठीं आपल्या पंजानें इंग्लंडच्या शेंगा फोफाट्यांतून काढायला येणार नाहीं. आता अमेरिकेला स्वतःच भूमध्य समुद्रांत बलवान राष्ट्र व्हायचें आहे."

रशियाची साम्राज्यवाद हटविण्याचें कंकण अमेरिकेनें बांधले आहे असें सांगून लिपमन सांगतो,

"याचा परिणाम आतां असा होत आहे कीं आम्हीं आतां साऱ्या जगाच्या विस्तारात मुत्सद्दोगिराच्या लढ्यात सांपडलों असून तो लढा अतीशय गंभीर आहे. आता आपणाला काय साध्य केलें पाहिजे आणि त्यासाठीं केवढी शक्ति आणि केवढे वर्चस्व आपण संपादलें पाहिजे याचा बरोबर अंदाज करून या मुत्सद्दोगिरीच्या मोहिमेची आपण आंखणी केली पाहिजे. तसें न केलें तर आपणांस यश येणार नाहीं, उलट त्यांतून सर्वविध्वंसक युद्ध निर्माण होईल हें आपल्या लक्षात येणें अवश्य आहे. आपलें सामर्थ्य एकवटण्यासाठीं अशी जागा अमेरिकेनें दिली पाहिजे कीं युद्ध आलेंच तर रशियाला प्रथमपासूनच बचावाच्या भूमिकेनें रहावें लागेल. पूर्व भूमध्य समुद्रांतून काळ्या समुद्रांत जेथून रस्ता जातो ती अशी जागा आहे. तेथं अमेरिकेची आरमारी आणि वैमानिक दळें आणल्यास रशियाच्या प्राणभूत अशा उत्पादनकेन्द्रावर भडिमार करता येईल आणि रशियन लाल सैन्याचें कंबरडें सहज मोडता येईल."

बेव्हिन पूर्वभूमध्य समुद्रांतील ग्रीस व दार्दानेल्स यासबंधानें जुनें धोरणच कां अमलात आणीत होता आणि पूर्व भूमध्य समुद्रांतलें राजकारण अमेरिकेनें आपल्या अंगावर कां घेतलें याचा खुलासा याहून अधिक चांगल्या शब्दांत करता येणारच नाहीं. अमेरिकेच्या इतिहासांत ही सर्व अगदीं नवी घटना

आहे. पहिल्या महायुद्धापूर्वी अमेरिका विदेशीय राजकारणांत फारशी कधींच पडली नव्हती. पहिल्या महायुद्धापूर्वी अमेरिकेनें पासिफिक महासागरांतली अनेक बेटें घेत घेत फिलिपाईन पादाक्रांत केलें व चीनची बाजारपेठ साऱ्या जगाला खुली असावी असें धोरण अवलंबिलें जगांत आपला पक्का माल विकावा व जगापासून कच्चा माल घ्यावा एवढीच अमेरिकेची जगासंबंधानें दृष्टि होती. पहिल्या महायुद्धांत, युद्ध सुरू झाल्यानंतर अडीच वर्षांनीं, अमेरिकेनें भाग घेतला आणि पुढें सवा वर्षांत जर्मनीचा पराभव करून तहपरिषदेंत भाग न घेतांच अमेरिकेनें युरोपांतून अंग काढून घेतलें. त्यानंतर दुसरें महायुद्ध सुरू होईपर्यंत अमेरिकेनें युरोपशीं व जगाशीं व्यापार केला. पण जगांतील राजकारणाशीं कांहींहि संबंध ठेवला नाहीं.

दुसऱ्या महायुद्धांतहि युद्धसुरवातीनंतर सवादोन वर्षांनीं अमेरिका युद्धांत खेचली गेली. त्यानंतर साडेतीन वर्षांनीं जर्मनी व जपान यांचा पराभव होऊन युद्ध संपलें. पण जर्मनी व जपान यांचा पराभव झाला तरी रशिया प्रचंड शक्तिनिशीं युद्धांतून बाहेर पडला. रशियाची शस्त्रशक्ति तर मोठी होतीच, पण क्रांतिशक्ति फारच प्रचंड होती. इंग्लंड, फ्रान्स इत्यादि पुढारलेलीं राष्ट्रें अथवा आशियाभर पसरलेलीं मागासलेलीं राष्ट्रें यापैकीं कोणालाच रशियाची शक्ति आटपणारी नव्हती. म्हणून पाश्चात्य भांडवलदार राष्ट्रांनीं अमेरिकेला युरोपातून परत न जाता रशियाच्या आक्रमणशक्तीला मागें हटविण्यासाठीं जगभर आपला शस्त्रसंभार पसरण्याला प्रोत्साहन दिलें.

युद्ध संपलें त्यावेळीं बिर्नेस हा अमेरिकेचा परराष्ट्रमंत्री होता. रूझवेल्टच्या काळापासून रशियाशीं स्नेहभावानें वागण्याचें अमेरिकेचें धोरण चालू होतें, त्याचाच बिर्नेसनें प्रथम अवलंब केला. ब्रिटिन व रशिया यांचे मध्यें जें भांडण आहे तें मिटविण्यासाठीं आपण मध्यस्थी केली पाहिजे अशा भूमिकेनें तो तेव्हां बोलत असे. ब्रिटिश मुत्सद्यांना याचा संताप येई. ' अमेरिकेनें आमची बाजू घेऊन रशियाशीं भांडलें पाहिजे ' असा ब्रिटिशांचा आग्रह होता. अमेरिकेंत सिनेटमध्यें म्हणजे वरिष्ठ सभागृहात बड्या धनपतींचे प्रतिनिधि असतात. त्यांचाहि बिर्नेसला ' तूं रशियाचा विरोधी हो ' असाच तगादा होता. अखेरीस बिर्नेसनें ही रशियाविरोधी भूमिका पत्करली व स्वाभाविकपणेंच तो त्या आघाडीचा पुढारीच झाला. बिर्नेसच्या या अवस्थांतराचें वर्णन करतांना लिपमन म्हणतो,

"युरोप आणि मध्यपूर्व याबाबत रशिया आणि ब्रिटन यांचे दरम्यान अमेरिका, मध्यस्थी करीन असे. १९४६च्या फेब्रुवारींत अमेरिकेनें हें धोरण बदलले. तेव्हांपासून अमेरिकन परराष्ट्रमंत्री बिर्नेस यानें हें जुनें धोरण भिरकावून दिले. ब्रिटनच्या दडपणामुळें आणि अमेरिकन सेक्रेटरिअट व काँग्रेस यातील महत्त्वाचीं माणसें यांच्याच दडपणामुळे बिर्नेसने हें धोरण बदललं."

अशा प्रकारें रशियाविरोधी आघाडीचें पुढारीपण घेण्यासाठीं अमेरिकेनें युरोपच्या व जगाच्या राजकारणांत प्रवेश केला.

पण लिपमन म्हणतो त्याप्रमाणें, ब्रिटनच्या शेंगा भाजण्यासाठीं अमेरिका जगाच्या राजकारणांत शिरली नाहीं, तर आपल्या स्वार्थासाठीं शिरली. या नव्या धोरणाचीं बीजें अमेरिकेच्या, युद्धामुळें बदललेल्या आर्थिक परिस्थितींत होती. १९२९ च्या आर्थिक मंदीनें अमेरिकेच्या आर्थिक संघटनेस फार मोठा तडाखा दिला. अमेरिकेची उत्पादनशक्ति कमी कमी होत जाऊन अगदीं ६० टक्क्यापर्यंत खालीं आली. पुढें युरोपांत युद्धाचें वारें वाहू लागलें व अमेरिकेच्या शस्त्रास्त्रकारखान्यांना मालाच्या मागण्या येऊं लागल्या. त्यामुळें अमेरिकेचें उत्पादन वाढू लागलें. दुसऱ्या महायुद्धांत युरोपातील सारीं राष्ट्रें उध्वस्त स्मशानें झालीं. पण अमेरिकेचं उत्पादन एकसारखे वाढत जाऊन साऱ्या जगाच्या एकूण औद्योगिक उत्पादनाच्या दोनतृतीयांश उत्पादन आतां एकट्या अमेरिकेचें होत आहे.

युद्ध संपल्यानंतर एवढी प्रचंड यंत्रसामुग्री आणि मजूर यांना बेकारींतून वांचवावें कसें हा प्रश्न फार महत्त्वाचा होता. हेन्री वालास यानें 'सामान्य माणसाचें शतक' या विषयावर दिलेल्या रेडिओवरील व्याख्यानात रूझवेल्टच्या न्यू डील तत्त्वानुसार हे प्रश्न सोडविण्याची योजना मांडली. या योजनेचें एकंदर स्वरूप पुढीलप्रमाणें होतें. धनिकावर कर वाढवून समाजहिताचे कायदे करावे आणि उपभोग्य माल जनतेला अधिक मिळेल असें करावें, घरें बांधण्याची योजना मोठ्या प्रमाणावर आखावी, भावनियंत्रण करून आर्थिक नियोजन करावें, युरोपांतील व मागसलेल्या प्रदेशातील राष्ट्रांना आर्थिक अथवा राजकीय वर्चस्व न आणता साहाय्य द्यावें. रशियाला कारखानदारीचें साहित्य पुरवावें व रशियाकडून कच्चा माल घ्यावा, रशियाला सैबेरियाची प्रगति करण्यास, रस्ते बांधण्यास साहित्य पुरवावें इत्यादि प्रकारची योजना वॉलासने मांडली.

पूर्वी वेन्डेल विल्कीनें व अलीकडे वॉल्टर लिपमननें अशाच योजना सुचविल्या होत्या. पण रूझवेल्टकालीन ध्येयवाद युद्धोत्तर कालीं कोणांतच उरला नव्हता. युद्धकाळीं उत्पादन वाढत गेलें तसतशीं धनोत्पादनसाधनें थोडथोड्या लोकांच्या हातीं गेलीं. शस्त्रास्त्रकारखानदारांच्या हातीं धनसत्ता केन्द्रित झाली. त्यांच्या दृष्टीनें जगांतील शस्त्रास्त्रें कमी होण्यांत मुळींच फायदा नव्हता. शस्त्रास्त्रकार-खान्यानीं जास्तींत जास्त नफा मिळविला आणि अमेरिकेस साऱ्या जगात बलशाली करून टाकलें. या राष्ट्रीय बलशालित्वाची व जगावरील वर्चस्वाची एक नवी चटक अमेरिकन जनतेस लागली. अमेरिकेंत अनेक संस्थानें असून राष्ट्रीय ऐक्याची भावना पूर्वी कमी असे. पण युद्धानें ती जागृत व दृढ होऊन आपलें राष्ट्र बलसंपन्न असावे अशी तृष्णा अमेरिकन जनतेत उद्भवली. स्वदेशाभिमान, रशियाद्वेष, क्रांतिद्वेष या नव्या भावना वाढीस लागल्या. यामुळे जगास मदत करण्याऐवजीं जगावर प्रभुत्व गाजविण्याची इच्छा अमेरिकेत बळावली.

त्याबरोबर रूझवेल्टची पुनर्घटनेची योजना मागे पडून ' नॅशनल असोसि-एशन ऑफ मॅन्युफॅक्चरर्स ' म्हणजे राष्ट्रीय कारखानदार संघ, याच्या योजना पुढें आल्या. संघानें करवाढ आणि समाजसुधारणेचे कायदे हें धोरण अमान्य केलें, उपभोग्य माल जनतेच्या अधिकाधिक उपयोगी लावण्याची बॉलासची योजना फेटाळून लावली गेली. धंद्यावरील नियंत्रणें रद्द करावीं, खाजगी मालक-शाहीचें स्वातंत्र्य वाढवावें, कर कमी करावे, विदेशीं निर्यात तिप्पट करावी आणि मग अर्थात शस्त्रास्त्रवाढहि करावी ही योजना प्रथम गुप्तपणें सरकारवर लादली गेली.

यानंतर पुढें आलेल्या ट्रूमनयोजना, मार्शलयोजना या सर्वांचा अर्थ वरील नव्या धोरणाअन्वये उत्तम लागतो. अमेरिकेंत जी नवी तत्त्वचर्चा सुरू झाली तिचें स्वरूप व्यक्तिस्वातंत्र्य टिकेल कसें हें होतें आणि त्याचा अर्थ रशियांतील कम्युनिस्ट तत्त्वज्ञानापासून भांडवलशाही स्वातंत्र्याचा टिकाव कसा लागेल असा हा चर्चेचा विषय अमेरिकेंत सुरू झाला होता ' सुखी अमेरिकन जीवन तें हें, कम्युनिस्ट विचारांनीं हें संकटांत येतें ' असे विचार मांडण्यांत येऊ लागले. रूझवेल्टचा ध्येयवाद जिवंत होता तोंवर युरोपचें दुःखनिवारण व पुनरर्सोहतीकरण यासाठीं, म्हणजे ' अन्रा ' योजनेप्रमाणें जगाच्या मदतीसाठीं

अमेरिका पुढें सरसावली व युरोपमध्यें अमेरिकेचा सर्वत्र शिरकाव झाला. पुढें हा ध्येयवाद मावळल्यावर युरोपांत अमेरिकन वर्चस्वानें आपले पाय रोवले आणि कम्युनिझमविरोधी आघाडी उभारण्याचे व त्या निमित्तानें युरोप-वर वर्चस्व स्थापण्याचे उद्योग अमेरिकन भांडवलशाहीनें केले. अमेरिकन पर-राष्ट्रमंत्रि बिर्नेस याच्या धोरणांत साहजिकच रशियासंबंधानें फरक पडला, तो रशियाविरोधी बनला आणि ब्रिटनचे जागतिक राजकारणांतलें निसटत चाललेलें स्थान अधिक जोरकसपणें पटकावण्याचें अमेरिकेनें ठरविलें.

इंग्लंड हे अमेरिकेला ही नवी भूमिका स्वीकारण्याविषयीं उत्तेजनच देत होतें. ब्रिटिश परराष्ट्रधोरणांतली ही एक जुनी प्रवृत्ति आहे. गेल्या शतकांत इंग्लंडचें साम्राज्य हिंदुस्थान व आग्नेय आशियांत पसरलें आणि चीनमध्येंहि इंग्लंडचें बरेंच वर्चस्व स्थापन झालें. त्यावेळीं झारचा रशिया चीनवर आपली साम्राज्यलोभी दृष्टि फेकूं लागला. जपानचें बळहि वाढूं लागलें. पुढेंमागें हें सर्व वाढतें परकी बळ आपल्या वर्चस्वास धोका आणील अशी ब्रिटनला भीति वाटूं लागली, आणि आपणांस कोणी पाठीराखा मिळावा अशी ब्रिटनला इच्छा झाली. त्या वेळीं अमेरिका पॅसिफिकमधील बेटें सर करीत करीत आशियाच्या पूर्व-किनाऱ्याकडे येत होती. अमेरिकेला या कार्यात ब्रिटननें त्यावेळीं विरोध केला नाहीं व फिलिपाइन बेटें १८९८ सालीं अमेरिकेनें घेतलीं. तेव्हा ब्रिटननें अमेरिकेच्या या नव्या साम्राज्यविस्ताराचें स्वागतच केले. त्यामुळेंच पुढें चीन हे राष्ट्र रशिया अथवा जपान यांच्या घशात जाणें अशक्य झालें. दुसऱ्या महायुद्धानंतर जपानजवळचीं बेटें अमेरिकेला विश्वस्त या नात्यानें आपल्या ताब्यांत घेण्यास ब्रिटननें उत्तेजन दिलें. दुसऱ्या महायुद्धांत अमेरिका येण्यापूर्वीच वेस्टइंडीज् व बर्मूडा या अमेरिकेजवळील ब्रिटिश मुलखांत ब्रिटननें अमेरिकेला लढाऊ तळ बांधण्यास परवानगी दिली. युद्धकाळांत आशिया व पासिफिक महासागर यांतील अनेक लढाऊ तळ अमेरिका वापरीत होती. इंग्लंड व अमेरिका यांच्या संयुक्त आधिपत्याखालीं महायुद्धात सैन्यें लढलीं, त्यांचीं सैन्यें, आरमारे, विमानदळें युद्धकाळांत एकरूप पावलीं व अर्थात ब्रिटनपेक्षा अमेरिकेचें त्यांच्यावरचें वर्चस्व वाढलें.

### ब्रिटनचें धोरण अमेरिकेच्या लगामीं

ब्रिटनचें साम्राज्यबळ कमी झाले तसतसे ब्रिटनचें परराष्ट्रीय राजकारण

अमेरिकेच्या हातीं येऊं लागलें. या सर्व पालटणाऱ्या राजकारणावर चर्चिलनें अमेरिकेंतील मिसूरी संस्थानांतल्या फुल्टन शहरीं ५ मार्च १९४७ या दिवशीं भाषण करून शिक्कामोर्तब केलें. ट्रूमन त्या सभेस अध्यक्ष होता. चर्चिल म्हणाला,

"युद्धांत हें जे अँग्लोअमेरिकन सहकार्य झालें आहे तें अधिक दृढ करावें आणि कम्युनिझमच्या प्रसारास या संयुक्त बलानें प्रतिकार करावा. सोव्हिअट रशिया अनावर झाला असून जगांतील कम्युनिस्ट पक्ष हे दुष्ट आहेत. जगातील सुसंस्कृति नष्ट करण्याचा चंग त्यांनीं बांधला आहे. बुद्धिवाद, सौजन्य यांना ते दाद देत नाहींत. आतां अमेरिका व ब्रिटन यांनीं सत्तासमतोलाच्या चंचल व अनिश्चित मार्गानें न जाता प्रचंड शक्ति एकवटून बलाधिक्यानें या संकटाचा प्रतिकार केला पाहिजे."

ट्रूमननें हें धोरण अवलंबिलें होतेंच. त्याचें पुढील मार्गदर्शन चर्चिलनें या भाषणांत केलें आहे. कम्युनिझम् व सोव्हिअट रशिया यासंबंधानें हे धोरण केवळ चर्चिल व अमेरिका यांचेंच होतें असें नव्हे तर ब्रिटिश मजूरमंत्रि-मंडळाचेंहि होतें. भांडवलशाहीच्या रक्षणाचीच चिंता ब्रिटिश मजूरमंत्रि मंडळालाही होती. १९४६ साली पॅरिसमध्ये भरलेल्या परराष्ट्रमंत्रिपरिषदेंत पूर्व युरोपांतील राष्ट्रांचा प्रश्न चर्चेस निघाला. त्या परिषदेशीं जोडून युरोपीअन इकॉनॉमिक कमिशनची बैठक झाली. या बैठकीचें वर्णन करतांना लंडनचा 'टाइम्स' लिहितो,

"आज सकाळीं युरोपीअन इकॉनॉमिक कमिशनच्या बैठकींत रुमानियांत विदेशी धंदेवाल्यांना कोणतें स्थान असावें हा प्रश्न निघाला. सुरवातीपासून 'खाजगी मालकशाही विरुद्ध सरकारी नियंत्रण' असें वादास स्वरूप आलें. युद्धापूर्वी ब्रिटिशासारख्या परकी धंदेवाल्यांना ज्या जादा सवलती होत्या त्या त्यांना युद्धोत्तरकाळींहि मिळाव्या अशी ब्रिटनची मागणी होती. तिला विरोध करतांना रशियन प्रतिनिधिमंडळाला पायरी पायरीनें भांडवलशाहीवर हल्ला आणि नियंत्रित अर्थसंघटनेचें समर्थन ही भूमिका घ्यावी लागली. या भूमिकेस विरोध करतांना ब्रिटिश ( सोशॅलिस्ट मंत्रिमंडळाचा ) प्रतिनिधि व्यक्तिस्वातंत्र्य आणि खुली चढाओढ यांचें समर्थन करीत होता! अमेरिका व ब्रिटन या दोन्ही राष्ट्रांच्या प्रतिनिधींची भाषा एकच ( भांडवलशाहीच्या पुरस्काराचीच )

होती. रशिया व अँग्लोअमेरिका यांमध्यें निर्माण झालेला हा मतभेदाचा खदक वाद'विवादानें बुझला नाहीं."

डॅन्यूब नदीच्या खोऱ्यातील राष्ट्रांत पाश्चात्य राष्ट्राचा उपभोग्य व भांडवली माल येण्याला मुक्तद्वार असावें अशीहि एक मागणी बेव्हिन व बिर्नेस यांनीं केली होती. पण अमेरिकेची प्रचंड उत्पादन शक्ति व अफाट संपत्ति याण्हें पूर्व युरोपीय राष्ट्रांचा निभाव न लागून तेथें पाश्चात्यांची साम्राज्यशाही येईल या भयानें रशियानें ती मागणी साफ नाकारली. पॅरिसच्या परराष्ट्रपरिषदेनंतर ' अन्रा ' तर्फे युरोपीय राष्ट्रांना देण्यांत येणारी मदत संपविण्यांत आली व पर-राष्ट्रांत पुरोगामी गटांना कम्युनिस्ट विरोधाच्या नांवाखालीं विरोध करून सनातनी व प्रतिगामी पक्षांना पाठबळ देण्याचें धोरण सुरू करण्यांत आलें.

ब्रिटनचें अंतर्गत धोरण पार्लमेंटरी कायद्यानें सोशॅलिझम्‌कडे जाणारें आहे. यासाठी ब्रिटनला आंतरराष्ट्रीय शांतता हवी आहे. पण रशिया व कम्युनिझम् जेथें तेथें आंतरराष्ट्रीय शांततेस धोका आणतात असें ब्रिटनच्या मनानें घेतलें आहे. जगांत कोणत्याहि देशांत, विशेषतः ब्रिटनच्या साम्राज्यरस्त्यावर एकाद्या राष्ट्रांत थोडी जागृति, खळबळ दिसली कीं तेथे कम्युनिझम्‌चें पिशाच्च ब्रिटनला दिसतें, तेथें मागसलेल्या राज्यसत्तेला ब्रिटन पाठिंबा देत व त्यामुळें मग खरोखरच दंगली माजतात. असेंच ग्रीसमध्ये घडलें.

रशियाची सर्वत्र कोंडी करणें हेंहि ब्रिटनचें महत्त्वाचें धोरण आहे. यासाठींच बेव्हिननें दार्दानेल्सबद्दलचें आपलें धोरण बदललें. परराष्ट्रसंबंधांत व्यक्तिनिष्ठ भांडवलशाहीचा पुरस्कार करायचा हेंहि ब्रिटनचें एक महत्त्वाचें धोरण असल्याचें वर डान्यूब खोऱ्यांतील राष्ट्रासंबंधीच्या वाटाघाटींत दिसून आलें आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर ब्रिटनची आंतरराष्ट्रीय शक्ति कमी झाली आणि अमेरिकेची अफाट वाढली. ब्रिटन अंतर्गत कारभारांत तरी सोशॅलिस्ट आहे. पण अमेरिका अंतर्गत कारभारांत एकांतिक भांडवलशाहीवादी असून परराष्ट्रधोरणांत ती सर्वत्र जुनी समाजव्यवस्था टिकविण्यासाठीं चढाईखोर झाली असें ग्रीसमध्यें दिसून आलें. कोणताहि सामाजिक बदल हा कम्युनिझम्‌च होय व तो ठोकून काढला पाहिजे, असा अमेरिकेचा सिद्धांत आहे. ब्रिटननें आपलें आंतरराष्ट्रीय सामर्थ्य कमी झालेलें पाहून आपलें प्रतिगामी

परराष्ट्रीय धोरण अमेरिकेच्या हातीं सोपविले. अमेरिकेनें ते कसें व का स्वीकारलें व ग्रीसमध्यें त्याची कशी बजावणी केली हे वर आलेंच आहे.

ग्रीसमध्यें १९४४ पासून ब्रिटननें हस्तक्षेप केला व पुढील तीन वर्षांत कोट्यवधि पौंड उडविले. त्यामुळें ब्रिटनचा खजीना रिकामा होऊन ब्रिटननें अमेरिकेकडे साहाय्यार्थ धाव घेतली. ग्रीसच्या राजानेंहि अमेरिकेकडे साहाय्य मागितलें तेव्हां परराष्ट्रांतील राजवटींना मदत करण्यासाठीं अमेरिकेचा अध्यक्ष ट्रुमन यानें १९४७च्या मार्चमध्यें एक धोरण जाहीर केलें. 'ट्रुमनधोरण' या नावानें ते प्रसिद्ध आहे. हें धोरण जाहीर करतांना ट्रुमन म्हणाला,

"शांततेपेक्षाहि अमेरिकेला अधिक महत्त्वाची वाटणारी अशी आणखी एक गोष्ट आहे. ती म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य, धर्मस्वातंत्र्य, मतप्रसारस्वातंत्र्य आणि साहसस्वातंत्र्य (म्हणजे खाजगी धंदे करण्याचें स्वातंत्र्य). हे धंदेस्वातंत्र्य प्राप्त व्हावें यासाठीं आंतरराष्ट्रीय व्यापाराची पद्धति हवी आहे ती अशी असली पाहिजे कीं तींतले सर्व निर्णय सरकारनें न घेतां खाजगी विक्रेते आणि गिऱ्हाइक यांनीं ठरविले पाहिजेत. असे निर्णय प्रत्यक्ष चढाओढीच्या परिस्थितींत घेतले पाहिजेत. फक्त हक्कदारी आणि कार्टेल्स माजूं नयेत एवढी खबरदारी घेतली म्हणजे झालें. ज्या व्यापारव्यवहारात सरकार निर्णय ठरवितें त्यात साहसस्वातंत्र्य अत्यंत कमी असे. ही पद्धति मागील शतकांत होती. आपण जर साहसस्वातंत्र्यरक्षणासाठीं निकरानें प्रयत्न केले नाहींत तर पुढील शतकात पुन्हां हीच सरकारशाही निर्माण होईल."

ट्रुमनच्या या धोरणांत फार खोल अर्थ आहे. यात फॅसिझमूला विरोध आहे तसाच सोव्हिअट पद्धतीलाहि आहे, इतकेंच नव्हे तर मुख्य म्हणजे ब्रिटिश सोशॅलिस्ट पद्धतीलाहि विरोध आहे व व्यक्तिनिष्ठ भांडवलशाही जगात नांदावी यासाठीं जगांत शांतताभंग करण्यासहि अमेरिका तयार असल्याचें अमेरिकेच्या अध्यक्षानें या भाषणांत स्पष्ट केले आहे. १९४३ सालीं युद्ध चालू असता इटालींत जर्मन फळी प्रथम फुटली तेव्हां जे लष्करी सरकार स्थापण्यांत आलें त्यानें फॅसिस्ट पोलिसाच्या हातीं राज्यकारभार दिला. आणि पुढें ग्रीसमध्यें अँग्लोअमेरिकनांनीं हस्तक्षेप करून प्रतिगामी गटाची झोटिंगशाही चालू दिली; हें लक्षांत घेता अमेरिकेच्या अंकित राहणाऱ्या फॅसिझमूला

अमेरिकेचा विरोध नसून विरोध फक्त सोशॅलिस्ट अथवा कम्युनिस्ट क्रांतीलाच आहे "हेहि स्पष्ट होतें. अँग्लो-अमेरिकनाचें हें धोरण निरनिराळया राष्ट्रांत थोड्या फार सारख्याच हुकुमशाही स्वरूपात वजावले गेलें व त्याच्या प्रतिक्रिया दुसऱ्या राष्ट्रांत अत्याचारी व विध्वंसक स्वरूपाच्या झाल्या. इटालींत जर्मन फळी फुटताच ट्रूमनच्या या प्रतिगामी धोरणास मागे दर्शविल्याप्रमाणें प्रथम सुरवात झाली. पण ही गोष्ट ब्रिटिश सोशॅलिस्टांच्याहि लक्षांत लवकर आली नाहीं.

## इटालींत उठाव—आणि दडपण

इटालींत १९२२ सालीं फॅसिझमूचा जो विजय झाला तो सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट या दोन्ही चळवळी दुर्बल असून त्यांच्यात फूट होती म्हणून झाला. दुसऱ्या महायुद्धांत फॅसीझम्‌विरोधी प्रतिकार भुईखालीं गनीमी मार्गानें करतांना सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट हे एकजूट झाले व यावेळीं फॅसिझमूला संधि न मिळावी यासाठीं आपली ही एकजूट फुटूं नये असें धोरण ठेवण्याचें सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट या दोघांनींहि ठरविलें. कम्युनिस्टांची संख्या या एकजूटींत थोडीच होती, पण गनीमी लढ्यांतले दर्दी म्हणून ते नेहमीं आघाडीवर असत. 'त्यांनीं एकजुटीनें समाजव्यवस्था बदलण्याचेंहि ठरविलें होतें. ब्रिटिश सोशॅलिस्टांना या प्रकाराची पूर्ण माहिती होती आणि त्यांनीं या एकजुटीच्या गनीमी लढ्याचें व क्रांतिकारक धोरणाचे १९४४च्या फेब्रुवारींत अभिनंदनहि केलें. अभिनंदनाच्या या संदेशांत ब्रिटिश मजूर पक्ष म्हणतो,

"इटालींतील लोकशाही प्रवृत्तीच्या प्रतिनिधींच्या ठिकाणीं रोमच्या बहुमोल व ऐतिहासिक परपरेची प्रेरणा आहे. त्यांनीं नव्या पायावर इटालीची राजकीय व सामाजिक पुनर्घटना करण्याचा प्रयत्न जिव्हाळयानें व सतत करण्याचें ठरविलें आहे. त्यासाठीं ज्यांनीं फॅसीझमूला वर्चस्वशाली केलें आणि इटालीच्या भवितव्यावर वर्चस्व गाजविण्याचा अजूनहि जे प्रयत्न करीत आहेत अशा विश्वासघातकी ठरलेल्या लोकांशीं या क्रांतिकारकांनीं लढाहि दिला. इटालीयन् सोशॅलिस्ट पक्षानें आमच्याशीं बंधुभाव व्यक्त केला तसाच आम्हीहि त्यांच्याशीं व्यक्त करतों. हा पक्ष वीस वर्षांच्या फॅसिस्ट भ्रष्टाकारांतून शाबूत राहिला याबद्दल आम्हांस आनंद वाटतो."

त्याच सालच्या ऑक्टोबरांत ब्रिटिश मजूर पक्षाच्या कार्यकारी समितीनें इटालीयन फॅसिझम्‌विरोधी समितीस एक संदेश पाठविला. त्यांत "कारखाना-कामगार, रेल्वे कामगार, शेतकरी व लढ्यांतील इतर साथीदार हे संयुक्त राष्ट्रांच्या चढाईस मदत करीत आहेत याबद्दल आम्हास आनंद व अभिमान वाटतो. कठोर अशा मानसिक व शारीरिक यातनांच्या काळांत तुम्ही जे धैर्य व जी सहन-शक्ति दाखविली त्यामुळें युरोपांतल्या साऱ्या लोकशाहीप्रेमी बंधूंचा तुम्ही विश्वास व गौरव संपादन केला आहे" असे धन्यतापर उद्गार काढले आणि शेवटीं क्रांतीचा संदेश देतांना म्हटलें आहे कीं "इटालींतील जनतेची सामाजिक, आर्थिक व राजकीय जीवनाची पुनर्घटना करण्याचे तुमचे प्रयत्न फॅसिस्ट राज-वटीमुळें जें अज्ञान, भ्रष्टाचार व कुराज्य माजले त्यामुळें विफल होतील. पण तुम्ही धीर सोडूं नका. फॅसीझमचे अवशेष नष्ट करण्याची तुमची कामगिरी अवघड असून दीर्घकाळ चालणारी आहे. इटालिअन सोशॅलिस्ट मित्राना आम्ही वंदन करतों. फॅसिस्टांच्या खुनी व आक्रमक धोरणानें वीस वर्षांच्या अंधाऱ्या व लज्जास्पद काळांतहि सोशॅलिस्ट आकांक्षा व फॅसीझम्‌चा द्वेष या भावना नष्ट झालेल्या नाहींत. उलट त्या अधिक बलवान व तेजस्वी झाल्या आहेत. अशा आमच्या या इटालीअन बांधवाशीं पुन्हा स्नेहसंबंध वाढविण्याच्या संधीची आम्ही वाट पाहात आहों."

ब्रिटिश सोशॅलिस्ट पक्ष आपल्या इटालिअन सोशॅलिस्ट बांधवांना हे संदेश पाठवीत असता खुद्द इटालीत, पूर्वी मुसोलिनीस सत्ता देणारा राजा व्हिक्टर इमॅन्युअल, मुसोलिनीचा सेनापति बादोलिओ आणि मुसोलिनीचे पोलीस यांच्या हातीं 'ॲमगॉट' नें सत्ता दिली असून गनीमी लढवय्ये हे कम्युनिस्ट अथवा विध्वंसक म्हणून खड्यासारखे वगळण्यांत येत असत.

इटालींतलें युद्ध संपल्यानंतर गनीमी लढवय्यांतूनच सोशॅलिस्ट कम्युनिस्टांचे संयुक्त सरकार स्थापन झालें. त्यांत सोशॅलिस्टांच्या उजव्या गटाचें बहुमत असून डी गॅस्पेरी हा उजव्या गटाचा सोशॅलिस्ट पंतप्रधान झाला. उत्तर इटालींतील कारखानाकामगारांत सोशॅलिस्टांना पाठिंबा नसून मुख्यतः रोमन कॅथॉलिकांकडून सोशॅलिस्टांना पाठिंबा मिळाला होता. हे रोमन कॅथॉलिक लोक कामगार-संघटनांना भीत आणि कम्युनिस्टांचा तिरस्कार करीत. डी गॅस्पेरीला कम्युनिस्ट

अल्पमतांत असले तरी तेच सत्ता बळकावतील अशी एकसारखी भीति वाटे. या मंत्रिमंडळाच्या अमदानीत राजाला पदच्युत करण्यांत येऊन इटाली हे प्रजासत्ताक म्हणून जाहीर करण्यांत आलें. पण देशांतलें दारिद्र्य हटेना. १९४७ साली डी गॅस्पेरी रोममधील अमेरिकन वकीलाला म्हणाला,

" आतां सारी मदार तुमच्यावर. तुमची मदत न मिळेल तर आम्ही फक्त कांहीं आठवडे आसनावर टिकूं शकतों. अमेरिकेची मदत न मिळेल तर धान्य-वाटप अर्धे कापावे लागेल. ते कापले म्हणजे आमचा पाडाव झालाच म्हणून समजा. मग एक अगदीं निर्बल सरकार अधिकारावर येईल आणि त्यामागून इटालीत कम्युनिस्ट राज्यच होईल."

पण अमेरिकेचा डाव वेगळाच चालू होता. सेक्रेटरी बिर्नेस याला सोशॅलिस्ट-कम्युनिस्टांच्या संयुक्त मंत्रिमंडळांतून कम्युनिस्टांना हाकलायचें होते. तेव्हा डी गॅस्पेरीला त्यानें वॉशिंग्टनला बोलावून घेतलें आणि तेथें वॉशिंग्टनच्या अधिका-ऱ्यांनीं त्याला कळविले कीं,

" तुम्हाला आम्ही मदत करूं इच्छितों, पण जोंवर इटालिअन सरकारांत टॉग्लिॲटी व त्यांचे कम्युनिस्ट मित्र आहेत तोंवर मदत मिळणार नाहीं." डीगॅस्पेरीनें सांगितले कीं, " कम्युनिस्टांना मी भीत नाहीं पण तुम्ही अन्न आणि कोळसा मात्र दिला पाहिजे."

इतके सांगून डीगॅस्पेरी परत आला. इकडे या बातम्या पसरल्यामुळे कम्युनिस्टानीं धमकीबाजी सुरू केली. तेव्हां डीगॅस्पेरीनें तेवढीच संधि साधून मंत्रिमंडळांतून कम्युनिस्टांना हाकललें व बिर्नेसची इच्छा पुरी केली. तेव्हां-पासून १९४८च्या सार्वत्रिक निवडणुका होईपर्यंत डीगॅस्पेरी अमेरिकेकडे रोजची भाकरी मागत राहिला होता. रोममधील अमेरिकन वकील वरचेवर वॉशिंग्टनला एकच एक तार धाडी कीं,

" इटालीयन सरकार मागते ती मदत द्या अथवा येत्या वसंत ऋतूत येथे कम्युनिस्ट सरकार येईल तें पाहण्याला तयारी ठेवा."

मंत्रिमंडळातून नुसते कम्युनिस्टच हाकालले गेले असें नव्हे तर त्यांचे सोशॅलिस्ट मित्रहि हाकालले गेले व कम्युनिस्टांचे शत्रु असणारे सोशॅलिस्ट मंत्रिमंडळात राहिले. कामगारांत असंतोष माजला. सरकारला अर्थातच

मुसोलिनीचे पाठीराखे व धनिकवर्ग यांचा पाठिंबा कामगारावर दडपशाही करण्यासाठीं मिळवावा लागला. गनीमी युद्धाच्या काळचा सर्व क्रांतिकारक कार्यक्रम बारगळला. श्रीमंतांची चंगळ सुरू झाली. प्राप्तीवरील कर वसूल करण्यांत ढिलाई सुरू झाली. धान्यवाटप व बहुतेक भावनियंत्रण गेले. काळा बाजार व महागाई बोकाळली. बेकारीस ऊत आला. हेन्री वालासनें ही सर्व परिस्थिति डोळ्यांनीं पाहिली. तो ५ एप्रिल १९४८ च्या 'न्यू रिपब्लिक' मध्यें लिहितो,

"मी पुष्कळ देशांत हिंडलों. इटालींत एकीकडे संपत्तीचे डोंगर आणि दुसरीकडे दारिद्र्याची खोल दरी हा फरक मला जितका तीव्रपणें दिसला तितका दुसरीकडे कोठेंहि दिसला नाहीं. इटालींतील कांहीं प्रदेश इतका मागसलेला व कंगाल दिसला कीं क्रांतिपूर्व रशियाची आठवण झाली. युद्ध संपल्यापासून उजव्या गटाच्या हातांत सर्व सत्ता आहे, तेथें काळ्या बाजारवाल्यांचें नंदवन झालें आहे. भावनियंत्रण व वाटप याचा फक्त देखावा आहे. चलनाची सुधारणा जवळ जवळ कांहींच नाहीं. फॅसिस्ट राजवटीचे सहकारी व काळा बाजारवाले यांच्यावर कर बसविण्याची तरतूदहि कांहींच नाहीं. चलन भरमसाट फुगलें आहे. लोकांचें दारिद्र्य, घाणेरडी राहणी, रोगराई व बेकारी यांना जसा कांहीं ऊत आला आहे. श्रीमंतांची चंगळ पूर्वीसारखीच चालली आहे, पण गोरगरीब उपाशी आहेत."

१९४८ च्या फेब्रुवारींत झेकोस्लोव्हाकियांत कम्युनिस्टांनीं संयुक्त मंत्रिमंडळ मोडून राज्यसत्ता खास कम्युनिस्ट मंत्रिमंडळाच्या हातीं दिली. तेव्हां त्यांत रशियाचा हात असला पाहिजे असें ट्रुमनच्या मनानें घेतलें व १९४८ च्या आरंभीं इटालींत ज्या सार्वत्रिक निवडणुकी झाल्या त्यांत कम्युनिस्टांना विजय मिळू द्यायचा नाहीं असा त्यानें निर्धारच केला. जर कम्युनिस्ट मताधिक्यानें निवडून येतील तर इटालींत अमेरिकन सैन्य पुन्हा येईल अशा बातम्या पसरल्या. अमेरिकन आरमार दळें प्रचंड प्रमाणांत इटालीच्या बंदरांत आलीं. निवडणुकींत उजव्या गटाच्या प्रचारकांनीं आपण अमेरिकेची मदत आणू अशी फुशारकी मारली आणि 'कम्युनिस्ट अधिकारावर येतील तर अमेरिकेकडून येणारा मलिदा बंद होईल' असेंहि लोकांना सांगितलें. मतदानाच्या आधींच अन्न-साहाय्याचा पहिला हप्ता येऊन पोचला आणि उजव्या गटाचें मंत्रिमंडळ

अधिकारावर आल्यास पुढला हप्ता मिळेल अशी लालूच दाखविण्यांत आली. विशेष आश्चर्याची गोष्ट अशी कीं ब्रिटिश सोशॅलिस्टांनीं इटालिअन सोशॅलिस्ट पक्षास पाठिंबा दिला नाहीं, कारण त्यानीं कम्युनिस्टांशीं 'डेमोक्रॅटिक फ्रंट' केली होती. ब्रिटिश मजूर पक्षांतील कांहीं जहाल सोशॅलिस्टांनीं इटालीअन सोशॅलिस्ट पुढारी पीट्रो नेन्नो यांस सदिच्छादर्शक तार पाठविली त्याबद्दल ब्रिटिश मजूर पक्षाच्या बड्या पुढाऱ्यांनीं त्याना कानपिचक्या दिल्या. निवडणूक संपल्यावर डी गॅस्पेरीचा पक्ष विजयी होऊन अधिकारावर आला. निवडणुकी-नंतर हॉवर्ड के. स्मिथ या कोलंबिया ब्रॉडकास्टिंग कंपनीच्या बातमीदारानें रोममध्यें रेडिओवर भाषण केलें. त्यांत तो म्हणतो,

"समजा, दोन्ही पक्षांना वृत्तपत्रांत सारखीच जागा मिळाली असती, दोन्ही पक्षांचे निवडणूकफंड सारखेच असते, साऱ्या जगांतील अत्यंत धनाढ्य राष्ट्र आणि साऱ्या जगांतील बलाढ्य धर्मसंस्था (पोप) एकाच पक्षाच्या पाठिंब्या-साठीं पुढें आलीं नसती, तर कम्युनिस्टांनीं डी गॅस्पेरीच्या 'डेमोक्रॅटिक सरकार'ला चिरडून टाकलें असतें. येथें रशियन सैनिक अथवा रशियन पैसा यांची जरूरीच नव्हती. इटालीयन जनतेनें अगदीं स्वतंत्र बुद्धीनें कम्युनिस्टांना निव-डून दिलें असतें."

नव्या मंत्रिमंडळांत प्रतिगामी भांडवलदारांचे प्रतिनिधिहि घेण्यांत आले. आणि अमेरिकेची मदत देण्यासाठीं जे अमेरिकन अधिकारी नेमलेले आहेत ते आमच्या बाजूचे आहेत असे ते जाहीरपणें बोलूं लागले. ही गोष्ट खरीहि होती. अमेरिकन मदतअधिकारी जेम्स झेलरबॅच म्हणाला,

"इटालीत जमीनमालकीविषयक सुधारणा करणें योग्य नाहीं. ही बाब वास्तविक इटालीच्या अंतर्गत अधिकारांतली असल्यानें मला तीविषयीं बोलतां येत नाहीं. पण जमीनमालकीविषयक सुधारणा केल्यास उत्पादन घटेल एवढें माझें मत सांगतों."

झेलरबॅचच्या या उद्गारामुळें अमेरिकेचें इटालींतलें धोरण प्रतिगामी आहे असें इटालींत बोललें जाऊं लागले. जोसेफ अल्सॉप् २० जानेवारी १९४९ च्या 'न्यूयॉर्क हेरल्ड ट्रिब्यून' मध्यें लिहितो,

"अमेरिका प्रतिगामी झाली असल्याचा दुर्लौकिक ऐकून जबर धक्काच

असतो. झेलरबॅचचें निवेदन स्फोटक आहे. इटालीच्या सर्व राजकारणांत जागोजाग अमेरिकेचें वर्चस्व जाणवतें आहे. वास्तविक डी गॅस्पेरी हा जमीन-विषयक सुधारणेला वचनबद्ध असून मंत्रिमंडळांतील बहुसंख्य मंत्री ती सुधारणा तावडतोब हातीं घेऊं इच्छितात. पण मंत्रिमंडळांतील उजव्या गटांचा त्यांना विरोध असून झेलरबॅचचें निवेदन हा उजव्या गटाच्या हातांत मोठाच आसूड मिळालेला आहे."

अमेरिकेचा हेतु कम्युनिस्टविरोधी गटाना दुखवूं नये व कम्युनिस्टांच्या साऱ्या मागण्या हाणून पाडाव्या हा आहे. ग्रीसप्रमाणें इटालीमध्येंहि प्रतिगामी वर्गाच्या हातात सत्ता राहू देणें हा अमेरिकेचा मुख्य उद्देश आहे.

## फ्रेंच कम्युनिस्ट कसे आहेत

कम्युनिस्टांना ठेचून काढून प्रतिगामी सत्ता बळकट करण्याचें वेड अमेरिकेला किती लागलें आहे हें अमेरिकेच्या फ्रान्ससंबंधीच्या वर्तनावरून चांगल्या प्रकारें समजते. फ्रेंच कम्युनिस्ट पक्ष हा विधायक पक्ष आहे. फ्रेंच कम्युनिस्टांच्या एका पुढाऱ्यानें 'फ्रान्स व रशिया यांचें युद्ध सुरू झाल्यास आपण फ्रान्सविरुद्ध लढूं' असें जाहीर केलें यावरून फ्रेंच कम्युनिस्ट हे देशद्रोही आहेत अशी टीका त्या-वेळी भारतातहि झाली व ती रास्तच होती. पण फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाच्या अलीकडील इतिहासाकडे थोडेसें लक्ष दिलें असतां त्याची देशभक्ति व विधायक वृत्ति बऱ्याच उच्च दर्जाची असल्याचेंहि दिसून येतें.

दुसऱ्या महायुद्धाच्या आरंभीं रशियाच्या आदेशाप्रमाणे वागून फ्रेंच कम्युनिस्टानीं देशद्रोहच केला. पण जनतेनेंहि कम्युनिस्टांना अजीबात सोडलें, त्यांची सभासदसंख्या फार कमी झाली व सरकारनें बहुतेकांना उचलून तुरुंगांत डांबलें. यामुळें ते देशाचें फारसें नुकसानहि करूं शकले नाहींत. जर्मनीनें रशियावर स्वारी करताच जगांतील इतर कम्युनिस्टांप्रमाणें फ्रेंच कम्युनिस्टांचाहि सिद्धांत बदलला व ते एकदम देशभक्त बनले. मग ही देशभक्तिहि त्यांनीं अगदीं शंभर टक्के खरी केली. जर्मनअंमलाविरुद्ध निकराचा गनीमी लढा करण्यांत कम्युनिस्टांनीं पुढाकार घेतला असून देशाबाहेर असलेल्या फ्रान्सच्या स्वातंत्र्याचें प्रतीक म्हणून मानल्या गेलेल्या डी गॉलशीं ते एकनिष्ठ राहिले. या गनीमी लढ्यांत चाळीस हजार कम्युनिस्ट ठार झाले.

युद्ध संपल्यानतर फ्रान्समध्ये सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट यांचें संयुक्त मंत्रिमंडळ आले. युद्धात फ्रान्स चेपला गेला, पिळला गेला, नीतिभ्रष्ट व हताश झाला. पण फ्रान्सचा उद्धार करण्यासाठीं कम्युनिस्टांनीं कबर बांधली. कामगारसंघटनांचा त्यांना पाठिंबा होता कम्युनिस्टांनीं कामगारांना उत्पादनासाठीं उत्साहित केलें. रेल्वेचे रस्ते, डबे, एंजिनें, पूल, सडका, कारखान्यांतील यंत्र खाणी या सर्वांची दुरुस्ती करून उत्पादन भराभर झाले पाहिजे असा त्यांनीं कामगारांना आदेश दिला.

जीन मोन हा फ्रान्सचा फार मोठा अर्थशास्त्रज्ञ आहे. त्यानें फ्रान्सच्या युद्धोत्तर उत्कर्षाची एक योजना आखली. खाणी, पोलाद, इतर मोठे प्राणभूत धंदे इत्यादिसाठीं एकेक कौन्सिल असावे, त्यावर कामगार, कारखानदार आणि सरकार यांचे प्रतिनिधि असावे. त्यांनीं एकत्र बसून यंत्रसामुग्री सुधारावी कशी, कामगार कोणत्या व्यवसायास किती व कसले हवेत, भांडवल किती हवें इत्यादि गोष्टींची चर्चा करायची असें ठरले. भांडवल हप्त्याहप्त्यांनीं वाढवावे, त्यातील कांहीं भाग अमेरिकेंतून कर्ज म्हणून आणावा, आणि बाकी भांडवल निर्यात मालाच्या किमतींतून जमवावे अशी ही योजना होती.

या योजनेशीं कम्युनिस्टांनीं उत्साहपूर्ण सहकार्य केलें. काम जितके अधिक चांगले करावें तितका रोजगार अधिक मिळेल ही योजना कम्युनिस्टांनीं कामगाराना स्वीकारायला लावली. यामुळे कामगार काम अधिक करू लागले. मोने यानें कम्युनिस्टांशीं चर्चा करून व त्यांचे सहकार्याचें आश्वासन मिळवूनच सदर योजना अमलांत आणली. फ्रान्सची पुनर्घटना हें फ्रेंच कम्युनिस्टांनीं आपले प्रमुख उद्दिष्ट ठरविले. नियोजनाच्या अनेक शाखावर कम्युनिस्ट हे सभासद अथवा अध्यक्षहि झाले होते. कोळशाच्या खाणी राष्ट्रीय मालकीच्या होताच कम्युनिस्ट त्यांच्या नियंत्रणमंडळावर आले. बँका व रेल्वे यांच्या कारभारातहि हजारों कम्युनिस्ट घुसले. यामुळे युद्धापूर्वीच्या २०० बँकवाल्या कुटुंबांचें वर्चस्व फ्रान्सच्या आर्थिक जीवनात असे, ते युद्धानतर बरेंच कमी झालें.

पण युद्धानंतरचा हा सुखकाल जेमतेम दोन वर्षेंच टिकला. फ्रान्सला मार्शल-योजनेअन्वयें मदत देण्याची वेळ आली तेव्हां 'भांडवलदारांशीं सोशॅलि-स्टाचीं संयुक्त मंत्रिमंडळें असतील तरच अमेरिकन मदत मिळेल, कम्युनिस्ट

मन्त्रिमंडळांत असेपर्यंत मिळणार नाहीं' असें अमेरिकेनें सुचविलें असावें. तेव्हां इंडोचायना व संपविरोधी कायदा याबाबत कम्युनिस्टांचा मंत्रिमंडळाशीं मत-भेद आल्याचें निमित्त करून कम्युनिस्टांना मन्त्रिमंडळातून हाकालण्यांत आले. याविषयीच्या अमेरिकन धोरणावर स्टुअर्ट जेल्डरनें बराच प्रकाश पाडला आहे. तो न्यूज क्रॉनिकलमध्यें १० मे १९४७ रोजीं लिहितो,

"जेथें जेथें कम्युनिस्टांचें राज्यसंस्थेवर प्रभुत्व स्थापन होण्याचा संभव दिसेल तेथे तेथें कम्युनिस्टांना प्रतिकार करायचा असें अमेरिकेचे धोरण आहे. आणि या धोरणानुसार फ्रान्सला साहाय्य करण्याची योजना अमेरिका आंखीत आहे. पण याचा अर्थ असा आहे कीं फ्रान्ससारख्या रशियाचें दडपण मुळींच नसलेल्या देशांतहि कम्युनिझमूला दडपलेंच पाहिजे असे अमेरिकेनें ठरविलेले दिसतें. फ्रान्सला साहाय्य करण्याची स्पष्ट योजना अजून तयार नाहीं. पुढील दोन वर्षांत फ्रान्सला बरीच मोठी मदत द्यावी लागेल अशी अपेक्षा आहे. पण मला बऱ्याच अधिकृतपणें समजले आहे कीं फ्रान्समध्ये स्वतंत्र व नेमस्त असें लोकशाहीप्रधान सरकार असावें, अशी अमेरिकेची अपेक्षा आहे. पण म्हणजे काय ? म्हणजे असें कीं, फ्रान्सच्या लोकशाहीप्रधान राज्यघटनेअनुसार फ्रेंचांनीं कम्युनिस्ट सरकार जर अधिकारावर आणले तर ते लोकशाहीप्रधान सरकार आहे अथवा फ्रान्स हें स्वतंत्र राष्ट्र आहे असें अमेरिका मानणार नाहीं."

---

## तिसऱ्या महायुद्धाची तयारी

अमेरिकेच्या या रशियाविरोधी आणि कम्युनिझम्‌विरोधी धोरणाची प्रति-क्रिया पूर्वयुरोपांत फार निकाराची झाली. जर्मनीनें तुडविलेल्या युरोपपैकीं पश्चिम युरोप ॲंग्लो-अमेरिकनांनीं मुक्त केला व त्याच्या पुनर्घटनेंत अमेरिकेनें हस्तक्षेप केला. अर्थात् पूर्व युरोप रशियानें मुक्त केला व तेथे रशियानें हस्तक्षेप केला.

वास्तविक युद्ध संपण्यापूर्वी क्रिमियांत इंग्लंड, रशिया व अमेरिका यांच्या प्रतिनिधींची परिषद झाली. तींत विमुक्त प्रदेशाबाबत तिन्ही राष्ट्रांनीं एकजुटीनें पुनर्घटना करावी, फॅसीझमचा नायनाट करावा आणि लोकशाही घटना कराव्या असा ठराव तिन्ही राष्ट्रांनीं एकजुटीनें केला. पण ग्रीसमध्यें १९४३ पासूनच चर्चिलनें फॅसिस्ट सरकारला पाठिंबा देण्याचें धोरण अवलंबिले, इटालींत ॲमगॉटनें व्हिक्टर इमॅन्युअल, बादोलिओ आणि फॅसिस्ट पोलिस याच्या हातीं सत्ता दिली. तेव्हा पुढें रशियाने बाल्कन्समध्ये व पोलंडमध्यें प्रवेश करतांच शेतकरी-कामकऱ्यांना खुलें रान करून दिले.

यामुळें अँग्लोअमेरिकन्स व रशिया यांची पुनर्घटना पद्धति भिन्न भिन्न इतकेच नव्हे तर परस्परविरोधी झाली. पुढे चर्चिलनें स्टालिनशीं करार करून " रुमानियांत पुनर्घटना तुम्ही करा आम्ही तिकडे येत नाहीं, ग्रीसमध्ये आम्ही पुनर्घटना करतों तुम्ही येऊं नका " असें ठरवून घेतले. यामुळें येथपासून खरोखर युरोपचीं अँग्लोअमेरिकन्स व रशिया यांमध्यें फाळणीच झाली. आणि पश्चिम युरोपच्या पुनर्घटनेंत अमेरिकेनें कम्युनिझमविरोध व रशियाविरोध अशी भूमिका उघड उघड घेऊन जगांत इतरत्रहि भांडवलशाही स्थापण्याच्या प्रयत्नास आपण सर्व प्रकारची मदत करणार असें आव्हान दिले. महायुद्ध संपतें न संपतें तोंच अमेरिकेंत जेम्स बर्नाम सारखे लोक अमेरिकेनें ताबडतोब रशियाचा पराभव करावा नाहीं तर रशिया जग खाऊन टाकील असा प्रचार सुरू केला. यामुळें दुसऱ्या महायुद्धापूर्वी रशियास घेरण्याचें कारस्थान जसें हिटलरनें अँग्लो-फ्रेंचांचे मदतीनें रचलें तसें अमेरिका रचीत आहे अशी धास्ती रशियानें घेऊन सर्व पूर्वयुरोप ही सोव्हियट संरक्षणासाठीं आघाडीची पोलादी तटबंदी बनविली.

## पूर्वयुरोपांत समाजक्रांति

अशी तटबंदी बनविताना रशियानें जुन्या फॅसिस्ट अथवा सरजामी व प्रतिगामी वर्गाच्या हातीं सत्ता न देता शेतकरी-कामकऱ्यांना सत्ता घेऊं देऊन तेथें समाजक्रांति घडविली ही गोष्ट विशेष महत्त्वाची आहे. पोलंड, हंगेरी, झेकोस्लोव्हाकिया, रुमानिया, युगोस्लाव्हिया, बल्गेरिया इतकीं राष्ट्रें या रशियन वर्चस्वांत मोडतात. युगोस्लाव्हिया आरंभीं या गटांत होता. पण त्यावर रशियाचें वर्चस्व कधींच बसलें नसून आतां तर रशियासुद्धा सर्व पूर्वयुरोपीयन राष्ट्रांशीं युगोस्लाव्हियाचें भांडणच जुंपलें आहे.

पूर्वयुरोपांतील हीं राष्ट्रें अतीशय मागसलेली होतीं. इग्लंडफ्रान्सप्रमाणें लोकशाहीचा अनुभव त्या देशांना कधींहि नव्हता. देखाव्याचीं पार्लमेंटे मधून मधून अस्तित्वांत असत. पण सत्ता बडे जमिनदार, सरजामदार, राजघराणीं व त्यांच्या मार्फत देशांत पैसे गुंतविणारे परकी भांडवलदार यांच्या हातीं असे. पोलंडमध्यें राजा नव्हता. पण सरजामी समाज व लष्करी हुकुमशाही होती, फक्त झेकोस्लोव्हाकियांत मात्र लोकशाही सुसूत्रपणें दोन युद्धांचे दरम्यान चालली. पण तिचाहि म्यूनिच करारानतर अंत झाला.

दुसऱ्या महायुद्धांत झेकोस्लोव्हाकियाखेरीज बाकीच्या सर्व पूर्वयुरोपीय देशांतले राज्यकर्ते वर्ग, जमीनदार, सरजामदार हे फॅसिस्ट आक्रमकास शरण जाऊन त्यांच्या अमलाचे पाठीराखे झाले. त्यांनीं जर्मनीसाठीं आपल्या नागरिकांचीं सैन्ये उभारलीं, कामगारांना फॅसिस्ट राज्यकर्त्यांसाठी राबविले, शेतकऱ्यांची फॅसिस्टांसाठीं लूट केली. हे राज्यकर्ते रशियांतील सोव्हिअट पद्धतीचे हाडवैरी होते व युद्ध संपतांच यांना हातीं धरून अँग्लोअमेरिकन्स हे पुन्हां जुन्या राजवटी सुरू करतील अशी भीति ग्रीसच्या उदाहरणावरून रशियाला वाटली आणि मग पहिल्यापासूनच रशियानें शेतकरीकामकऱ्याना जुनी राजवट व समाजवट उखडून नवी स्थापण्याला उत्तेजन दिलें.

प्रथम फॅसिस्टांना सामील झालेल्या जमीनदारांच्या, धर्मगुरूंच्या, सरदारांच्या ईस्टेटी खालसा करण्यांत आल्या, परकीय साम्राज्यवाद्यांचे व भांडवदारांचे हक्क हिटलरनेंच खालसा केले होते ते पुनरुज्जीवित करण्यांत आले नाहींत. युगोस्लाव्हिया, रुमानिया, बल्गेरिया येथील राजघराण्यांची सत्ता नष्ट करण्यांत आली. मोठमोठे कारखाने राष्ट्रीय मालकीचे करण्यांत आले. हे सर्व करतांना विध्वंस करण्याची पाळी आली नाहीं. विध्वंस हिटलरच्या अमलानेंच केला असून युगोस्लाव्हियांत क्रांतिकारक सैन्याच्या हातीं सत्ता आलीच होती. बाकीच्या पूर्वयुरोपीय राष्ट्रांत रशियन सैन्य होते. यामुळें प्रतिक्रांतिकारकांना डोकें वर काढणेंच अशक्य झाले व क्रांतिकारक पुनर्घटना शस्त्रप्रहार न करतां योजनापूर्वक करता आली.

या सर्व ठिकाणीं कम्युनिस्टांकडे साहजिकच पुढारीपण आलें. त्यांनीं शहरें आणि खेडीं यांचे आर्थिक संबंध जोडण्याचें काम बड्या व्यापाऱ्यांकडे न देता सहकारी सोसायट्या स्थापून त्यांच्याकडे दिलें, कामगारसंघटना मजबूत

व कर्तव्यनिष्ठ करून, औद्योगिक योजना ज्या आंखल्या होत्या त्या पुऱ्या करण्याचें काम त्या संस्थांकडे दिले. सर्वत्र कामकऱ्यांनीं आणि शेतकऱ्यांनीं खूप काम करावे आणि आपलें उध्वस्त जीवन दुरुस्त करावें अशी प्रचारमोहीम काढून लोकांकडून कामें करवून घेतलीं. लहान व्यापारी, लहान धंदेवाले, मध्यम बुद्धिजीवि वर्ग यांना न दुखविता त्यांची संघटना केली, सहकारी शेतीचा शक्य तेथें अवलंब केला. सोव्हिअट रशियानें सत्तावीस वर्षें केलेला प्रयोग त्यांचे पुढें नमून्यासाठीं होता. तो नमूना गिरविणें हें यांना कांहींसें सोपेंहि गेलें.

या राजवटी मूठभर कम्युनिस्टांच्या हातीं आहेत अशी टीका पाश्चात्य राष्ट्रांत होत असे. तरीपण कांहीं लेखकांनीं तरी त्याचें कौतुक केलें. ११, १२ नोव्हेंबर १९४६ च्या ( लंडन ) ' टाइम्स ' मध्ये वेस्टन हा लेखक ' डान्यूबिअन राज्यें ' या लेखांत लिहितो,

" अल्पसंख्यांच्या हातींच हीं राज्यें आहेत हें खरें. पण त्यांच्या अंगीं अनेक विधायक गुण आहेत. युद्धपूर्व राज्यकर्त्यांना आपल्या समाजाच्या मूलभूत गरजा कळण्याची अक्कल नव्हती. हल्लींच्या या राज्यकर्त्यांना आपल्या समाजाचे मूलभूत प्रश्न चांगले समजलेले आहेत. त्यांच्याजवळ मोठ्या ईर्षेच्या योजना आहेत व त्यांच्या अंगीं त्या पार पाडण्याची कळकळ आहे. यांचे जे विरोधक आहेत तेहि प्रामाणिक व धैर्यवान आहेत, तरीपण त्यांचें धोरण अकरणात्मक असतें. त्यांच्याजवळ विधायक असा आर्थिक व सामाजिक कार्यक्रम कांहींहि नाहीं. त्यांचा स्वदेशाभिमान अत्यंत तीव्र म्हणजे अगदीं वेडासारखा आहे. यांपासून एक नवीन फॅसीझम् सहज निर्माण होईल. त्याला मध्यम वर्गीय नोकरशाही, कांहीं शेतकरी यांचा पाठिंबा मिळेल. त्यांतून ज्यूद्वेष, धर्मवेड, आक्रमक राष्ट्रवाद याची वाढ होईल. "

पण पाश्चात्य राज्यकर्त्या मुत्सद्यांनीं वेस्टनला सुचलेला हा दृष्टिकोण विचारात घेतला नाहीं. याल्टा परिषदेनें लोकशाही स्थापण्याचा आदेश दिला असतां पूर्वयुरोपीय राष्ट्रांत सोव्हिअट कम्युनिझम् स्थापला जातो आहे तेव्हां तो उखडून काढणें हें आपले कर्तव्य आहे असें त्यांच्या मनानें घेतलें. ट्रुमन योजनेचें निमित्त करून अमेरिकेनें ग्रीसमध्यें एवढा जोरदार हस्तक्षेप केला कीं बल्गेरिया, रुमानिया वगैरे राष्ट्रांना अमेरिकेचा हस्तक्षेप आपल्यांतहि येईल अशी भीति वाटली. बाल्कन राष्ट्रांत जुने सरंजामशाहीवादी अथवा फॅसिस्ट जे

होते त्यांना गुप्त कट करण्यास साहाय्य मिळेल अशी आशा अमेरिकेकडून खरोखरच दाखविण्यात आली.

पोलंडमध्यें चाळीस हजार प्रतिक्रांतिकारक भूमिगत होऊन शेतकरी-कामकरी राज्याविरुद्ध सशस्त्र लढत होते. रुमानिया, बल्गेरिया, हंगेरी येथेंहि कारस्थानें झालीं अथवा तसे संशय सरकारला येऊं लागले. अमेरिकन सीनेटमध्यें सीनेटर ब्रिजेस् यानें पूर्वयुरोपीयन राज्यांतील प्रतिक्रांतिकारक भूमिगतांना पैसा व शस्त्रास्त्रें पुरवावीं असा ठराव सीनेटमध्ये मांडला. जॉन फोस्टर डयूल्स या हिटलरच्या एके काळच्या पुरस्कर्त्यानें मांडलेल्या एका कल्पनेप्रमाणे 'एक्स-योजना' नांवाची एक गुप्त योजनाहि १९४७-४८ मध्ये आंखण्यात आली होती. अमेरिकेतील बड्या धंदेवाल्याचें पत्र 'यू. एस्. न्यूज्' यानें या योजनेवर एक लेख लिहून 'अमेरिकेच्या नेतृत्वाखाली बलवान सशस्त्र दळें उभारण्यांत येतील आणि प्रमुख कम्युनिस्टांच्या खुनास उत्तेजन देण्यात येईल' अशी या योजनेची जाहिरातहि फडकविली होती.

पुढें पूर्वयुरोपीय राष्ट्रांत जे अनेक खटले झाले त्यात परकीयांच्या हस्तक्षेपानें कारस्थानें झाल्याचे 'पुरावे' मांडण्यांत आले. ते खरे किती, खोटे किती हें सांगणें कठिण आहे. पण 'न्यूयॉर्क टाइम्स' चा लष्करी तज्ज्ञ लेखक तक्रार करतो कीं,

"अमेरिकन गुप्तपोलीस, तरुण व अत्युत्साही अधिकारी रुमानियांतील कम्युनिस्टविरोधकांशीं जवळ जवळ उघड संबंध ठेवतात आणि आपल्या विध्वंसक कार्यांच्या चर्चेचीं टिपणें आपल्या वरिष्ठांची मर्जी जिंकून घेण्यासाठीं लिहून ठेवतात."

या हेरगिरीमुळें व हस्तक्षेपामुळें पूर्व युरोपीय राजवटी भयभीत क्रूर झाल्या आणि त्यांनीं विरोधकावर दडपशाही खूप गाजविली. अँग्लोअमेरिकन मुत्सद्दी पूर्व युरोपांतील कम्युनिस्ट हुकुमशाहीवर कडक टीका करीत. यावरून आज ना उद्यां अँग्लोअमेरिकन सैन्यें पूर्व युरोपांत कम्युनिस्टांना उलथून पाडण्यासाठीं घुसतील अशी विरोधकांना आशा वाटे व ते मग ताठ्यानें आणि विरोधानें वागत अथवा कारस्थानेंहि करीत. खरोखर अँग्लोअमेरिकांनीं पूर्व युरोपशीं कोणते धोरण ठेवावें यासंबंधानें बल्गेरियांतील कम्युनिस्ट विरोधक पेटकोव्ह यानें ब्रिटिश पार्लमेंटच्या एका सभासदास सांगितले कीं,

"पूर्वयुरोपांतील हल्लींच्या राजवटीचे आम्ही जे विरोधक आहों आणि लोकशाही व व्यक्तिस्वातंत्र्य हीं तत्त्वें जीं या देशांत आम्ही स्थापूं पाहात आहों त्यांना जर खरोखरच मदत करण्याची अँग्लोअमेरिकनांना इच्छा असेल तर त्यांनीं प्रथम रशियाशीं आपले भांडण मिटवावें आणि आमच्या या देशासंबंधानें सयुक्त धोरण आंखावे. आमचा मोक्ष याच मार्गाने होईल."

पुढें याच पेटकोव्हवर कटाचा आरोप आला आणि त्याला ठार करण्यांत आले. पूर्व युरोपांत बड्यां बड्या माणसें अशा कटात सामील असतात, अशी परंपरा तेथें खास आहे. बल्गेरियाचा कम्युनिस्ट हुकुमशहा डिमिट्रोव्ह याला ब्रिटिश पार्लमेंटचा एक सभासद मि. मॅक यानें विचारलें, "पेटकोव्हला ठार करण्याऐवजीं तुरुंगांत ठेवलें असते तर भागलें नसते का?" डिमिट्रॉव्ह म्हणाला "तुमच्या ट्रुमनयोजनेचा प्रत्यक्ष परिणाम म्हणजेच पेटकोव्हचें मरण होय असें समजा." ट्रुमन योजनेनें ग्रीसमध्यें हस्तक्षेप करून सोशॅलिस्ट व डेमोक्रॅट यांना ठेचून काढले. तसेच अमेरिकेच्या मदतीनें येथें करावें असा पेटकोव्हचा बेत असल्याचा संशय डिमिट्रॉव्हला होता असें डिमिट्रॉव्ह सूचित करतो. युगोस्लाव्हियांत मार्शल टिटो या कम्युनिस्ट पुढाऱ्यानें फॅसीझमविरोधी संघटना करून हिटलरच्या आक्रमणास विरोध केला व हिटलरच्या पाडावानंतर राजाचे सिंहासन खालसा करून सोव्हिअट पद्धतीचें राज्य स्थापलें. तेथें बाहेरचा हस्तक्षेप कधींच झाला नाहीं. उलट ग्रीक बंडखोराना टिटोची व बल्गेरियाची मदत होते अशी वदंता होती. पण यूनोनें नेमलेल्या कमिशनला त्याबाबतहि ठाम पुरावा असा काहींहि मिळाला नाहीं. अलीकडे बल्गेरिया, रुमानिया, हंगेरी, झेकोस्लोव्हाकिया, रशिया वगैरे सर्व राष्ट्रें युगोस्लाव्हियावर उलटली आहेत. यामुळें त्यांचीं कारस्थानें युगोस्लाव्हिआविरुद्ध चालू असल्याचें पुष्कळ ऐकूं येतें.

रशिया व जर्मनी यांनीं युद्धकाळांत पोलंड जिंकून घेतल्यामुळे पोलंडचें सरकार गुप्तपणें लंडनला पळून गेलें. पुढें रशियावर जर्मनीची स्वारी झाल्यानंतर लंडनमधील पोलिश सरकारनें रशियाला मान्यता दिली. पण त्या सरकारमध्यें सोव्हिअट रशियाला शत्रु मानणारीं अनेक माणसें होतीं. त्यांचे बद्दल रशियाचें मन केव्हांच साफ झालें नाहीं. पोलिश कम्युनिस्टांनीं जर्मनअमलाविरुद्ध निकराचा लढा केला.

त्याचे बाजूनें कम्युनिझमविरोधी असें राष्ट्रवादीहि होते. जर्मनीला पोलंडमधून रशियन सैन्यानें हाकून लावल्यावर भूमिगत कम्युनिस्टांनीं आपलें सरकार स्थापन केले व रशियानें 'लंडनच्या सरकारनें पोलंडच्या नव्या सरकारशीं वाटाघाटी करून तडजोड करावी' असा हट्ट धरला. उलट कम्युनिस्टविरोधी चाळीस हजार सशस्त्र भूमिगतांनीं कम्युनिस्ट सरकार उलथून पाडण्यासाठीं पुन्हा गनीमी लढा चालू ठेविला.

अशा परिस्थितींत लंडनमधील पोलिश सरकार व पोलंडमधील कम्युनिस्ट सरकार यांमधील भांडण मिटविण्यासाठीं पोलंडमध्यें सार्वत्रिक निवडणूक करावी असा सल्ला ब्रिटिश सरकारने देऊन पोलंडच्या सरकारचे ४० लक्ष पौंड ब्रिटिश बँकेत होते ते ब्रिटनने अडवून ठेवले. भूमिगतांचा सशस्त्र लढा चालू असे तोंवर निवडणुकी होऊं नयेत असें रशियाचा व पोलंडच्या कम्युनिस्ट सरकारचा सल्ला होता. पण इंग्लंडनें पैसे अडकवून ठेवले व इंग्लंडनें जर लंडनमधील पोलिश सरकारलाच मान्यता देऊन ते पैसे त्यालाच देऊन टाकले तर फार मोठे नुकसान होईल हें जाणून पोलिश कम्युनिस्ट सरकारनें ता. १९ जानेवारी १९४७ रोजीं निवडणुकी घेतल्या.

परिस्थिति आधीपासूनच यादवीची असून भूमिगतांनीं रस्तोरस्तीं खून पाडले व सरकारनेंहि बंडवाल्यांना चोपून काढलें. अशा परिस्थितींत झालेल्या निवडणुकींत लंडन सरकारचा संपूर्ण पाडाव झाला व कम्युनिस्ट सरकार विजयी झालें. तेव्हां ब्रिटिश सरकारनें मुकाट्याने पोलिश सरकारची ठेव पोलंडमधील कम्युनिस्ट सरकारला परत केली.

हंगेरी रशियानें मुक्त केल्यानंतर तेथेंहि निवडणुकांचा प्रसंग आला. त्यावेळीं फॅसिस्ट राजवटीला साहाय्य करणाऱ्या व्यक्तींना, गटांना व पक्षांना मताधिकार देऊं नये असें रशियाचें म्हणणें होतें. पण फक्त कांहीं युद्धगुन्हेगारांना वगळण्यास ब्रिटन व अमेरिका यांनीं संमति दिली. झालेल्या निवडणुकींत कम्युनिस्ट विरोधकांच्या पार्टिन्यानें 'स्मॉलहोल्डर्स' पक्ष थोड्याशा बहुमतानें निवडून आला. अखेरीस कम्युनिस्टसुद्धा संयुक्त मंत्रिमंडळ स्थापन झालें. पण १९४७ च्या जानेवारींत कम्युनिस्टविरोधकांनीं गुप्त कट केले आणि मंत्र्यांतील कांहीं लोक त्यांत सामील आहेत असें सांगून कम्युनिस्टांनीं मंत्रिमंडळ मोडलें व सत्ता बळकावली.

अशा या कटासंबंधानें निश्चित कांहीं सांगतां येतच नाहीं. पण लंडनचा 'टाइम्स' व 'मँचेस्टर गार्डियन' यांनीं त्यासंबंधानें काय लिहिलें आहे हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे. 'टाइम्स' लिहितो, "कट झाला हें सत्य आहे. त्याविषयीं संशय घेता येणार नाहीं. 'स्मॉलहोल्डर्स' पक्षांतील माणसें त्या कटांत होती ही गोष्ट त्या पक्षानें अधिकृतपणें मान्य केली आहे."

'मँचेस्टर गार्डियन' २६ फेब्रुवारी १९४७ च्या अंकांत लिहितो, "कट होता हें खास; उजव्या गटांतीलहि फार थोडे लोक हें अमान्य करूं शकतील. कट केवढा होता, त्याचें उद्दिष्ट काय होतें वगैरे मुद्द्याबद्दल मात्र वाद आहे..."

कटाचा उद्देश कम्युनिस्ट पक्षास उलथून पाडणें हा होता. "कटांत मध्यवर्ती गट होता तो लष्करी गट होता व त्याभोंवतीं कांहीं सनदशीर वृत्तीचे दिन-लष्करी नागरिकहि होते."

झेकोस्लोव्हाकियांतहि कम्युनिस्टांनीं अशाच उलथापलथी केल्या. युद्ध संपतांच १९४५ सालींच निवडणुकी झाल्या. कम्युनिस्ट ४० टक्के निवडून आले. एकंदर मतसंख्येंत त्यांना अल्पमत मिळालें तरी एकेकट्या प्रत्येक पक्षांपेक्षां त्यांना मताधिक्य मिळालें होतें. अर्थात् कम्युनिस्टांसुद्धा संयुक्त मंत्रिमंडळ स्थापन झालें. युद्धपूर्वकालीन अध्यक्ष डॉ. बेनेस परत आला व पुन्हा अध्यक्ष झाला. मंत्रिमंड-ळानें भांडवलशाहीचा त्याग व समाजवादाचा अवलंब असा कार्यक्रम आंखून उत्साहानें अमलांत आणण्यास सुरवात केली. पण अँग्लोअमेरिकनांचें रशियाविरोधी धोरण वाढत होतें. आणि सोशॅलिस्ट अँग्लोअमेरिकनांकडे पहात होते व कम्युनिस्ट रशियाकडे पाहात होते.

शेवटीं कम्युनिस्टांना मंत्रिमंडळांतून हाकून लावावें म्हणून सर्व सोशॅलिस्ट पक्षांनीं एकजूट केली व १९४८ त सर्व सोशॅलिस्ट सभासदांनीं राजीनामे दिले. त्यामुळें नवें मंत्रिमंडळ बनवावें लागेल व मग कम्युनिस्टांस आपण हाकून लावूं असें सोशॅलिस्टांस वाटलें. पण कम्युनिस्ट मंत्रि गोट्टवॉल्ड यानें अध्यक्षाला कम्युनिस्टांचें मंत्रिमंडळ बनविण्यास भाग पाडलें व राजीनामा दिलेल्या मंत्र्यां-पैकीं कांहींनीं आपल्या पाठीराख्यांसह पलायन केलें. पुढें थोड्या महिन्यांनीं डॉ. मसारिक हा लोकशाहीवादी परराष्ट्रमंत्री माडीवरून खालीं बागेंत पडून मृत्यु पावला. डॉ. बेनेसहि मृत्यु पावला व झेकोस्लोव्हाकिया हें वस्तुतः कम्यु-

निस्ट राज्य झालें आहे. रशियाने झेकोस्लोव्हाकियात हस्तक्षेप करून ही क्रांति घडविली असा ट्रुमनचा आरोप आहे. पण झेक कम्युनिस्टांना म्युनिच कराराची पूर्ण आठवण असल्याने त्यांनीं स्वतांच्या बळावरच ही क्रांति घडवून आणली असणें अशक्य नाहीं.

अमेरिका व रशिया यांचा युरोपच्या पटावर हा राजकीय डावपेचाचा लढा जसा चालू होता तसाच त्याच बरोबर अमेरिकेनें आर्थिक डावपेचाचाहि लढा चालू केला व त्याला शेवटीं रणविषयक डावपेचाचें स्वरूप आलें. ट्रुमन-योजनेचा हेतु युरोपीय राष्ट्रांत कम्युनिस्ट वर्चस्वाचीं राज्यें निर्माण होऊं न देणे हा होता. पण केवळ राजकीय हस्तक्षेपानें यश येणार नसून युरोपला आर्थिक साहाय्य करणें हे कम्युनिझम्‌विरोधासाठीं अवश्य आहे असें अमेरिकेचा ( बिर्नेसमागून आलेला ) परराष्ट्रमंत्री मार्शल यानें ठरवून १९४७ च्या जूनमध्यें हार्वर्ड येथें केलेल्या भाषणांत ‘ युरोपच्या पुनरुद्धाराचा कार्यक्रम ’ जाहीर केला. ‘ मार्शल योजना ’ या नांवानें ही योजना प्रसिद्ध आहे. १९४८ ते १९५२ अशीं पाच वर्षें युरोपला कित्येक अब्ज डॉलर्स मालाच्या रूपानें कर्जाऊ द्यायचें व दारिद्र्यानें युरोप कम्युनिझमच्या जाळ्यांत सांपडण्याऐवजीं युरोपचें वैभव वाढवून त्याला भांडवलशाहींत राहू द्यायचा असा या मार्शलयोजनेचा हेतु होता व आहे.

ही योजना नेमकी कोणासाठीं आहे असें एका वार्ताहरपरिषदेत विचारता रशियाहि तींत अंतर्भूत होऊं शकेल असें मार्शलनें सांगितलें. पण पुढें स्टेट्स् गव्हर्नर्सच्या सभेत ही योजना फक्त ट्रुमनयोजनेंतील राजकीय ध्येयाच्या कक्षेंतच बसविली जाईल असा खुलासा मार्शलनें केला. या योजनेसाठीं पॅरिस येथें फ्रेंच, अमेरिकन व ब्रिटिश सरकारांच्या प्रतिनिधींची प्रास्ताविक बैठक झाली. त्यानंतरच्या कामकाजास रशियाला बोलाविण्याचें ठरलें. रशियन प्रतिनिधि मोठ्या संख्येनें आले. वादविवाद पुष्कळ झाला आणि रशिया व पूर्व युरोप यांच्या प्रतिनिधींनीं अखेर मार्शल योजना नाकारण्याचें ठरविलें. झेकोस्लोव्हाकियानें प्रथम होकार दिला होता. पण अखेर त्यानेंहि नकार दिला. या मदतीला बंधनाच्या दोऱ्या असून आपलें राजकीय व आर्थिक जीवन या योजनेनें जखडलें जाईल ही पूर्वयुरोपीअन राष्ट्रांना मुख्य भीति वाटली.

रशिया व पूर्वयुरोपीय राष्ट्रें यांनीं मार्शल योजनेवर बहिष्कार घातल्यामुळें युरोपची पूर्व आणि पश्चिम अशी आर्थिक फाळणीहि झाली. तेव्हां पूर्वयुरोपचें संघटन अधिक दृढ करण्यासाठीं पूर्वयुरोपांतील कम्युनिस्ट राष्ट्रांनीं 'कॉमिन्फॉर्म' (कम्युनिस्ट इन्फर्मेशन) नांवाची संस्था स्थापन केली. महायुद्धांत जी कम्युनिस्ट इंटर नॅशनल बरखास्त झाली तिचेंच हें पुनरुज्जीवन होतें. जागतिक कम्युनिस्टांचें संघटन ही संस्था हल्लीं करते असें मानण्यांत येते.

मार्शल योजनेसंबंधानें रशियाला वाटणाऱ्या शंका कितपत खऱ्या ठरल्या ? मार्शल योजनेचे दोन हेतु अमेरिकन जनतेला उघड दिसले व त्यामुळे अमेरिकेंत त्या योजनेचें चांगलेच स्वागत झालें. अमेरिकन उत्पादन अफाट वाढले. त्याला बाहेरचा बाजार हवा होता. तो न मिळेल तर अमेरिकेत बेकारीची भीति होती. अमेरिकेचा हा माल उध्वस्त युरोपच्या पुनर्घटनेकरितां आहे हे ऐकून अमेरिकन लोक आनदित झाले. पण अमेरिकनांची तात्कालिक बेकारीची भीति दूर झाली हें त्यांच्या आनंदाचें दुसरें व मुख्य कारण होतें. याहून अधिक दूरचें व खोल पाहण्याचा प्रयत्न अमेरिकनांनीं केला नाहीं.

## मार्शल योजनेचे गळफास

मार्शल योजना १९५२ सालीं पूर्ण होईल, त्यावेळपर्यंत युरोप स्वतःच्या पायावर उभा राहील कीं नाहीं आणि त्यापूर्वी आणखी एक महायुद्धहि भडकेल कीं काय असे प्रश्न गेलीं तीन वर्षें उत्पन्न होत आहेत. फ्रान्स व इटाली येथे मार्शल योजनेद्वारां करण्याच्या साहाय्याचें पिस्तुल रोखूनच अमेरिकेनें या दोन देशांच्या मंत्रिमंडळांतून कम्युनिस्टांचें उच्चाटन केलें. यामुळे त्या त्या देशातील कम्युनिस्ट व त्यांचे अनुयायी या योजनेचे वैरी झाले आहेत. पूर्व युरोप आणि पश्चिम युरोप यांत आर्थिक सहकार्य होण्यावर या योजनेचें यश अवलंबून आहे असे मत 'युरोपीअन इकॉनॉमिक कमिशन' च्या १९४८ च्या रिपोर्टांत म्हटलें आहे. या दोन विभागांत १९४८ च्या पाचपट व्यापार वाढला पाहिजे नाहींतर पाचशें कोटींची तूट मार्शल योजना संपण्याच्या वेळीं युरोपला येईल असें सदर कमिशनचें मत आहे.

पूर्वयुरोपनें या योजनेंतून अंग काढून घेतलें तरीपण त्या योजनेंत पूर्वेशीं व्यापार करण्याची तरतूद असून ट्रूमन व मार्शल यांनीं तशी सदिच्छा व्यक्त

केलीहि होती. पण मार्शल योजनेचा मुख्य ॲडमिनिस्ट्रेटर हॉफमॅन यानें पूर्व-युरोपच्या सहकार्याची जरूरी नाहीं असा प्रचार प्रथमपासून सुरू केला. योजनेचा जो आराखडा तयार करण्यांत आला आहे त्याच्या नियमावलींत पूर्वयुरोप व रशिया यांना मार्शल योजनेतल्या राष्ट्रांनीं अमुक एक माल पाठवूं नये असें फर्माविण्याचा अधिकार सदर ॲडमिनिस्ट्रेटरला देण्यात आला आहे. पूर्वयुरोपीय राष्ट्रांचें युद्धसामर्थ्य ज्या योगें वाढेल असा माल पूर्वयुरोपला पाठविण्यास ॲडमिनिस्ट्रेटर बंदी करतो. पण युद्धसामर्थ्य आजकाल सर्वच मालानीं वाढतें यामुळें कारखान्यांचीं यंत्रें, इतर पक्का माल व कांहीं उपभोग्य मालहि पाठविण्याला हॉफमॅन बंदी करतो.

इंग्लंड, फ्रान्स, बेल्जम, हॉलंड वगैरे राष्ट्रांच्या निर्यात मालासंबंधानें एकदां एकच धोरण न ठरवितां हॉफमॅन प्रत्येक वेळीं तपासणी करून हुकूम देतो. यामुळे पक्षपातहि होतो. मार्शल योजनेंत पूर्वयुरोपीअन राष्ट्रे नाहींत या मबबी-वर पाश्चिमात्य युरोपशीं त्यांना व्यापार करू देणार नाहीं कीं काय अशा शंका पोलंड, झेकोस्लोव्हाकिया व इतर पूर्व युरोपीअन राष्ट्रांनीं संयुक्त राष्ट्रसंघाच्या जनरल असेंब्लींत विचारल्या आहेत. युगोस्लायाचीहि नेहमीं तक्रार असते.

मार्शलयोजनेचा स्वीकार करणाऱ्या पश्चिम युरोपीय राष्ट्रांच्या व्यापार-धंद्यावर यामुळें अमर्याद बंधन येतें. इंग्लंडबाबत या निर्यात तपासणीचें काम एक ॲंग्लोअमेरिकन कमिटी करते. इंग्लंड व रशिया यांचा व्यापारविषयक तहनामा झालेला आहे. त्या अनुसार खाणकामाचें साहित्य, रसायनें व तेल यांच्या धंद्याचें साहित्य रशियानें मागविलें होतें तें अचानक नाकारण्यांत आलें. यासंबंधानें तक्रार करताना २ जुलै १९५० च्या अंकांत 'मँचेस्टर गार्डि-अन' म्हणतो.

"रशिया व पूर्व युरोप यांना कोणता माल पाठवायचा नाहीं यासंबंधानें पॉल हॉफमॅन यानीं अमेरिकेंत जें उत्तर दिलें त्यामुळें येथें लोक बरेच अस्वस्थ झाले आहेत. अमेरिकन कायद्यांत असें म्हटलें आहे कीं जो माल अमेरिका स्वतां पूर्वयुरोपांत पाठविणार नाहीं, असा माल पश्चिम युरोपीय राष्ट्रें पूर्वयुरोपला पाठविणार असतील तर त्यासाठीं लागणारा कच्चा माल अमेरिकेनें सदर पश्चिम युरोपीअन राष्ट्रांना देऊं नये. अमेरिका कोणता माल पाठविणार नाहीं याची एक गुप्त यादी अमेरिकन व्यापार खात्याजवळ आहे. त्यांतील माल बहुतेक

लष्करी साहित्याचा आहे. याचा अर्थ असा कीं मार्शल योजनेअन्वयें अमेरिकेकडून येणाऱ्या मालापासून ब्रिटनने काहीं पक्का माल तयार केला व तो अमेरिकेच्या वरील बंदीयादींत येत असला तर तो माल पूर्व-युरोपला विकणे ब्रिटनला अशक्य होईल असा मार्शल योजनेसाठीं झालेल्या कायद्याचा सहज परिणाम आहे. पण हॉफमॅनने जें नवें उत्तर दिलें आहे त्यांत त्याने आणखी पुढे मजल मारली आहे. त्याला असें विचारण्यांत आले कीं अमेरिकेची बंदी असलेला पण अमेरिकेच्या साहित्यापासून तयार न केलेला माल मार्शल योजनेंतल्या राष्ट्रांनीं पूर्वयुरोपला पाठविण्याला काय हरकत आहे? हॉफमॅन म्हणाला, 'हो हरकत आहेच. कारण जेट एंजिन पूर्वयुरोपला जाऊं नये असें एकदा आम्हीं ठरविल्यानंतर मार्शल योजनेंतल्या राष्ट्रांनीं त्यासाठीं आमचें साहित्य न घेता जेट एंजिन तयार केले तरी त्यांनीं तें पूर्व युरोपला पाठविता कामा नयेच.'

पूर्व आणि पश्चिम युरोप यामध्ये अशा प्रकारे तटबंदी उभारण्याचा प्रयत्न मार्शलयोजनेअन्वयें होत आहे अशी तक्रार 'टाइम्स' सारखीं पत्रेंहि करीत आहेत. पण अमेरिकेच्या धोरणास ब्रिटिश कॉन्झर्वेटिव्हांचा पाठिंबा असतो. मार्शल योजनेच्या दोऱ्या आवळून फ्रान्स, इटाली वगैरे देशात समाजवादी धोरणास अमेरिका मागें खेचते व भांडवलशाहीस मोकळे रान सोडते. पण ब्रिटन समाजवादी धोरणाचा आग्रह सोडीत नाहीं. यामुळें ब्रिटिश कॉन्झर्वेटिव्ह पक्ष अमेरिकेस पाठिंबा देत आहे. पश्चिम युरोपशीं एकजूट होण्यास ब्रिटन तयार नाहीं, फक्त मार्शल योजनेचा फायदा मात्र ब्रिटनला हवा अशी टीका अमेरिकेंत ब्रिटिश सोशॅलिस्ट सरकारवर होत आहे. ब्रिटन पश्चिम युरोपशीं आर्थिक ऐक्य करणार नाहीं तोंवर युरोपचें सामर्थ्य वाढणार नाहीं म्हणून ब्रिटनवर समाजवादाचा त्याग करण्यासाठीं व भांडवलशाहीवादी पश्चिम युरोपीयन सरकाराशीं ब्रिटनने सहकार्य करण्यासाठीं अमेरिकेनें दडपण आणावें असा आग्रह अमेरिकन कॉंग्रेसमध्यें करण्यांत येत आहे.

याप्रमाणें मार्शल योजनेचा मुख्य उपयोग पूर्व युरोप व पश्चिम युरोप यामध्यें तटबंदी उभारणें व युरोपांत बाल्यावस्थेंतील सोशॅलिझमला नख लावून तेथें भांडवलशाहीला मोकळें रान उत्पन्न करणे हा आहे. दक्षिण अमेरिकेत ब्रिटनचा बराच मोठा बाजार आहे. त्यालाहि अमेरिकेचा निकाराचा विरोध असून

पौंडाची किंमत अमेरिकेनें घटविली व इंग्लंडच्या अडचणी वाढविल्या आहेत. ब्रिटनच्या आर्थिक परिस्थितींत पौंडाची किंमत उतरविणें अपरिहार्यहि झालें असेलच. पण अमेरिकेचें दडपण आलें ही गोष्टहि खरीच आहे.

## उत्तर अटलांटिक कराराचा हेतु

या मार्शल योजनेंतून युरोपांत युद्धाची तयारी होत आहे ती अधिक महत्त्वाची आहे. या दृष्टीनें उत्तर अटलांटिक करार हा मार्शल योजनेचें अपत्यच असून त्याचें स्वरूप येथें समजून घेणें अगत्याचें आहे. हा करार १९४९ चे आरंभीं अमेरिका, कानडा, ब्रिटन, फ्रान्स, इटली, नॉर्वे, बेल्जम, हॉलंड, लक्झेंबर्ग या ९ राष्ट्रांत झाला. अटलांटिक किनाऱ्याशीं संबंध नसलेलींहि राष्ट्रें यांत घेतलेलीं आहेत. रशियाशीं लढण्याची तयारी हेच या कराराचें उद्दिष्ट आहे ही गोष्ट अमेरिकन सरकारी पत्रकांत या कराराचा जो खुलासा करण्यात आला आहे त्यावरून कळून येईल.

सदर पत्रक म्हणतें, " नॉर्थ अटलांटिक करार हा सामुदायिक बचावाचा करार आहे. महायुद्धकाळीं बड्या राष्ट्रांनीं युद्धोत्तर परस्पर सहकार्याच्या शपथा घेतल्या, त्याच भूमिकेवर संयुक्त राष्ट्रसंघटनेची सनद तयार करण्यात आली. पण त्या शपथा फलद्रूप झाल्या नाहींत. फार महत्त्वाचे असे तहनामे अजून व्हायचे आहेत. सोव्हिअट रशिया यूनोंत अडथळा करतो, वेळीं अवेळीं व्हेटो वापरतो याचा हा परिणाम आहे. त्यामुळें युनोमार्फत सामुदायिक संरक्षणाची तजवीज झालेली नाहीं. यूनोची सनद मंजूर झाल्यानंतर उघडकीस येत आहे कीं सोव्हिअट रशियाचे पाश्चात्य संस्कृतीबद्दल महत्त्वाचे गैरसमज आहेत. रशिया व बाहेरचे जग यांचे दरम्यानच्या नात्यापासून कोणती फलप्राप्ति होईल याहि बाबतींत रशियाचें समज चुकीचे दिसतात. हे गैरसमज यूनोच्या सनदेचा भंग न करता दूर करणें हें अमेरिकन परराष्ट्रधोरणाचें एक महत्त्वाचें काम आहे. सोव्हिअट रशियाच्या आडमुठेपणामुळेंच युद्धोत्तर काळच्या महत्त्वाच्या प्रश्नाची सोडवणुक करणें पाश्चात्य राष्ट्रांना अशक्य झालें. तरी पण शांतता, सुरक्षितता व न्याय याचा भंग न होईल अशा प्रकारें यूनोच्या सनदेचा मान ठेवण्याचा या करारांतील राष्ट्राचा निश्चय असून वाटाघाटीनेंच वाद मिटविण्याची त्यांची इच्छा कायम आहे. या कराराप्रमाणें वागतांनाहि हीं राष्ट्रें हेंच धोरण ठेवतील. नॉर्थ अटलांटिक करार हा या

करारातील राष्ट्रांच्या सुरक्षितेचा करार असून त्या सुरक्षिततेस धोका आल्यास परिणाम काय होतील ते निःसंदिग्ध शब्दांत हा करार सांगतो आहे. कोणीहि दुसऱ्यावर सक्ति केल्यास परिणाम काय होईल हे या करारांत स्पष्टपणें सांगितलें असल्यानें वादाचे शिलकी प्रश्न शांततेनें मिटण्यास यामुळे मदत होईल. या करारांतील एकाहि राष्ट्रावर परचक्र आल्यास हीं राष्ट्रें व्यक्तिशः व समुदायाने सदर आक्रमणाचा प्रतिकार करतील. हा आमचा निश्चय व त्यासाठीं आम्हीं केलेली तयारी ही पाहून एकाद्या भावी आक्रमकाची आपण एकेका राष्ट्रांना आतां गट्ट करूं शकणार नाहीं अशी खात्री होईल. १९३९ सालीं नात्सी आक्रमकांची अशी खात्री करता आली असती तर फॅसिस्ट राष्ट्रें आक्रमणापासून परावृत्त झालीं असतीं. कारण आक्रमक राष्ट्रांना आपणाला निर्धाराच्या तटबंदीवर धडक घ्यायची आहे हें लक्षांत आल्यास आक्रमक राष्ट्रें थबकतात, अशा निर्धारानें मूलभूत मतभेदाचे प्रश्न सुटतात असे नव्हे. पण महत्त्वाकांक्षी राष्ट्रांना त्यामुळें शक्तीनें नव्हे तर वाटाघाटीनें वाद मिटवावे हे पटतें."

अटलांटिक करार हा यूनोच्या सनदेशीं सुसगत आहे हे दाखवितांना अमेरिकन सरकारी पत्रक म्हणतें,

"अटलांटिक करार हा सामुदायिक बचावाचा करार आहे, तथापि सर्व वाद वाटाघाटीच्या शांततेच्या मार्गानें मिटविण्याचाच आमचा निश्चय आहे. फक्त यूनोच्या सनदेंतील ५१ व्या कलमांत जो स्वसंरक्षणाचा हक्क स्पष्टपणें दिलेला आहे त्यासाठीं आम्ही परस्परांच्या हक्काचें संयोजन करीत आहों. म्हणजे युनोच्या चौकटींत बसूनच शांततारक्षणाचा प्रयत्न आम्ही करीत आहों. आंतरराष्ट्रीय शांतता रक्षिण्याची मुख्य जबाबदारी सुरक्षा मंडळाचीच आहे. या कराराअन्वयें येणाऱ्या जबाबदारीने यूनोच्या सनदेअन्वयें येणाऱ्या जबाबदारीला बाध येणार नाहीं. अटलांटिक कराराच्या सातव्या कलमांत ही गोष्ट स्पष्ट केली आहे."

या अटलांटिक कराराची बजावणी कशी होणार या गोष्टी अर्थात लष्करी महत्त्वाच्या असल्यानें गुप्तच असणार. पण त्यांचा व्याप केवढा आहे याची माहिती गुप्त ठिकाणाहून मिळवून 'सॅटर्डे इव्हिनिंग पोस्ट' या पत्रांच्या ११ सप्टेंबर १९४९ च्या अंकांत देण्यांत आली होती. त्या लेखाचा गोषवारा असाः —

उत्तर अटलांटिक करार हा मार्शल योजनेच्या आर्थिक योजनेची रणविषयक पुरवणी आहे. मार्शल योजना ही फक्त पहिली पायरी होती. अटलांटिक करार ही दुसरी पायरी होय.

त्या योजनेंतील पहिला भाग अमेरिकन सैन्य, आरमार व विमानदळ शांततेच्या काळींहि अवश्य इतकें जय्यत तयार असावे हा आहे. या दृष्टीने शस्त्रास्त्रवाढीच्या मोठ्या योजना तयार झाल्या असून १९५२ सालीं अमेरिकन विमानदळ दुप्पट होईल आणि लांब पल्ल्याची बॉंबर विमानें त्यांत खूप असतील.

दुसरा भाग उत्तर अटलांटिक करार. ब्रिटन व पश्चिम युरोपीय राष्ट्रें अमेरिकेच्या रणरचनेंत आल्यावांचून अमेरिका रशियाशीं लढूंच शकणार नाहीं.

तिसरा भाग या पश्चिम युरोपीय राष्ट्रांना द्रव्यसाहाय्य देऊन त्यांची युद्धाची तयारी करणें हा. ब्रिटन, फ्रान्स, बेल्जम, हॉलंड व लक्झेंबर्ग यांनीं मिळून पंचेचाळीस डिव्हिजन्स एवढें सैन्य तयार ठेवावें अशी अमेरिकेची अपेक्षा आहे. ( नंतर ही मागणी ३५ डिव्हिजन्स पर्यंत आली असें म्हणतात ) कमींत कमी २० डिव्हिजन्स तरी अवश्य असून त्यासाठीं पश्चिम युरोपीय राष्ट्रांनीं निदान तीन वर्षें सक्तीची लष्करभरती केली पाहिजे असें कॅ. लिडेल हार्ट सांगतो.

अटलांटिक योजनेचा चौथा भाग महासागरांतील नाक्याच्या जागीं अमेरिकेनें लढाऊ तळ मिळविणें हा. हे तळ निदान पाचशें होतील. ग्रीनलंड ते ऐसलंड असा एक अर्धचन्द्र आणि उत्तर अटलांटिकच्या टोकापासून ब्रिटन, पश्चिम युरोप, उत्तर आफ्रिका, मध्यपूर्व आशियाचा दक्षिण किनारा, जपान, पासिफिक बेटें, अल्यूशियन बेटें, अलास्का या सर्व ठिकाणापासून रशियाच्या प्रमुख स्थळांवर बॉंब टाकतां येतील अशा बेतानें हे तळ स्थापावयाचे आहेत.

पाचवा भाग म्हणजे रशियाच्या प्रमुख औद्योगिक ठाण्यावर पटापट ॲटम बॉंब टाकता यावे अशा प्रकारें दूरगामी बॉंबर्सचे कांहीं काफिले नेहमीं तयार ठेवणें.

या सर्व योजनेची अपेक्षित फलश्रुति अशी आहे कीं रशियाचा हल्ला ऱ्हाइनपर्यंत आला तरी पश्चिम युरोपच्या ४५ डिव्हिजन्स आणि अमेरिकेच्या १२ डिव्हिजन्स मिळून पश्चिम युरोपची आघाडी संभाळली जाईल आणि

इकडे अमेरिकन बॉंबर्स रशियाचीं सर्व मोठीं शहरें जाळून बेचिराख करतील.

अशी ही एकंदर योजना आहे. पण ही सर्व योजना फक्त कांहीं मुत्सद्यांच्या व सेनानींच्या डोक्यांत आणि त्यांनीं लिहिलेल्या कागदावर आहे. ती अमलांत आणणें कठीण आहे. त्यासाठीं शस्त्रास्त्रें, कारखानदारी माल व उपभोग्य माल याच्या राशींच्या राशी अमेरिकेला युरोपांत उतरवाव्या लागतील. त्यांची किंमत कांहींहि मिळणार नाहीं. जेथे लढाऊ तळ उभारावयाचें तेथें कोणतेंहि धनोत्पादन न करणारीं लढाऊ माणसांचीं शहरें उभारावीं लागतील. हें सर्व होण्यास आजच्या अंदाजानेंहि पाच सहा वर्षें लागतील आणि तोंवर रशियाला ॲटमबॉंब व इतर शस्त्रास्त्रें सांपडणार नाहींत असे नाहीं. शिवाय ज्या पश्चिम युरोपवर सारी भिस्त त्या पश्चिम युरोपांत कम्युनिस्ट पक्ष अधिकारावर आले तर ? फ्रान्समध्यें सुमारें तीनचतुर्थांश कामगार कम्युनिस्टांच्या मागें आहेत. इंग्लंडचा शस्त्रास्त्रखर्च जसा वाढत जाईल तशी इंग्लंडची आर्थिक घडी विस्कटेल आणि पश्चिम युरोपीय राष्ट्रांत स्पर्धा फार मोठी असल्यानें रणांगणावर त्यांची एकजूट टिकेलच याविषयीं आजतरी कोणाची खात्री नाहीं.

दुसऱ्या महायुद्धाची स्मृति पश्चिम युरोपांत इतकी ताजी आहे कीं खरोखरच रशियन रणगाडे चालून आल्यास पश्चिम युरोपीअन जनता लढण्यास कितपत पुढें येईल शंकाच आहे. हिटलरने जनतेच्या डोक्यांत जसें युद्धाचें वेड भरलें होतें व त्यांची रणक्षमता जशी वाढविली होती तसें कांहींच पश्चिम युरोपांत घडलेलें नाहीं. युद्धाचा प्रचार जो चालतो तो रशियाला पुष्कळसा भेवडावण्यासाठीं चालतो. पश्चिम युरोपला समोर नमूना जर कोणता असेल तर तो डेन्मार्कचा आहे. डेन्मार्कनें गेल्या महायुद्धांत जर्मनीपुढें मुळींच प्रतिकार केला नाहीं. जर्मन आले, नांदले आणि गेले. डेन्मार्कचा दूधदुभत्याचा धंदा भरभराटला व शाबूत राहिला. हें उदाहरण पश्चिम युरोपला अनुकरणीय नच वाटेल अशी खात्री वाटत नाहीं.

पण इतका दूरचा निराशावादी विचार लक्षांत न घेतां अमेरिका आपलें धोरण युरोपांत पुढें रेटीत आहे. इंग्लड, फ्रान्स, इटाली हीं स्वतंत्र राष्ट्रें असल्यानें अमेरिकेला अगदीं अनिर्बंध हस्तक्षेप करता येत नाहीं. पण जर्मनींत

अमेरिकेच्या हात अनिर्बंध चालू शकतो. युद्धानंतर जर्मनीवर इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स व रशिया यांचा सयुक्त अंमल बसला. या चौघाचें संयुक्त सरकार बर्लिनमध्ये स्थापन झालें. कायदे एकसारखे झाले. पण अखेर अंमलबजावणी-साठीं जर्मन मुलखाचे चार तुकडे पाडावे लागले.

त्यापैकीं रशियाकडे जो तुकडा गेला तेथ रशियाने जमिनदाराच्या ईस्टेटी खालसा करून शेतकऱ्याना जमिनी वाटल्या, जर्मन कम्युनिस्टांना वरिष्ठ अधि-काराच्या जागा दिल्या आणि फॅसिस्टाची मुळीनमुळी खादून काढली. बर्लिन शहर हें रशियानें व्यापलेल्या जर्मनीच्या मध्यभागीं ॲंग्लोअमेरिकनानीं व्यापलेल्या जर्मनीपासून रशियाव्याप्त मुलुखाच्या शंभर मैल आत आहे. पण ॲंग्लो-फ्रेंच-अमेरिकन अधिकाऱ्यांना फक्त बर्लिनला जाता येता येतें. पूर्व जर्मनींत कोठेंहि हिंडता येत नाहीं.

पश्चिम जर्मनीत इग्लड, फ्रान्स, अमेरिका याचे मुलूख वेगवेगळे होते ते आता एकत्र करण्यात आले असून पूर्व जर्मनी व पश्चिम जर्मनी अशी जर्मनीची फाळणीच झाली आहे. पूर्व जर्मनीत रशिया मुखत्यार आहे तर पश्चिम जर्मनींत मोठे धदे राष्ट्रीय मालकीचे करायचे अशी ब्रिटिश परराष्ट्र-मंत्री बेव्हिन याची प्रतिज्ञा होती, पण अमेरिकेनें त्याचें ऐकले नाहीं. पश्चिम जर्मनीचे वेगळे राज्यच उभारावे असें अमेरिकेनें ठरविलें. बेव्हिननें त्यास विरोध केला, पण अमेरिकेनें बेव्हिनचें न ऐकतां पश्चिम जर्मनीचें वेगळे राज्य उभारले आहे.

तेथे भांडवलशाही खुल्या दिलानें वावरत आहे इतकेच नव्हे तर नात्सी-वादाचें पुनरुजीवन झालें असून प्रचार व संघटना सुरू झाल्या आहेत. जर्मन कारखानदारीचें पुनरुज्जीवन होत आहे. रशियाशीं लढाईची वेळ आलीच तर फ्रेंचापेक्षा जर्मन्स हेच अधिक उपयोगी पडतील असें अमेरिकेला वाटते म्हणून अमेरिका पश्चिम जर्मनीलाच युद्धाचा तळ बनवीत आहे अशी टीका ॲंग्लो-अमेरिकन पत्रकारहि करतात.

अमेरिका व रशिया यांच्या या हालचाली गेली पाच वर्षें ज्या होत आहेत व ज्या कमी होत नाहींत त्यांचा अर्थ भावी ( संभाव्य ) महायुद्धांत जगांतील रणांगणावरल्या नाक्याच्या जागा ते व्यापीत आहेत असाच होतो. ही स्पर्धा या दोघांपैकीं कोणीं सुरू केली हे ठरविणें कठिण आहे. पण आज अधिक

बलवान कोण आहे हे पाहायचें असले तर अमेरिका हीच अधिक बलवान आहे हे मान्य करावें लागते. रशियाचा स्वताचा मुल्ख अफाट आहे, पण अमेरिका व कानडा ही राष्ट्रे एकराष्ट्र असल्याप्रमाणें राहतात हे लक्षात घेतल्यास त्याचा मुलुख रशियाएवढाच जवळ जवळ असून तो आधुनिक साधनानीं अधिक समृद्ध आहे. शिवाय अमेरिकेचीं दोन्ही खंड हे अमेरिकेचें राखीव कुरण आहे. आता मध्यपूर्वेत अमेरिकेचे हितसबंध उत्पन्न झाले असून ॲंग्लो-फ्रेंच-इटालीअन राष्ट्रे अमेरिकेच्या कक्षातच आलीं आहेत.

## तेलाची वाटणी व स्पर्धा

रणसामर्थ्य व उत्पादनसामर्थ्य यांचें मोठ्यात मोठे साधन जे पेट्रोल त्याची वाटणी जगात कशी झाली आहे हे खरोखर पहाण्यासारखे आहे. १९४३ चें तेलउत्पादन घेतलें तर एकट्या अमेरिकन राष्ट्राचें ( यू. एस्. ए. ) उत्पादन २०३ दशलक्ष मेट्रिक टन असून सोव्हिअट यूनिअनचे फक्त ३५ दशलक्ष मेट्रिक टन आहे. १९४५ सालीं अमेरिकेचे उत्पादन २३१ टनापर्यंत वाढलें. पण नात्सी जर्मनीच्या हल्ल्यापुढे रशियाचें भयकर नुकसान होऊन युद्धानंतर तेलाच्या खाणीचे पुनरुत्पादन मोठ्या कष्टानें सुरू करण्यात येत आहे.

जगातील तेल उत्पन्न करणारीं राष्ट्रे हळूहळू अमेरिकेच्या दावणींत सापडत आहेत हें लक्षात घेता अमेरिकेचे हे तेलसामर्थ्य अफाट वाढत आहे हे कोणाच्याहि लक्षात येईल. व्हेनेझुएलाचे तेलउत्पादन १९४२ पासून १९४५ अखेर दुपटीहून अधिक वाढलें व तें ४६ दशलक्ष टन झाले आहे. रुमानियातले तेल रशियाच्या कामीं येते म्हटले तरी तें दरसाल ७ दशलक्ष मेट्रिक-टनच निघतें. तर ब्रिटिशाचें इराणातील तेल दरसाल १० दशलक्ष, डचाचें ८ दशलक्ष टन, मेक्सिकोचे ६ दशलक्ष टन निघतें. १९३९ साली साऱ्या जगात एकूण २८५ दशलक्ष टन तेल निघालें ! त्यात रशियाचें ३० दशलक्ष टन, एकट्या अमेरिकन राष्ट्राचें १७० दशलक्ष टन होतें आणि दोन्ही अमेरिका खंडें अमेरिकेच्या लगामीं आहेत हे लक्षात घेता त्याचें एकूण तेल २२० दशलक्ष टन असून या तुलनेनें रणशक्ति रशिया व अमेरिका या दोघात कोणाची रणशक्ति अधिक आहे हें सहज कळू शकतें.

इराण, ब्रह्मदेश, बोर्निओ, डच इंडीज् बेटें हीं तेलाचीं आगरें असून अमेरिका जगभर आरमारी तळ पसरीत आहे, त्यामुळें या सर्व तेलप्रदेशावर

अमेरिकेचेंच वर्चस्व स्थापन होत असून जपानात अमेरिकेचा फार मोठा लष्करी तळ स्थापन झाला आहे व डार्डानेल्सच्या तोंडाशीं अमेरिकन आरमार व विमानदळ नेहमीं लढाईसाठीं सज्ज आहे हें लक्षात घेता रशियाला आपल्या भूप्रदेशांत अमेरिकेनें आजच कोंडून टाकले असून अमेरिका मात्र जगावर संचार करणारी व वर्चस्व गाजविणारी झाली आहे हे सहज कळून येईल.

या कोंडीतून बाहेर पडण्याचा अथवा तेलाचें एकादे नवें क्षेत्र मिळविण्याचा रशियानें प्रयत्न केल्यास असेरिका कसा निष्टुरपणे तो दडपून टाकते याचें उत्तम उदाहरण इराणातील अझरबैजान प्रकरण हें होय.

इराण हा मागसलेला देश असून त्याच्या उत्तरेस रशिया व दक्षिणेस अरबी समुद्र आहे. ब्रिटिश साम्राज्यास गेल्या शभर वर्षात नेहमीं रशियाची भीति वाटे. इराण हे यातलेंच एक भीतिस्थान होते. १९०७ साली रशिया व ब्रिटन यामध्यें एक सख्याचा तह झाला. त्याप्रमाणें दोघानीहि इराणचे स्वातंत्र्य मान्य केलें. पण पुढें उत्तर इराण रशियाच्या झारने सैन्यानें व्यापलें व दक्षिण इराणात इग्लंडनें तेलखाणीच्या मोठ्या सवलती मिळविल्या. त्यावेळीं ब्रिटन इराणात लोकशाही व्हावी अशी खटपट करीत होते तर रशियन झार जुन्या सरजामी राजवटीलाच पाठिंबा देत होता.

१९१७ साली रशियांत राज्यक्राति झाल्यावर कम्युनिस्टांनीं इराणातून सैन्यें काढून घेतलीं व सर्व हक्क सोडून दिले. ब्रिटननें आपले हक्क कायम ठेवले एवढेंच नव्हे तर वाढवून घेतले आणि सरजामी राजवटीला पाठिंबा दिला. दुसऱ्या महायुद्धाच्या आरभीं रेझाशहा पेहेलवी हा इराणच्या गादीवर होता. तो नात्सी जर्मनीस अनुकूल आहे असे कळताच अँग्लोअमेरिकन रशिअन सैन्यांनीं तेहरानवर चाल करून रेझाशहास पदच्युत केलें व उत्तर इराण रशियानें व्यापला आणि दक्षिण इराणातून रसद पोचविण्याची सोय केली.

युद्ध सपल्यानंतर २ मार्च १९४६ रोजीं सर्व परकी सैन्यें काढून घेतलीं जावीं असा अँग्लोअमेरिकनरशियन सरकाराचा तह झाला होता. पण रशियाला उत्तर इराणात तेलाच्या सवलती हव्याशा वाटल्या व रशियाने सैन्य काढून घेण्याचे नाकारून त्या सवलती इराणकडे मागितल्या.

उत्तर इराणांत अझर बैजान प्रात असून तोच प्रात पुढे रशियांतहि विस्तारलेला आहे. या दोन विभागाची भाषा, सस्कृति व चालीरीति एकच असून

रशिया व इराण या दोहोंत त्याची फाळणी झाली आहे. रशियांत बोल्शेविक अंमल सुरू झाल्यापासून रशियन अझरबैजानच्या स्त्रियांचा बुरखा गेला. स्त्रियाना पुरुषाच्या बरोबरीने राजकीय व सामाजिक हक्क मिळाले, सामुदायिक शेती सुरू झाली, लहान लहान धंदे वाढले, लोकाना चांगली घरेंदारें मिळाली.

पण रशियन सरहद्दीपलीकडे इराणात मागासलेपणाचा अंधकार तसाच होता. फक्त महायुद्धकालीन रशियन अमलामुळें तेथली जनता नवीन सुधारणा नुकतीच चाखूं लागली होती. रशियानें इराणांतील सुधारणावादी टूढे पक्षास पाठिंबा देऊन उत्तर इराणांतील आपली सत्ता दृढ करावी आणि तेलाच्या सवलती मिळवाव्या अशी खटपट सुरू केली. इराणी अझर बैजानमध्यें कम्युनिस्ट सरकारहि निर्माण झालें.

हा सर्व प्रकार अमेरिका स्वस्थपणें पाहील हें शक्य नव्हते. अमेरिकेनें रशियाला सैन्य मागें घेण्यास सांगितलें, युद्धाची तयारी केली व युनोच्या सुरक्षामंडळात रशियानें सैन्य मागें घ्यावें असा ठराव मांडला. तो पास झाला तेव्हा रशियानें निमूटपणें सैन्य मागें घेतलें. रशियानें कराराप्रमाणें प्रथम सैन्य मागें घेतलें नाहीं, पण नंतर यूनोचा आदेश पाळला. उलट अमेरिकेनें मात्र उत्तर कोरियांतून रशियन सैन्यें बाहेर गेलीं तरी आपली सैन्यें दक्षिण कोरियात ठेवलीं होतीं व ठरल्या तारखेस चीनमधून सैन्यें काढून घेतली नाहींत. अरबस्तान, इराण व इतर अरब राष्ट्रें यांतील प्रतिगामी राजवटींना ॲंग्लोअमेरिकन्स पाठिंबा देत आहेत. अझरबैजानवादात रशिया इराणात लोकशाही राजवट यावी म्हणत होता तर ॲंग्लोअमेरिकन्स हे प्रतिगामी राजवट उचलून धरीत होते. या प्रकारास उद्देशून २७ जानेवारी १९४६ चा 'मँचेस्टर गार्डिअन' लिहितो,

"आम्ही जर सावध राहून पुरोगामी शक्तींना उचलून धरलें नाहीं तर मध्यपूर्वेतील मुसलमानी जगांत ॲंग्लोसॅक्सनाऐवजीं रशियन्स हेच सुधारणेचे पुरस्कर्ते गणले जातील."

अमेरिका मध्यपूर्वेकडील तेलप्रदेशांत आता उतरली असून अरबस्तानांत तेल काढण्याच्या अफाट सवलती आतां अमेरिकेस मिळाल्या आहेत. इंग्लंड व फ्रान्स यांच्या तेलाच्या खाणी व तेलाचे शेकडों मैल लांबीचे नळ इराक,

सिरिया, पॅलेस्टाइन या भागांत आहेत आणि इंग्लंड-फ्रान्सची युद्धशक्ति कमी झालेली असल्यानें आता अमेरिकेच्या बलावर हीं दोन राष्ट्रे अवलंबून आहेत.

## पासिफिक व अमेरिका

युरोपात अमेरिकेचे पाऊल दृढपणे असे दुसऱ्या महायुद्धानंतर पडले. पण पूर्वआशियाकडे अमेरिकेचे लक्ष पन्नास वर्षांपूर्वीपासून लागले आहे. १८९८ साली अमेरिकेनें फिलिपाइन बेटे घेतली, त्यावेळी चीन जिकण्यासाठीं रशिया व जपान याचेमध्यें स्पर्धा चालू होती. ब्रिटनचें पाऊल चीनमध्ये आधींच पडलें होते. अशा वेळीं अमेरिकेला चीनचा बाजार आपणासहि खुला असावा अशी इच्छा होणे स्वाभाविक होते. म्हणून अमेरिकेनें चीन हे राष्ट्र कोणीहि जिंकू नये, ते मुक्तद्वार राहिले पाहिजे असें धोरण ( ओपन डोअर पॉलिसी ) जाहीर केलें. १९०४-५ सालीं जपानने रशियाशी माच्यूरियाबाबत युद्ध करून जपाननें रशियाचा पराभव केला. त्या वेळीं अमेरिका मध्यस्थी न करती तर जपानने चीन गिळलाच असता. पण अमेरिकेने मध्ये पडून जपानला मांच्यूरियातून हटण्यास भाग पाडलें. कोरिया मात्र जपानच्या भक्ष्यस्थानीं पडला.

पहिल्या महायुद्धात जपानने पुन्हा चीनवर झडप घातली व आपले वर्चस्व स्थापलें. पहिल्या महायुद्धानंतर वॉशिंग्टन येथे आतरराष्ट्रीय परिषद झाली व जपानला चीनवरील आपले हक्क पुन्हा ओकावे लागले. १९२० ते ३० च्या दरम्यानच्या काळात चीनमध्ये क्युमिटँग पक्षाचा विजय व नंतर क्यूमिटँग आणि कम्युनिस्ट यादवी झाली. पण त्याकडे इंग्लड-अमेरिका यानीं फारसे लक्ष दिलें नाहीं. १९३१ सालीं जपाननं माच्यूरियावर स्वारी केली व दहा वर्षे जपान चीनला गिळंकृत करीत होता. तेथें चिनी कम्युनिस्टांचा त्यास विरोध होत असे. अमेरिकेचें आर्थिक साहाय्य क्यूमिंटँग सरकारला होते. पण अमेरिकेनें अथवा क्यूमिंटँगने जपानच्या आक्रमणास फारसा प्रतिकार कधींच केला नाहीं.

दुसऱ्या महायुद्धात अमेरिकेला पडावे लागल्यानंतर चीनसंबंधाने गभीर विचार करण्यास अमेरिकेनें सुरवात केली. दुसऱ्या महायुद्धांत चिनी कम्युनिस्टानीं जपानच्या प्रतिकारांत पुष्कळ भाग घेतला व त्याचबरोबर आपलें

वर्चस्व इतके वाढविलें कीं दुसरें महायुद्ध संपल्यानंतर कम्युनिस्टांच्या हातीं सर्वसत्ता जाणार असा होरा अमेरिकेचा वाहूं लागला. क्यूमिंटँग पक्षाचा अध्यक्ष चँग कै शेक हा उत्तम सेनापति खरा, पण तो प्रतिगामी वृत्तीचा होता आणि प्रतिगामी बँकवाले, प्रतिगामी धंदेवाले व अमेरिकन भांडवलदार यांच्या हातचा गुलाम होता. त्याची नोकरशाही अत्यंत लाचखाऊ, अनीतिमान, आपले कर्तव्य करण्यास अत्यत नालायक होती.

उलट कम्युनिस्ट हे नीतिनिष्ठ, पुरोगामी, शिस्तप्रिय व क्रांतिकर्ते होते. त्यानीं जमीनदाराच्या जमिनी शेतकऱ्याना देऊन टाकून मोठी लोकप्रियता मिळविली. कम्युनिस्टाच्या साहाय्यावाचून चीनमध्ये शातता नादणार नाहीं हें ओळखूनच जॉर्ज मार्शल या अमेरिकन मुत्सद्याने कम्युनिस्ट व क्यूमिंटँग यांचें सख्य करण्याची शिकस्त केली. पण चँग कै शेक च्या तीव्र विरोधामुळें मार्शलला यश आलें नाहीं.

त्यानंतर कम्युनिस्टानी निकराने यादवी सुरू केली आणि १९४९ मध्ये बहुतेक चीन पादाक्रात करून १९५० मध्ये चीनचें कम्युनिस्ट लोकराज्य जाहीर केले. जिंकलेल्या प्रदेशात कम्युनिस्ट न्यायाने व कठोर शिस्तीनें वागतात आणि लोकाची स्थिति सुधारण्याचे प्रयत्न कम्युनिस्ट निकराने करीत आहेत अशी कबूली परकी राष्ट्रांचे मुत्सद्दीहि देतात.

या यादवींत चँग कै शेकला अमेरिकेने कर्ज वगैरे पुष्कळ दिलें, शस्त्रास्त्रें दिलीं, पण हीं सर्व शस्त्रास्त्रें अखेर रणांगणावर कम्युनिस्टांच्याच हातीं पडत. अखेरीस चँगकैशेकनें पुष्कळसें सोनें गाठीस लावून चीनमधून पळ काढला व फोर्मोसा बेटात ठाणें दिलें आहे. अमेरिकेनें जपान आपल्या हुकुमशाही-खाली घेतलेलें असून तेथून आता अमेरिका चँग-कै शेकला पाठिंबा देत आहे.

चिनी कम्युनिस्टांचें लोकराज्य स्थापन होणार हें कित्येक वर्षांपासून उघड दिसत होतें. अमेरिकेची इच्छा चीनमध्यें भांडवलशाहीला भरपूर वाव असावा आणि कार्यक्षम राज्यकारभार तेथल्या सरकारचा असावा अशी होती. चीनमध्यें कम्युनिस्ट आले तर तेथें भांडवलशाही कायम राहून कार्यक्षम राज्य-कारभार निर्माण होईल अशी अमेरिकेची कल्पना असावी. म्हणूनच बहुधा अमेरिकेनें चँगकैशेकला सैन्यानिशीं मदत केली नाहीं. अमेरिकेंत चिनी कम्यु-निस्टांविरुद्ध नेहमीं खूप प्रचार चाले. पण खुद्द अमेरिकन सरकारनें सोव्हिअट

रशियाच्या धोरणाविरुद्ध जेवढी प्रचारमोहीम केली तेवढी चिनी कम्युनिस्टां-विरुद्ध कधींच केली नव्हती.

चीनमध्यें १९४९ सालीं कम्युनिस्टांनीं जी अफाट चढाई व प्रगति केली तीमुळें मात्र अमेरिकन सरकार बिचकलें. युरोपात उत्तर अटलांटिक करार झाला त्याप्रमाणें पश्चिम पासिफिकमधील राष्ट्रांचाहि करार व्हावा असा प्रयत्न १९४९ साली केला. त्याला फिलिपाइन्स व ऑस्ट्रेलिया यांनी संमतिहि दिली. पण भारत सरकारचे परराष्ट्रमंत्री पं. नेहरू यांनीं पासिफिक करारास विरोध केला त्यामुळें पासिफिक करार अशक्य झाला. इतकेंच नव्हे तर इंग्लंड आणि भारत यांनीं चीनमधील कम्युनिस्ट सरकारला मान्यता देण्याचे कामींहि पुढा-कार घेतला, यामुळें अमेरिकन सरकार कांहींसें चकित व भयभीतहि झालें आहे. चीनमध्यें कम्युनिस्ट राज्य स्थापन झाल्यापासून त्याला सोव्हिअट रशियानें पाठिंबा दिला आहे आणि तितक्याच निकरानें अमेरिकेनें विरोध चालविला आहे.

अमेरिकेचे मार्शलनंतरचे परराष्ट्रमंत्री डीन अचेसन यानीं चालू वर्षारंभीं एक पत्रक काढून चीनमधील कम्युनिस्ट राज्य हें रशियाचें गुलाम आहे असा पुकारा केला आणि त्याविरुद्ध बंड करण्यास आपण साहाय्य करूं असेंहि जाहीरपणें आश्वासन दिलें. या चिनी कम्युनिस्टांचा आश्रयदाता सोव्हिअट रशिया हाच असून अमेरिकेनें त्याच्याशीं युद्ध केलें पाहिजे असा तगादा चँग-कैशेकनें अमेरिकेमागे लावला आहे. तिसरें महायुद्ध हाच कम्युनिझमच्या नाशाचा उपाय असून तेंच आपणांस आपली गादी परत देईल या भावनेनें चँक-के-शेक सोन्याचा ढीग अंगाखालीं घेऊन फोर्मोसांत तिसऱ्या महायुद्धाची तपश्चर्या करीत बसला आहे.

मलाया वगैरे देशांत कम्युनिस्टांनीं अत्याचार चालविले असून अमेरिकेनें कम्युनिझमला मागें हटविण्यासाठीं मागसलेल्या मुलुखाना द्रव्यसाहाय्य द्यावें व शस्त्रास्त्रें घेऊन कम्युनिस्टाशीं लढण्यास यावें अशी तपश्चर्या ब्रिटिश परराष्ट्र-खातेंहि करीत आहे.

## यूनो, अमेरिका आणि कोरिया

अशा सर्व परिस्थितींत कम्युनिस्ट असलेल्या उत्तर कोरियानें ता. २४-२५ जूनच्या मध्यरात्रीं दक्षिण कोरियावर सशस्त्र चढाई केली. ताबडतोब ता. २५

रोजीं रविवार असतांहि अमेरिकेंत यूनोच्या सुरक्षा मंडळाची बैठक भरून उत्तर कोरियास आक्रमक ठरविण्यात यावें व त्यानें सैन्य मागे घ्यावे असा ठराव करण्यात आला. उत्तर कोरियानें तिकडे लक्ष न दिल्याने ता. २७ रोजी दक्षिण कोरियास निरनिराळ्या मार्गांनें यथाशक्ति मदत करावी असा ठराव सुरक्षा मंडळानें मंजूर केला.

त्यापूर्वीच अमेरिकन अध्यक्ष ट्रुमन यानें उत्तर कोरियास मदत करण्यासाठीं शस्त्रास्त्रे पाठविलीं व सैन्यें पाठविण्याचीहि तजवीज केली. संयुक्त राष्ट्रसंघटनेनें सुप्रसिद्ध अमेरिकन सेनानी व जपानातील हल्लींचा अमेरिकन हुकुमशहा ज. मॅकार्थर यास दक्षिण कोरियातील सैन्याचे अधिपति नेमलें. जगातील इतर राष्ट्रांचें सैन्य दक्षिण कोरियात फार थोडे आहे व जे आहे तें फक्त अमेरिकेचें आहे. पण यूनोच्या सुरक्षामंडळाच्या आदेशानुसार ते लढत असल्यानें त्या सर्व सैन्यास युनोचें सैन्य असें मानण्यात येते.

उत्तर कोरिया व दक्षिण कोरिया ही विभागणी अगदीं कृत्रिम आहे. दुसऱ्या महायुद्धापूर्वी कोरिया जपानच्या अमलाखाली होतें. जपानचा पराभव झाला त्यावेळीं कोरियात रशिया व अमेरिका याचीं सैन्यें अनुक्रमे उत्तर व दक्षिण कोरिया येथे होतीं. दोघांमध्यें ३८ वी अक्षांश रेषा होती. ती मर्यादा ठरवून या दोन्ही राष्ट्रांनीं कोरियाची फाळणी केली. रशियानें आपल्या अमलाखालील कोरियात शेतकऱ्याना जमिनी दिल्या व कम्युनिस्ट पद्धतीचें राज्य स्थापून सर्वांगीण सुधारणा चालू केली. दक्षिण कोरियांत अमेरिकेनें अत्यंत प्रतिगामी वर्गाच्या हातीं सत्ता दिली. त्यानीं सुधारणांची मागणी दडपून टाकली, शेतकरी जमिनी मागत असतां त्याना दडपून टाकलें व अमेरिकेने नेमलेला सिंगमान ऱ्ही हा तेथे बहुमताचा पाठिंबा नसतांहि अमेरिकेच्या पाठिंब्यानें राज्य करीत राहिला.

१९४८ सालीं रशियानें उत्तर कोरियातून आपलें सैन्य काढून घेतलें व त्यानंतर दक्षिण कोरियांतून अमेरिकेनें आपले सैन्य काढून घेतलें. पण पाचशेहून अधिक अधिकारी अमेरिकेनें दक्षिण कोरियांत ठेवलेच. उत्तर कोरिया व दक्षिण कोरिया येथील सरकारें ही फाळणी रद्द करण्यासाठीं एकमेकांच्या मुलुखावर नेहमीं चढाई करीत असत. ता. २४--२५ जून १९५० च्या रात्रीं उत्तर कोरियानें, 'दक्षिण कोरिया आपणावर हल्ला करतो' अशी तक्रार करून त्यास

पिटाळून लावण्यासाठीं युद्ध पुकारलें व दक्षिण कोरियावर चाल केली. तिचा प्रतिकार करण्यासाठी अमेरिकेचें सैन्य वर सांगितल्याप्रमाणे पुढें सरसावले.

जगांत युद्ध सुरू झाल्यास शांतता स्थापन करणें ही यूनोची जबाबदारी आहे व म्हणून यूनोच्या आदेशाप्रमाणें अमेरिका या युद्धात पडली आहे असें सहज म्हणता येतें. पण यूनोनें इझराइलला युद्ध थांबविण्यास सांगितलें व इझराइलनें युद्ध थांबविलें नाहीं. पण अमेरिका व यूनो निष्क्रियच राहिली. काश्मीरमध्यें पाकिस्ताननें उघड चढाई केली व यूनोच्या कमिशननें सर्व चौकशीहि केली, पण काश्मीरमध्ये पाकिस्तान चढाई करते हा भारताचा आरोप खरा कीं खोटा याचे उत्तर अमेरिका व यूनो देत नाहींत. पण कोरियामध्यें उत्तर कोरियन कम्युनिस्टांनीं दक्षिण कोरियावर चढाई केली त्याबरोबर यूनोची वाट न पाहतांच अमेरिकन सैन्य कोरियाकडे पाठविण्याची घोषणा ट्रुमनने केली इतकेंच नव्हे तर फोर्मोसा व इंडोचायना येथेहि कम्युनिस्ट हल्ल्याविरुद्ध मदत देण्याचे आश्वासन दिलें. याचा अर्थ अमेरिका कोणत्याहि आक्रमणास विरोध करते असा नसून सोव्हिअट रशिया व कम्युनिझम् यांच्या आक्रमणास पायबंद घालण्याचा हिय्या जो अमेरिकेनें बांधला आहे त्याच धोरणांतले कोरियांतील युनोचा प्रतिकार हें एक पाऊल आहे.

सध्यांची जगाची परिस्थिति ही तिसऱ्या महायुद्धाच्या तयारीची आहे. हें तिसरें महायुद्ध होवो अथवा न होवो, त्याच्या पार्श्वभूमीचा त्रोटक इतिहास येथवर दिला आहे. या इतिहासात जे तात्त्विक मुद्दे उपस्थित होतात त्याचें विवेचन पुढील विभागात करूं.

# तिसऱ्या महायुद्धाची पार्श्वभूमि

## विभाग दुसराः—विवेचन

## : ८ : अमेरिकेनें जगत्स्वामिनी व्हावें ?

जागतिक राजकारणांत अमेरिकेचा पुढाकार आणि तोहि कम्युनिझम् व सोव्हिअट रशिया याना मागे हटविण्यासाठीं पुढाकार ही गोष्ट अमेरिकेच्या व जगाच्या इतिहासांत अगदीं नवी आहे.

पहिल्या महायुद्धात अमेरिका पडली, विजयी झाली, पण तिने युरोपातून पाय परत बाहेर काढला आणि जवळ जवळ दुसरे महायुद्ध सुरू होईपर्यंत जगात माल विकणें व भाडवल गुतविणे याहून इतर कोणत्याहि दृष्टीनें जगाकडे लक्ष दिले नाहीं. इग्लंडने मोठी साम्राज्यें स्थापलीं व परदेशाना अंकित केले. पण अमेरिकेने असें फारसें केलेलं नाही. पासिफिकमधील बेटें रणदृष्ट्या महत्त्वाचीं म्हणून व्यापलीं. फिलिपाइन्स जिकून घेतले पण त्याच्या अंतर्गत कारभारात फारसा हस्तक्षेप न करता तद्देशीयाच्या हस्ते राज्यकारभार करविला व फिलिपाइन्सना स्वातंत्र्य देऊन टाकण्याची योजना आखली. दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकेने फिलिपाइन्सना तावडतोव स्वातंत्र्य देऊनहि टाकले. महायुद्धाकाळांत भारताशीं ब्रिटिश सरकारने तडजोड करावी म्हणून रूझवेल्टनें पुष्कळ खटपट केली व चर्चिलवर वजन आणलें. दुसऱ्या महायुद्धानंतर भारताला ब्रिटननें स्वातंत्र्य दिले त्याला अमेरिकन सरकार व लोकमत याचें दडपण पुष्कळच कारणीभूत झाले.

मागें सांगितल्याप्रमाणें अमेरिकेची वाढलेली व सतत वाढणारी संपत्ति

जगाच्या पुनर्घटनेसाठीं खर्च करायची असें धोरण अमेरिकेचें ठरलें होतें. पण सोव्हिअट रशिया हें विघ्न मध्येच उभे राहिले असें दिसते.

रशियाची सोव्हिअट पद्धति आणि हिटलरची फॅसिस्ट पद्धति या दोन्ही फॅसिस्ट पद्धतिच असून त्यांचा मोड केल्याशिवाय राष्ट्रीय स्वातंत्र्य, व्यक्ति-स्वातंत्र्य व लोकशाही हीं जीं पाश्चिमात्य संस्कृतीची वैशिष्ट्यें तीं जगात नांदणार नाहींत असें मानणारा एक फार मोठा संप्रदाय गेलीं पधरा वर्षे अमेरिकेत वाढतो आहे. हे विचारवंत भांडवलशाही व साम्राज्यशाही यांचेहि शत्रुच आहेत. यापैकीं एक विचारवंत लुई फिशर यानें भारतातून ब्रिटिश साम्राज्यशाहीचें उच्चाटन व्हावें यासाठीं बरीच मेहनत घेतली. पण सोव्हिअट पद्धतीचाहि तो हाडवैरी आहे. मॅक्स ईस्टमन, जेम्स बर्नाम वगैरे आणखी अनेक लेखकहि सोव्हिअट रशियाचे वैरी असून अँग्लोअमेरिकन लोकशाहीचे पुरस्कर्ते आहेत.

विशेष हे कीं रशियात स्टालिननं जगत्क्रांतीचें धोरण सोडून दिले, यामुळें चिडून ज्यांनीं स्टालिनविरुद्ध अत्याचारी कट केले त्याविरुद्ध स्टालिननें दडपशाही केली तरीहि या अमेरिकन लोकशाहीवाद्याचा स्टालिनवर राग आहे. स्टालिनचा जर पाडाव या कटवाल्यानीं केला असता व ते रशियात सत्ताधीश झाले असते तर त्यानीं स्टालिनपेक्षा अधिक कडवी हुकुमशाही रशियांत गाजविली असती इतकेंच नव्हे तर जागतिक क्रांतीचे प्रयत्न अधिक निकरानें व आधिक हिंस्रपणें केले असते. ट्रॉट्स्की, झिनोव्हिफ्, कॅमेनेव्ह, बुखारिन या सर्वांचा स्टालिनवर जो मुख्य आरोप होता तो जगत्क्रांतीचें धोरण सोडून देतो हाच होता. अशा विरोधकावर स्टालिननें दडपशाही केली तरीहि अमेरिकेतल्या स्टालिनविरोधकानीं स्टालिनला जगांतील दडपशहाचा शिरोमणि असें मानले असून गेल्या पांचसात वर्षांत अमेरिकेनें या रशियाचा प्रतिकार केला पाहिजे, त्याला त्याच्या घरात अमेरिकेने चिणलें पाहिजे नाहींतर हा रशिया जग खाऊन लोकशाही, राष्ट्रीय स्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य बरबाद करील, असा प्रचार या लेखकांनीं अमेरिकेंत चालविला आहे.

प. नेहरू अमेरिकेंत गेले त्यापूर्वी लुई फिशरनें एक लेख लिहून 'जगात आज लोकशाही व सोव्हिअटशाही अशी दुफळी पडली आहे, तींत नेहरूंनीं आपण ही अथवा ती बाजू घेतली पाहिजे, तटस्थ, मध्यस्थ, स्वतंत्र अशी कोणतीहि भूमिका घेता कामा नये' असा नेहरूना इषारा दिला होता. पण नेहरूनीं

दोहोंपैकी एक पक्ष घेण्याचें नाकारले, इतकेच नव्हे तर कम्युनिस्ट चीनला सुरक्षा मंडळात घ्या असा आता हट्ट धरला आहे. यामुळे नेहरू हे रशियाच्या जाळ्यात सापडले असा उघड प्रचार इंग्लंडात व अमेरिकेत वाढला असून आशियात रशियास अनुकूलपणें वाहणारे हे वारे अधिक वाढण्यापूर्वी जरूर तर रशियाशीं एकदा अखेरचा मुकाबलाहि करण्याची घाई अमेरिकेला झाली आहे. हा मुकाबला जितका उशीरा होईल तितका तो अमेरिकेला प्रतिकूल जाईल असे अमेरिकेतील सोव्हिअटविरोधी प्रचारकाचे मत असून बैलाची शेपटी पिरगाळावी त्याप्रमाणे हे प्रचारक अमेरिकन सरकारची शेपटी आपल्या प्रचाराने पिरगाळीत आहेत व अमेरिकन सरकार वाढत्या वेगानें रशियाविरोधी आघाडी वाढवीत सुटले आहे.

अमेरिकेतल्या ज्या प्रचारामुळे अमेरिकन सरकार व अमेरिकन लोकमत सोव्हिअट रशियाविरुद्ध एवढें खवळून उठले आहे त्याचे स्वरूप वाचकांना कळल्यावाचून अमेरिकेच्या हल्लीच्या रशियाविरोधी अजस्र प्रयत्नाचे रहस्य वाचकाना कळणार नाही, म्हणून अशा प्रचाराचा एक नमूना मी येथे देणार आहें.

## बर्नामचा ग्रंथ

जेम्स बर्नाम याने 'स्ट्रगल फॉर दि वर्ल्ड' हा ग्रंथ १९४७ च्या आरंभीं प्रसिद्ध केला. त्याचा विस्तृत गोषवारा अमेरिकेतील सुप्रसिद्ध 'टाइम' या नियतकालिकात कित्येक पृष्ठात प्रसिद्ध करण्यात आला. स्वतां बर्नामने तो सारांश काढला असावा अथवा मंजूर केला असावा. 'टाइम'सारख्या प्रख्यात नियतकालिकानें तो दिलेला असल्याने तो अधिकृत खास आहे. त्या सारांशाचा सारांश मी येथें देणार आहें. 'टाइम' नें त्या ग्रंथाचा पुरस्कार करताना म्हटले आहे कीं,

" जेम्स बर्नामचा ' स्ट्रगल फॉर दि वर्ल्ड ' हा जो ग्रंथ या आठवड्यात प्रसिद्ध झाला, तो अतीशय चर्चिला जात आहे. सदर लेखक धीटपणे मांडतो तो सिद्धांत असा कीं, ' रशिया व अमेरिकन राष्ट्र यांचे युद्ध अटळ आहे. हे युद्ध आम्हीं जे करायचें ते जगाची बलवान संघटना स्वतां करूनच अमेरिकेनें केले पाहिजे. नाहींतर आम्ही ( म्हणजे अमेरिका ) ठार होऊं. अमेरिका आपली चंचलता सोडून जगावर साम्राज्य स्थापणार नाहीं तर कम्युनिझम्-

पुढें पाश्चात्य संस्कृति खलास होईल.' या लेखकाच्या मतानें तिसरे महायुद्ध सुरू झालेंच आहे. आरभींच्या चकमकी झडल्या आहेत. रशियाच्या लक्षात हें आलें असून राजकीय व नैतिक दृष्ट्या त्याची तयारी झालेली आहे. पण अमेरिकेजवळ ॲटॉमिक बॉंब असूनहि अमेरिकेची मात्र तयारी नाही. ॲटॉमिक बॉंब निर्माण झाला असल्यानें थोड्याच वर्षांत सर्वकष युद्ध हे अपरिहार्य आहे. ॲटम बॉंब एकट्या अमेरिकेजवळ असेल तरच यापुढें युद्ध कायमचे टळेल. अमेरिकेचें परराष्ट्रधोरण आजवर सारे चुकलें. पाच वर्षांत चीन, कोरिया, जर्मनी आणि बाल्कन द्वीपकल्प अमेरिकेने रशियाच्या पदरांत टाकली. हें धोरण आपण उलटवून स्वताकडे जगाचें पुढारीपण घेतलें पाहिजे. यासाठीं सोव्हिअट साम्राज्याऐवजीं अमेरिकन साम्राज्य जगावर स्थापले पाहिजे. हें साधण्यासाठीं बर्नाम जो कार्यक्रम सागतो तो असा; मित्रराष्ट्रांना राजकीय व आर्थिक सवलती अफाट प्रमाणात द्याव्या. जरूर तेथे तावडतोब शस्त्र वापरावें. ब्रिटिश साम्राज्य व अमेरिका एक करावी, अमेरिकेतील सर्व कम्युनिस्टांना ठेचून काढावे."

कम्युनिस्टांविरुद्ध ही भव्य मोहीम काढणारा बर्नाम स्वतः पूर्वी कम्युनिस्ट होता. 'न्यू इंटर नॅशनल' नावाचे ट्रॉटस्काइट पत्र तो चालवी. 'मॅनेजेरिअल रेव्होल्यूशन' आणि 'मॅकीवेलिअन्स' हे त्याचे दोन ग्रथ सोव्हिअट पद्धती-विरुद्धच होते व ते फार गाजले. त्याच्या 'स्ट्रगल फॉर दि वर्ल्ड' या ग्रथानें अमेरिकन लोकमताची विलक्षण पक्कड घेतली आहे. इतकी प्रस्तावना करून आता बर्नामच्या ग्रथाच्या 'टाइम' मधील साराशाचा साराश देण्यास येथे सुरवात करतो.

जेम्स बर्नाम म्हणतो, "तिसरे महायुद्ध सुरू झालेंच आहे. १९४४-च्या एप्रिल-मध्ये तें सुरू झालें. दुसऱ्या महायुद्धातील रणातल्या धुराने आकाश व्यापले होते, मोठमोठीं शहरे धडाधड कोसळत होतीं. त्यामुळें तिसरे महायुद्ध सुरू झाल्याचे दिसलेंहि नाहीं व ऐकूंहि आलें नाहीं. अलेक्झांड्रिया बदरात ब्रिटिशाच्या आधिपत्याखालीं काहीं ग्रीक जहाजें होतीं त्यातील खलाशांनीं व सैनिकांनीं १९४४ च्या एप्रिलांत बड केलें. गोळीबार झाला. काहीं माणसें मेलीं. बड शमलें. तें मामुलीच होतें. पुढे जेव्हा ग्रीसमध्यें निकराची यादवी सुरू झाली तेव्हा कांहीं लोकांना त्या बंडाची आठवण झाली.

अलेक्झांड्रियांतील बंड इलास सैनिकानीं केलें होतें. या इलासांचें नेतृत्व ग्रीक कम्युनिस्टाकडे होतें. हे ग्रीक कम्युनिस्ट इतर सार्‍या कम्युनिस्टाप्रमाणें आतरराष्ट्रीय कम्युनिझमचाच विभाग होत. या आतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीचीं सूत्रे सोव्हिअट यूनिअनमधून चालविलीं जातात. अर्थात् अलेक्झांड्रियानले बंड व ग्रीसमधील यादवी ही खरोखरच ब्रिटिश साम्राज्य आणि सोव्हिअट रशिया यांमधील नव्या युद्धाची सुरवातच होती.

१९४५ सालीं जपान पडल्यावर उत्तर चीन व मांच्यूरिया येथे रशियानें तयार केलेल्या कम्युनिस्ट पलटणी आणि अमेरिकेनें तयार केलेल्या क्यूमिटँग पलटणी लढू लागल्या. पण ब्रिटन, अमेरिका व रशिया याची मैत्री त्या वेळीं चालू होती यामुळें हें तिसरें महायुद्ध सुरू झाले असें कोणीं मानले नाहीं. या त्या वेळीं सुरू झालेल्या व ननर चाललेल्या तिसर्‍या महायुद्धात आतापर्यंत हजारों अमेरिकन सैनिक मारले गेले आहेत. अमेरिकेने आता जगाच्या व्यवहारात उडी घातली असून अमेरिका आतां माघार घेऊं शकणार नाही.

जागतिक राजकारण हें आमच्या अंतर्गत राजकारणापेक्षा अधिक निकडीचें आहे असें मानण्याच्या कालखंडात आपण शिरलो आहों. आतां सोव्हिअट रशियाची जगावर सत्ता चालायची कीं अमेरिकेची चालायची या मुद्यावर झगडा सुरू झाला असून जागतिक राजकारणातील व प्रत्येक राष्ट्राच्या अंतर्गत राजकारणातील महत्त्वाच्या गोष्टी या आता या जागतिक झगड्याभोंवतीं फिरत राहून तदनुसार वळण घेणार आहेत.

या झगड्यात अमेरिका ही एका बाजूनें आघाडीवर असली तरी सामाजिक, राजकीय, सास्कृतिक दृष्ट्या अमेरिका या संग्रामास सिद्ध झालेली नाहीं. अमेरिकनाना प्रचड उत्पादनाचें तंत्र साधलें आहे, पण अमेरिकन तरुण कारखान्यातून बाहेर पडला कीं तो इतर सर्व व्यवहारात महामूर्ख ठरतो. युद्धावरून परत आलेल्या अमेरिकन सैनिकानें काय केलें ? आईला भेटला, एक झक्क पोरगी घेतलीन्, एक नोकरी पकडलीन्, गुत्त्यावर गेला, बस !

ही संकुचित वृत्ति हा सैनिकाचा दोष नाहीं. हा पुढार्‍यांचा गुन्हा आहे. जागतिक साम्राज्याची जबाबदारी यानीं सैनिकाला शिकविलीच नाहीं. आतां

रोजच्या रोज साऱ्या जगात हस्तक्षेप करण्याचा प्रसंग येतो आहे. पण त्यासाठीं जरूर तें सैन्य उभारायला हवे हेंहि आमच्या कॉंग्रेसच्या मनात येत नाहीं. तो विषय चर्चायोग्यहि मानला जात नाहीं. सैन्य कमी करा अशी एकच मागणी केली जात आहे.

आमची शिक्षणपद्धति अशीच भिकार आहे. कोणाला परभाषा शिकवल्या जात नाहीत. परकी संस्कृति कोणी शिकत नाहीं. जगाचा इतिहास, जगाचें अर्थशास्त्र, जगाचा लष्करी इतिहास असें कांहींहि शिकविलें जात नाही. देशातील आर्थिक दृष्टिकोन असाच संकुचित आहे. जो तो परदेशीं माल विकावा म्हणतो. पण परक्यांचे कांही तरी खरीदल्याशिवाय विकता येणार कसें हे साधे अर्थशास्त्र कोणासहि कळत नाहीं.

राजकीय समजुतींत अपक्वता आहे. त्यामुळे परराष्ट्रधोरणात अकारण आकस्मिक बदल होतात व आपल्या सामर्थ्यासारखीं फळे मिळत नाहींत. लेनिन म्हणे, आपण महायुद्धें आणि क्रांत्या याच्या कालखंडात आहो. या कालात फॅसिस्ट, नात्सी अथवा कम्युनिस्ट इत्यादि विविध प्रकारचे 'टोटॅलिटेरिअन' राजकारणच खेळलें जात आहे. पण आम्हां निर्बुद्ध लोकाना ते कळत नाहीं. आमचे डेमोक्रॅटिक आणि रिपब्लिकन पक्ष आहेत तसेच हे अनेक पक्ष असतील असें आम्ही मानतों. पण या टोटॅलिटेरिअन पक्षात पोलादी शिस्त, दहशतवाद, सर्व जीवनास एका मुशींत घालणारे तत्त्वज्ञान असते हे आमच्या लक्षांतच येत नाहीं.

आमच्या मुत्सद्याना वाटते कीं सोव्हिअट प्रतिनिधी हे आमच्याचसारखे आहेत, फक्त थोडे अधिक टणक आहेत. पण त्याना हें कळत नाहीं कीं सोव्हिअट प्रतिनिधि परिषदेंत बसतात तेव्हा करारमदार करण्यासाठीं नव्हे तर विरोधकाना हाणून पाडून सभा जिंकण्यासाठीं बसतात. 'सोव्हिअट प्रजाराज्य आणि साम्राज्यशाही राज्यें ही दोन्हीं एकाच जगात नांदणार नाहींत. कोणी तरी एकानें दुसऱ्याचा निकाल लावला पाहिजे,' असें स्टालिन स्पष्टपणे सांगतो आहे.

कम्युनिस्ट युद्धाला आजहि तयार आहेत व जागोजाग ते लढत आहेतहि. पण १० ते १५ वर्षें मोठें युद्ध न झालें तर त्याना बरे वाटेल एवढें खरें. याचें कारण उघड आहे. आज कम्युनिस्टाची सत्ता अथवा वर्चस्व जेथें जेथें

आहे तेथे तेथे समाज मागासलेले आहेत. अजून कम्युनिस्टाना ॲटॉमिक अस्त्र मिळालेले नाही. युद्ध लाबणीवर पडले की हे मागसलेपण कमी करतां येईल. पाच वर्षात ॲटमबॉंब त्याना साधेल. शत्रूजवळ ॲटॉमिक अस्त्र आले की युद्ध लाबणीवर टाकता येत नाही. जे त्यात हरतात त्यांचा सर्वनाश होतो. दीर्घकालीन शिक्षणाने शातिप्रिय व सुसस्कृत समाज स्थापण्याइतका वेळ ॲटॉमिक अस्त्राची व्यवस्था लावता आल्यावाचून जगाला मिळणारच नाही.

ही व्यवस्था म्हणजे ॲटॉमिक अस्त्राची सर्व हक्कदारी एका सरकारकडे असणें हीच. अशी हक्कदारी असणारेच ते अस्त्र वापरतील हा धोका आहे. पण तो सभव फार कमी असेल. त्याना तशी गरजच असणार नाहीं. कारण इतर कोणी ॲटॉमिक अस्त्र वापरील अशी भीति बाळगण्याचें त्याना कारण नाही. ही ॲटॉमिक अस्त्राची हक्कदारी कोणाला द्यावी ? जागतिक सरकारला द्यावी असें उत्तर सहज सुचते. पण जगाचे सरकार उभारणें ही सोपी गोष्ट नव्हे.

आजची युनो असें सरकार होईल काय ? सरकार ही काहीं एक अमूर्त कल्पना नव्हे. ती चालविण्यास माणसे, सस्था असाव्या लागतात व त्याच्या कल्पना आणि श्रद्धा सारख्या असाव्या लागतात. राज्य म्हटलें कीं त्यातल्या पुष्कळशा लोकाची सक्तीची अथवा खुषीची तयारी सरकारपेक्षा अधिक सत्ता कुणाचीहि नाही असें मानण्याची असावी लागते. याचाच अर्थ सरकार हेच सार्वभौम होय असें मानण्याची तयारी असावी लागते. युनोला सार्वभौम मानण्यास आज कोणीच तयार नाहीं.

अमेरिकेतली सस्थाने नाही का एकराज्य झालीं, असें लोक विचारतात. अमेरिकन संस्थानाची भाषा एकच, संस्कृति पुष्कळशी सारखी आणि युरोपीयाच्या स्वारीची भीति यामुळे अमेरिकन सस्थानें एकराज्य झाली. आज जगात एक भाषा नाहीं, एक सस्कृति नाही आणि ‘ टोटॅलिटेरिअन ’ व ‘ बिनटोटॅलिटेरिअन ’ अशी आजच जगाची फाळणी झाली आहे. या जगाचें एकराज्य कसें होणार ?

आपण सर्वांच्या संमतीनें जगाचें राज्य स्थापणे अशक्य आहे असें बोलतो आहो. पण त्याऐवजीं शस्त्रबळाने अथवा शस्त्राच्या धाकाने जगाचें एक साम्राज्य स्थापायचें म्हटले तर तें मात्र शक्य आहे असें इतिहास सांगतो. ‘ साम्राज्य ’

याचा अर्थ अगदीं जगभर अखंड सत्ता असी मी मानीत नाहीं. एका सरकारच्या हातीं जगावरील फक्त राजकीय सत्ता असावी एवढेंच. ही सत्ता लढूनहि मिळवावी लागेल. पण पुष्कळशी युद्धाच्या धाकानेच मिळेल. एका राष्ट्राने इतर राष्ट्रावर ही राजकीय सत्ता गाजवावी लागेल.

कल्पना करा की अमेरिकन संस्थानांनीं राजीखुषीनें आपलें फेडरेशन केलें तसें केले नसते आणि न्यूयॉर्क व पेन्सिल्व्हानिया या दोन संस्थानांनी एक होऊन इतर कोणाला सवलती, कोणाला लांच, कोणाला धमकी तर कोणाला तडाखा देऊन सर्वांना एका राज्यात बांधलें असतें आणि मग फक्त परराष्ट्रसंबंध, सैन्य वगैरे प्राणभूत खातीं तेवढीच मध्य सरकारकडे ठेवली असती, म्हणजे न्यूयॉर्क, पेन्सिलव्हानिया याचें जसे साम्राज्य झाले असतें तसे जगाचे साम्राज्य मला अभिप्रेत आहे. ही सत्ता 'टोटॅलिटेरियन' असण्याची जरूरी नाहीं. मुख्य म्हणजे ॲटॉमिक अस्त्र व अशीं इतर अस्त्रें एका सरकारने आपल्या हातीं ठेवली म्हणजे झाले. बाकीचा सर्व जीवनव्यवहार ज्यांचा त्याना करू द्यावा.

आज जगात हें पृथ्वीपतित्व व त्यासाठीं ॲटॉमिक अस्त्राची हक्कदारी मिळविण्याला दोनच राष्ट्रें समर्थ आहेत. अमेरिका आणि रशिया. त्या दोघामध्ये कोणीं पृथ्वीपति व्हावें, याचा निर्णय लागेल व तो आजच्या पिढीच्या हयातींत लागेल. कदाचित या वादांत दोघेही उध्वस्त होतील. पण एकतरी नष्ट झालाच पाहिजे.

या दृष्टीने अमेरिकेचे परराष्ट्रधोरण आजवर सपशेल चुकले. ते आमूलाग्र बदललें पाहिजे. आमच्या परराष्ट्रसंबधात एक अखंड धोरण नाही. काय, पोलंडमध्ये निवडणुकी होणार ना ? फेका पोलंडच्या लंडनमधील सरकारला खिडकीबाहेर ! चॅंग कै शेक डेमोक्रॅटिक नाहीं ? बांधा त्याच्या गळ्यांत कम्युनिस्टाचें लोढणें ! यातलें अमुक एक चूक अथवा बरोबर असें नव्हे. याला कांहीं पायाच नाहीं. काहींतरी थातुरमातुर करून रशियाशीं जमतें घ्यावें असें आम्ही म्हणतों, पण कम्युनिस्टांशी जमते घेण्याचा मार्ग त्याचे गुलाम होणें एवढाच आहे.

येथें दोन धोरणाचा पुरस्कार होतो. एक धोरण रशियाची मनधरणी (अपीज-मेंट) करणारें आहे. हेन्री वॉलास, क्लॉड पेप्पर, एलिअट रूझवेल्ट, जोसेफ डेव्हिस यांचा हा पंथ आहे. दुसरें धोरण जगापासून अलग राहण्याचें (आय-

सोलेशनिझम् ). शिकागो ट्रिब्यून, न्यूयॉर्क डेली न्यूज वगैरे पत्रें या मताचीं आहेत. हे दोघे एकमेकाना शिव्या देतात. पण दोन्ही धोरणामुळे कम्युनिझम् माजणार आहे. अखेर या दोन्ही धोरणाने आपली तयारी न होताच युद्ध ओढवून आमचा सर्वनाश होईल.

कम्युनिस्टाचे अंतिम ध्येय जगाचे साम्राज्य हें आहे, सध्याच्या कालखंडात फक्त युरोप आणि आशिया ( युरेशिया ) यावर प्रभुत्व स्थापून बाकीच्या प्रदेशात कम्युनिझम् झिरपत न्यावा हे त्याचें धोरण हाणून पाडणे हें अमेरिकेचे पाहिले कर्तव्य असलें पाहिजे, पण अमेरिका असें वागली का ?

मी फक्त काही उदाहरणें देऊन चुका दाखवित्तों. युगोस्लाव्हियात टिटोला सत्ता द्यायची कीं मिहालोविचला द्यायची याचें ॲंग्लोअमेरिकनाना स्वातंत्र्य होतें. टिटो रशियाचा एजंट होता. मिहालोविच राष्ट्रवादी असून नात्सी जर्मनीशीं लढलाहि होता. त्याच्याच हातीं सत्ता दिली असती तर त्यानें कम्युनिस्टानाहि ठोकून काढलें असतें. पण आम्ही टिटोच्या हातीं सत्ता दिल्यामुळें बाल्कनमुलूख कम्युनिस्टांना देऊन टाकल्यासारखेच झालें.

अमेरिकन मुत्सद्यानीं गुप्त तह करून रशियाला क्यूराइल बेटें, दक्षिण साखालिन बेटें, डेरिअन आणि पोर्ट आर्थर हीं न गोठणारीं बंदरें, मांचूरिया, उत्तर कोरिया हे प्रदेश देऊन टाकले. रशियाला जपानविरोधी लढ्यात गोवण्यासाठीं, म्हणे, ही किमत दिली. हे तह झाले त्यावेळेपर्यंत जपानला आपण रशियाच्या मदतीशिवाय जिंकू शकतों हें आमच्या सेनापतींना कळलें असलें पाहिजे. रशियाला युद्धाबाहेर ठेवणें हें आपलें धोरण असायला हवे होतें. पण आम्हीं काय केलें ? ‘ अरे हे भरपूर पैसे घे आणि मला चार चागल्या लाथा घाल ’ असें आमचें मोठें लक्षांत राहण्यासारखें वर्तन घडलें.

बाल्कन्समध्ये दुसरी आघाडी सुरू करावी हा मुद्दा अखेर इंग्लंड व अमेरिका यांना पटला होता. पण रशियानें विरोध केला. अमेरिकेनें नमते घेतलें. आणि पूर्व युरोपात कम्युनिझम् माजण्याला अमेरिकेनें हातभार लावला.

चीनमध्यें कम्युनिस्ट व क्यूमिंटँग याचें संयुक्त सरकार स्थापण्याचा प्रयत्न अमेरिकेनें केला. पण ते कसें शक्य होणार ? कम्युनिस्टांना तेथें रशियाचा ‘ टोटॅलिटेरिअन ’ प्रांत स्थापायचा आहे. हें टाळण्यासाठीं चँग कै शेकला पाठिंबा

देऊन कम्युनिस्टाचें सैन्य, पोलीस, राज्यकारभार, आर्थिक संघटना अमेरिकेनें उध्वस्त करायला हव्या होत्या.

१९४५च्या आरभीं अमेरिका, इंग्लंड, कानडा, फ्रान्स वगैरेची सैन्यें युरोपात होती ती एवढी प्रचड होती कीं त्यानीं सगळा ऑस्ट्रिया, कांही युगोस्लाव्हिया, पुष्कळसा झेकोस्लोव्हाकिया, पूर्व जर्मनी व बर्लिन इतका प्रदेश रशिया येण्यापूर्वी सहज व्यापला असता. पण मॉस्कोंत झालेल्या गुप्त करारामुळें या गोष्टी आम्हीं केल्या नाहींत. रशियाला शेतीप्रधान जर्मनी, बर्लिनचा फार मोठा भाग, आणि बर्लिनमध्ये प्रथम प्रवेश करण्याचा दिमाख आम्ही मिरवूं दिला. आता तेथून रशियन्स सर्व जर्मनीवर प्रभुत्व मिळवूं पहात आहेत.

पश्चिम जर्मनींतले कारखाने कम्युनिस्ट रशियाच्या समाधानासाठीं बरबाद करण्यात आले. पण पूर्व जर्मनींतून पश्चिम जर्मनींत धान्य मात्र मुळींच येत नाहीं. पूर्व जर्मनींत कम्युनिस्टांनीं इतर पक्षास टेंचून काढले, पण पश्चिम जर्मनीत कम्युनिस्टांना प्रचारस्वातंत्र्य आहे. पूर्व जर्मनींत साऱ्या जर्मनीचें एकीकरण आणि सोव्हिअट साम्राज्यांत स्थान अशीं आमिषे दाखविली जातात. पण पश्चिम जर्मनींतून अमेरिकन सरकारमार्फत जर्मनाना कोणतीहि आशा दाखविली जात नाहीं.

तुर्कस्तानवर कम्युनिस्टाचें दडपण सतत वाढते आहे. दार्दानेल्सकडे, कार्स व अर्धाहान या तुर्कस्तानच्या पूर्व प्रदेशाकडे त्याची नजर आहेच. तुर्कस्तानचा लचका काढून आर्मेनियाचें प्रजाराज्य स्थापण्याची रशियाची मोहीम सुरू आहे. रशियांत तयार केलेले घरभेदे तुर्कस्तानात काम करीत आहेत. प्रोफेसर, पत्रकार रात्रीचा दिवस करून ‘ तुर्क हेच वाईट ’ असें सिद्ध करण्यासाठीं अकला पाजळीत आहेत.

खरोखर तुर्कस्तानासाठीं अमेरिकेनें काय केलें पाहिजे ? कायदेबाजी, आंतरराष्ट्रीय नीतिबाजी थोडी बाजूला ठेवावी. तुर्कस्तानला ५०० ते १००० उत्कृष्ट विमानें उधारीनें घ्यायला लावावीं. हजारो उत्तम लष्करी अधिकारी पाठवावे. त्यानीं तुर्की सैनिकांना शिक्षण द्यावें. अमेरिकन आरमाराच्या मोठ्या कवाइती भूमध्य समुद्रांत करण्याचे आमंत्रण तुर्कांकडून मागवावें; अमेरिकन वैमानिक शिक्षण व अनुभव घेण्यासाठीं मध्यपूर्वेस येतात असें दाखवावें

आणि त्यांत ॲटॉमिक अस्त्रांची व्यवस्था करून कॉकेशन तेलखाणीपर्यंत तीं विमानें झेप घेऊ शकतील इतकी तरतूद करावी.

पण असें काहींहि न करता आज आम्ही काय करीत आहों ? एकीकडून तुर्कस्तानला कम्युनिझमची अतर्बाह्य धग लागते आहे. आणि दुसरीकडून मिळमिळीत नैतिक आशीर्वाद मिळत आहेत. यामुळें काय होईल ? तुर्कस्तानची प्रतिकारशक्ति संपली म्हणजे कम्यूनिस्टांकडून तुर्कस्थान शोषलें जाईल.

लक्षावधि टन धान्य कम्युनिझम स्वीकारलेल्या देशांना पाठविण्यांत येतें, आणि मित्रराष्ट्रांना काहींच मिळत नाहीं. कम्युनिस्टांमार्फत तें वाटण्यांत येतें. निदान ते वाटण्याचें काम आम्ही करू नये का ? परराष्ट्रांना यंत्रसामुग्री पाठवावयाची त्यासाठीं भरपूर तारण आणि युद्धतयारीसाठीं तें वापरलें न जाण्याची हमी तरी का घेऊ नये ?

आपणाला जर खरोखर बचावाचें धोरण अवलंबायचें असेल तर जुनें धोरण सोडून काहीं नवी तत्त्वें आपण स्वीकारली पाहिजेत.

१. पहिलें ध्येय हें कीं शांतता हेंच आमचें उद्दिष्ट ही भूमिका आम्हीं सोडली पाहिजे.

२. जगाचें राजकीय नेतृत्व स्वीकारण्याची आकांक्षा आपण धरली पाहिजे.

३. जागतिक राजकीय संबंधात परराष्ट्रांबाबत तटस्थ न राहता त्वरित, जोरदार व भरपूर हस्तक्षेप करणें हे आपले मुख्य धोरण असावे. हे चांगले ध्यानात आलें म्हणजे परिणामकारक हस्तक्षेप करता येईल.

४. जगभर मतप्रचार केला पाहिजे. प्रचाराविरुद्ध असलेल्या आजच्या तटबंदी पाडून जनतेपर्यंत प्रचार पोचविला पाहिजे. अमेरिकेला प्रचाराबाबत एक अनुकूलता आहे. आम्ही खरें बोललों म्हणजे पुरे. खोटें बोलण्याची आम्हाला जरूरी नाहीं. कम्युनिस्ट राष्ट्रांना 'शांतताप्रिय लोकशाही राष्ट्रें' असें आपण म्हणू नये. कम्युनिस्ट राष्ट्रांना 'स्वतंत्र राष्ट्रें' न म्हणता 'रशियाचीं गुलाम राष्ट्रें' म्हणावे. आपला प्रचार अगदीं रशियन मुलुखात गेला पाहिजे.

५. शत्रु आणि मित्र हा फरक ध्यानांत ठेवला पाहिजे. मित्रांना अन्न, वस्त्र, पैसा, शस्त्रास्त्रें इतर राजकीय व आर्थिक साहाय्य दिलें पाहिजे. शत्रूंना कांहींहि

देऊं नये. अमेरिकेची मैत्री केल्यास फायदा होतो व शत्रुत्व केल्यास नुकसान होते अशी जगाची खात्री झाली पाहिजे..

६. कम्युनिस्ट संस्था व व्यक्ति याना उघडपणें शत्रू म्हणून लेखावे. कम्युनिस्टाना थारा देणाऱ्या राष्ट्राना तसेंच लेखावे.

७. सोव्हिअट रशियाशीं सहकार्य बंद करावें आणि सोव्हिअट व्हेटोची मुर्वत ठेवू नये. अमेरिकेचे सर्व धोरण अडवून पाडून सोव्हिअट रशियाने मात्र अनिर्बंध वागायचें असा सोव्हिअट व्होटोचा अर्थ आहे. पण अमेरिकेनें यापुढें आपण काय करायचें तें ठरविले पाहिजे आणि सोव्हिअट व्हेटोची उपेक्षा केली पाहिजे.

८. शेवटचा व महत्त्वाचा मुद्दा असा की अमेरिकेने शक्ति वापरण्याची नेहमीं तयारी ठेवली पाहिजे. ती अनेक ठिकाणी वापरावी लागणार नाहीं हे खरें पण तयारी हवी खास.

ही सर्व फक्त बचावाची भूमिका झाली. पण नुसती बचावाची भूमिका घेऊन भागणार नाहीं. कम्युनिस्टांना जर यश यायला नको असेल तर जगावर जे आर्थिक संकट गुदरलें आहे ते निवारण्याला योग्य अशी योजना आपणहि जगाला दाखविली पाहिजे. आपण जगाला काहीच मार्ग सुचविला नाहीं तरी जग कम्युनिस्ट साम्राज्याचा त्याग करील असें समजू नये. ही योजना म्हणजे कम्युनिझमहून भिन्न अशा पद्धतीनें रचलेले जगाचे फेडरेशन. जगाचा निदान एवढा मोठा भाग त्यात यावा कीं साऱ्या जगाचे राजकीय प्रश्न त्या फेडरेशनच्या हातीं येतील.

अमेरिकन राष्ट्राने अटॉमिक अस्त्र आपल्याच हातीं ठेवून जगाचें पुढारीपण मिळविण्याची तयारी ठेवावी तरच हें फेडरेशन शक्य होईल. अमेरिकन साम्राज्य याचा अर्थ अमेरिकेनें इतर राष्ट्रांवर प्रभुत्व गाजवून त्याचा उत्कर्ष करणें हा आहे. अमेरिकेंत व जगात 'साम्राज्य' हा शब्द अप्रिय झाला आहे म्हणून तो वापरला जाणार नाहीं कदाचित. पण त्याचा अर्थ स्पष्ट आहे. जास्तींत जास्त मोठ्या प्रदेशावर अमेरिकेचें प्रभुत्व स्थापलें गेलें पाहिजे. आज अमेरिकेचें साम्राज्य अफाट झालें आहे. दोन्ही अमेरिका खंडें, अटलांटिक व पॅसिफिकमधील बेटें, अमेरिकेचें सैन्य जेथें आहे असें आफ्रिका व युरोप यांतील प्रदेश या सर्व ठिकाणीं अमेरिकेचें साम्राज्य आहे. पण अमेरिकेला

निदान महत्त्वाच्या राजकीय प्रश्नाबाबत आपला अधिकार चालविता आला पाहिजे तरच हें साम्राज्य खरे-खुरे ठरेल.

अमेरिकेला हें साम्राज्यवादी धोरण नवे नव्हे, सत्तासत्तांच्या चढाओढींत तें अमेरिकेला शिकावें लागलेंच आहे. पण आपण असे साम्राज्यवादी आहो अशी जाणीव अमेरिकनांना नसून आपण काहीं आध्यात्मिक कार्य जगात करीत आहों अशी जाणीव अमेरिकनाची असते. ही भावना ही अमेरिकेचा अलंकार असली तरी तिचा जगावर वाईट परिणाम झाला आहे. त्यापेक्षां आपण साम्राज्य चालवीत आहो अशी अमेरिकनांना प्रामाणिक जाणीव असती तर त्या जाणीवेच्या जबाबदारीनें त्यांचें वर्तन योग्य असें झालें असते.

'टोटॅलिटेरियन' सत्तेनें होणाऱ्या अधःपातापेक्षा अमेरिकन साम्राज्य हें अधिक चागले असते असा अमेरिकेने प्रचार करून काहीहि उपयोग नाहीं. अनेक दडपणें व सवलती याच्या आधारानें आपण बोललें पाहिजे. दोन्हींचीही गरज आहे. अनेक राष्ट्रे सवलतींनीं मिळवावी. कारण साऱ्या जगावर दडपण आणण्याइतकीं पुरेशीं शक्तिस्थाने आपणाजवळ नाहींत. तरीपण राष्ट्रीय स्वातंत्र्य-वादी गट सवलतींना न भुलता प्रतिकार करतात. त्याना दडपणेंच भाग आहे.

लग्नात आणि राजकारणांत सर्व अटी दिलदारपणे सोडून द्याव्या. पण मूळ मुद्याची मात्र पकड सोडू नये. बलाढ्य राष्ट्र व दुर्बल राष्ट्र यांच्या संबंधांत बलाढ्य राष्ट्राने दुर्बल राष्ट्राच्या बारीक सारीक व्यवहारात बरचेवर हस्तक्षेप करणें हें त्या दुर्बल राष्ट्रास तापदायक वाटते. त्यापेक्षां अगदीं महत्त्वाच्या बाबतींत कमींत कमी वेळा जोरदार हस्तक्षेप करणें चागलें. तसेंच सगळ्यांनीं अमेरिकन पद्धतीनेच राज्यघटना व समाजघटना बनवावी हा आग्रहहि योग्य नव्हे. निरनिराळ्या घटना लोक बनवितील, पण त्यामुळें ते रानटी अथवा जगाला धोका देणार होत असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं. सवलती देतांनाहि 'आमचें न ऐकाल तर तुमचे आर्थिक व राजकीय जीवन अशक्य करूं' अशी धमकी बसण्याइतकी शक्ति दाखविलीच पाहिजे. शक्तीचा हा अंतिम गरजेचा साठा ॲटॉमिक अस्त्रें हाच आहे. तीं अस्त्रें आपल्याच हातीं असलीं पाहिजेत. सवलती आणि सक्ती या दोहोंसाठीं अवश्य तें सामर्थ्य आज अमेरिके-जवळ आहे. पण तें न वापरल्यास तें फार काळ राहील असें नाहीं. म्हणून

आधुनिक सरकृति वाचविण्याची जबाबदारी अमेरिकेवरच पडते व ती तिनें आजच बजावली पाहिजे.

जगाचें हे लोकशाही फेडरेशन ( म्हणजेच अमेरिकन साम्राज्य ) स्थापण्यासाठी काही राजकीय धोरणें आजच अवलंबिली पाहिजेत. दोन्ही अमेरिकाखंडातलीं सर्व साधनें अमेरिका व तिचे मित्र याच्यासाठींच वापरलीं जावीं, युद्धकाळीं त्या साधनावर फक्त अमेरिकन सरकारचेंच नियंत्रण असावे आणि अमेरिका खंडाशेजारीं कम्युनिस्टाना लढाऊ तळ मिळू नयेत. अमेरिकेनें ब्रिटन व ब्रिटिश साम्राज्य याना आपल्याशीं समान नागरिकत्व साधण्यास सांगावे. साम्राज्यप्रसूति आपोआप होणार नाहीं. तीसाठीं चिमटे ( फॉर्सेप्स ) वापरावे लागतील. पण आता हा प्रश्न लांबणीवर टाकता येत नाही. ही सर्व राष्ट्रें एकजुटीनेंच जगतील अथवा मरतील. त्यांना वेगवेगळें नशीब लाभणार नाहीं.

ब्रिटनला अशा इंपीरीअल फेडरेशनमध्यें दुय्यम स्थान पत्करावें लागेल आणि तीनशे वर्षे जगावर सत्ता गाजविलेल्या राष्ट्राला अशी दुय्यम भूमिका सहजासहजीं घेववणार नाहीं. तरी पण सध्याच्या परिस्थितींत ते अपरिहार्यच आहे. युरोपात पूर्वेकडून कम्युनिझमने चढाई केल्यामुळें युरोप अटलांटिककडे रेटलें जात आहे. कम्युनिझम्‌पासून अजून मुक्त असलेलीं राष्ट्रें आपसांत झगडत आहेत. एकमेकांचीं मांस व रक्त नसलेली हाडकें चावीत आहेत, हा आत्मनाशाचा मार्ग आहे; यातून मी सुचवितो हा एकच मुक्तीचा मार्ग आहे. तावडतोब अँग्लोअमेरिकन संरक्षणाखालीं युरोपिअन फेडरेशन बनवावें, त्यांत तूर्त कम्युनिस्ट नसलेली राष्ट्रें घ्यावीं. अशा फेडरेशनची आकर्षकता वाढेल तसतशीं कम्युनिस्ट तटबंदीमागे सांपडलेली राष्ट्रेंहि या फेडरेशनमध्ये येतील.

हल्लींच्या परिस्थितींत युरोप १० वर्षेहि सुरक्षित राहणार नाहीं. त्या सुरक्षिततेला युरोपीय फेडरेशन हाच उपाय असून अँग्लो-अमेरिकनांनीं सवलती व सक्ती याचें जोडतंत्र चालवून पश्चिम युरोपांतला कम्युनिझम् नष्ट करीत करीत युरोपचें ऐक्य घडवून आणलें पाहिजे.

त्यासाठीं प्रथम अमेरिकेनें आपल्यातला कम्युनिझम् वेणून काढला पाहिजे. लगेच लोकशाहीवाले म्हणतील कीं कम्युनिझमला ठोकून काढणें हें व्यक्तिस्वातंत्र्य, विचारप्रसारस्वातंत्र्य, लोकशाही इत्यादीला अपायकारक आहे.

पण व्यक्तिस्वातंत्र्य विचार-प्रचारस्वातंत्र्य यांना मर्यादा असतेच. खून, बलात्कार, जाळपोळ, यासाठीं मतप्रसार व संघटना करू देण्यात येते का ? कम्युनिझम्चें उद्दिष्ट लोकशाहीचा नाश हे आहे. लोकशाहीनें स्वतांच्या नाशाच्या प्रचारास परवानगी द्यावी काय ? कोणता समाज आपल्यात निढा-वलेली खुनी माणसें ठेऊन घेऊन शाबूत राहील ?

ज्याच्या हातीं सत्ता असते ते तिचा दुरुपयोग करतील असा संभव असतो हें खरे आहे. ' एकदा कम्युनिझम्ला सरकारने दडपलें म्हणजे इतर सर्व विरोधी चळवळी सरकार दडपील, म्हणून कम्युनिझम्लाच दडपू देऊ नका ' असा कम्युनिस्टाचा प्रचार असतोच. कोणतेहि सत्ताधारी सरकार ही मर्यादा पाळणार नाहीं हें मीहि मान्य करतों व येथे धोका आहे हे खास. पण आता लोकशाहीरक्षणासाठीं कोणता धोका कमी म्हणून पत्करणार ? कम्युनिस्टांच्या हातून लोकशाही नष्ट करण्याचा कीं कम्युनिस्टाना मारता मारता आपल्या हातून सत्तेचा दुरुपयोग होण्याचा ? कम्युनिस्ट चळवळीचा धोका आजच इतका वाढला आहे कीं लोकशाहीला आजहि जिवंत ठेवण्यासाठीं कम्युनि-झम्ला ठेचून काढले पाहिजे.

पण अमेरिका अखेर स्वतःच जुल्मशहा ( टायरंट ) झाली तर ? हें अशक्य नाही. निग्रोचा छळ व टोळ्या टोळ्यानीं गुंडगिरी करणारी प्रवृत्ति, आमच्या प्रवाशाचा आणि सैनिकाचा परदेशात दिसून येणारा उद्धटपणा व गुंडपणा, परके लोक व परकी संस्कृति यांसंबंधाने अमेरिकनाची बेफिकीरीची कल्पना इतिहास व परंपरा यासंबंधानें अमेरिकनाचें अज्ञान व त्याचा तिरस्कार, क्षुल्लक भौतिक यशानें त्याना वाटणारे समाधान, या सर्वावरून अमेरिकन्स हे जुल्म-शहा होतील अशी भीति वाटते खास. येथला रेडिओ ऐकला म्हणजे लोकशाही आम्ही जगवूं तर जगभर तिला अमेरिकन साच्यातच बसवू याबद्दल शंका राहात नाहीं.

पण सगळींच साम्राज्यें जुलुमी नसतात. पाचव्या शतकांतलें अथीनियन साम्राज्य जुलुमी नव्हतें. त्यांनीं घरात लोकशाही संभाळली आणि घटक राज्याच्या परराष्ट्रसंबंधाखेरीज कशांतहि हस्तक्षेप केला नाहीं. अमेरिकेचें जाग-तिक साम्राज्यहि फक्त परस्परसंरक्षक साम्राज्यच असेल. अगदीं पहिल्यानें या साम्राज्याचें स्वरूप असें मर्यादितच राहील. त्यामुळें जगांतील माणसांच्या

स्वातंत्र्यावर फारशी गदा येणार नाही. पुढें कदाचित ते अधिक जुलमी होत जाणे शक्य आहे. पण नक्की नाही. कदाचित ते अधिकाधिक उदारहि होत जाणार नाही कशावरून ? हा दुसरा संभवच अधिक मोठा आहे.

अमेरिकेची ऐतिहासिक परंपराच आम्हाला जुल्मशहा होऊं देणार नाहीं. आमची पाशवी क्रूरता, प्रांतीय दुरभिमान, सांस्कृतिक निगरगट्टपणा हे जे आमच्या ठिकाणीं दिसून येणारे दोष हे सुदैवानें 'टोटॅलिटेरियन' मनोभूमिकेला प्रतिकूलच आहेत. ते उलट बेबदशाहीकडे झुकणारे आहेत. कोणत्याहि ध्येयाच्या कल्पना आम्हास पटत नाहीत यामुळेच 'टोटॅलिटेरियन' ध्येयहि आम्हाला पटणार नाहीं. आमचे अपुरे सामर्थ्य हाहि एक जगात स्वातंत्र्य रहाण्याचा उपाय आहे. कारण जरी आम्ही प्रचंड सामर्थ्यशाली आहों असे जगास वाटत असलें तरी जगावर 'टोटॅलिटेरिअन' सत्ता गाजवता येईल एवढें आमचे बळ आज खास नाहीं. म्हणून समेट, सवलती व सक्ती हे सर्व उपाय वापरून आम्हाला साम्राज्य जगभर स्थापावे लागेल आणि लोकांचे हक्क व स्वाभिमान यांना न दुखविता वागावें लागेल.

इतक्याहि उपर आम्ही जुलमी राक्षस झालो व जगावर ॲटॉमिक हुकूमशाही गाजवू लागलो तर मानव जातीवर निसर्ग सूड घेईल व अमेरिकाहि त्यात नष्ट होईल. पण जगावर राज्य कारण्याची अमेरिकेला इच्छाच नाहीं. यामुळेंहि अमेरिका जुलमी होणें अशक्यच आहे. शिवाय जगात आज 'टोटॅलिटेरिअन' तत्त्वाला चोहोकडून जोराचा विरोध होत आहे. आम्ही 'टोटॅलि-टेरिअन' झालों तर लोक आम्हाला प्रतिकार करतील खास.

काही झाले तरी तिसरें महायुद्ध थांबविण्यास मी सांगतो हाच इलाज आहे. त्यांत सामर्थ्य हें मुख्य असल्यानें कम्युनिस्टांना बचावाच्या भूमिकेत राहावें लागेल. त्यामुळें कम्युनिस्टहि युद्ध टाळून, युद्ध टाळण्यासाठींच सवलती देऊं लागतील. आजचें रशियन सरकार उलथून पाडूनर रशियन लोकांना लोकशाही सरकार दिलें पाहिजे तरच आजचें युद्धाचें संकट टळेल. लोकशाहीचें धोरण कडेपर्यंत नेलें पाहिजे. अमेरिकाहि 'टोटॅलिटेरिअन' होऊन रशियाशीं चढाओढ करू पाहील तर यश येणार नाही जग म्हणेल, "रशियाचा 'टोटॅलिटेरिअन' अंमल आहे तोच ठीक आहे, कारण तो काय आहे हें कळले आहे. आतां नवा अमेरिकन कशाला हवा ?' म्हणून जगाचें पुढारीपण अमेरिकन राष्ट्रानें

ध्यायचें ते टोटॅलिटेरियनविरोधी हवें. मानवजातीला भीति दाखवून नव्हे तर आशा दाखवून आपण जगावर साम्राज्य स्थापले पाहिजे."

## बर्नाम 'वाल्मीकी' ठरला !

बर्नामच्या या ग्रंथाचा अमेरिकेत ताबडतोब प्रचंड खप झाला. सर्व अमेरिकेत व बाहेरच्या जगातहि त्याचा बोलबाला झाला. त्यानें मांडलेलें सर्व धोरण अमेरिकन जनतेने व पत्रकारांनीं गेल्या तीन वर्षांत उचलून धरलें असून अमेरिकन सरकारने त्याची बजावणीहि केलेली दिसते. वाल्मीकीने रामायण लिहिलें व रामानें तसें चरित्र जगून दाखविलें असें सांगतात, तसा बर्नामच्या ग्रंथाचा प्रभाव झाल्याचें दिसून येते.

अर्थात् बर्नामचें पुस्तक वाचून ट्रुमन राज्यकारभार करतो असे घडत नसेलच. पण बर्नाम केवळ स्वतःच्या लहरीनें विद्वत्तेच्या गुगींत बनविलेली मते मांडीत नसून अमेरिकेत जोरदारपणे वाहात असलेल्या एका विचारप्रवाहाचा तो प्रतिनिधि आहे. 'टाइम' वगैरे कित्येक लाखानीं खपणारीं पत्रे हे विचार माडीत आहेत. बर्नामनें गेली कित्येक वर्षे सोव्हिअटविरोधी प्रचार केला असून त्याच्या विचाराचा अनुयायी वर्ग मोठा आहे. हळूहळू अमेरिकन सरकारच्या अधिकारी मडळातहि त्या विचाराची माणसे येत असून अमेरिकेच्या लोकमताचें नवें वळण लक्षात घेऊनहि सरकार वागत असलें पाहिजे.

बर्नामनें सुचविलेले बहुतेक उपाय अमेरिकेनें १९४७ पासून अमलांत आणले असून बर्नामने पूर्वीच्या धोरणावर केलेली टीका मान्य असल्याची कबूली कृतीने दिली आहे. अमेरिकेला शांततेपेक्षा आंतरराष्ट्रीय आर्थिक स्वातंत्र्य अधिक अवश्य वाटतें व त्यासाठीं अमेरिका आपली शक्ति वापरणार असें ट्रूमन योजनेनें म्हटलें आहे. ग्रीसमध्ये तिसरें महायुद्ध सुरू झाले व रशियाला आता अमेरिकेने ठोकलें पाहिजे असें बर्नाम सागतो. त्याप्रमाणें अमेरिकेनें ब्रिटनला बाजूस सारून ग्रीसमध्यें रशियाविरोधी आघाडी सुरू केलीहि. युगोस्लाव्हियाला अन्रातर्फे मदत पाठविण्याचें बंद करून इटालीला अमेरिकेनें मदत पाठविली, इतकेंच नव्हे तर इटाली व फ्रान्स येथील मंत्रिमंडळातून अमेरिकेनें कम्युनिस्टाची हकालपट्टी करून टाकली. पश्चिम युरोपला मार्शल योजनेची मदत दिली, पूर्व युरोपला दिली नाहीं, इतकेंच नव्हे तर पश्चिम युरोप व पूर्व युरोप यांमध्ये आर्थिक तटबंदी उभी केली.

कम्युनिस्ट व सोव्हिअट रशिया याना दरोडेखोर, गुंड वगैरे विशेषणें अमेरिका लावू लागली आहे. चिनी व इतर कम्युनिस्ट राज्ये हीं रशियाचे गुलाम आहेत असा उघड प्रचार अमेरिकेनें चालू केला असून चँगकैशेक व इतर कम्युनिस्टविरोधक यांना अमेरिका आतां मदत करीत आहे. तुर्कस्थानला सर्व मदत अमेरिका देत असून यूनोंतील रशियाचा विरोध अमेरिकेने धुडकावून लावला आहे. युनोंतील बहुमत आता अमेरिकेच्या खिशात असून आज अमेरिका कोरियात उत्तर कोरियन कम्युनिस्टांशी लढत आहे तर उद्या फोर्मोसा, इंडोचीन वगैरे ठिकाणीं कम्युनिस्टांशीं आणखी लढेल व सारी यूनो अमेरिकेच्या 'हो' स 'हो' देणार असल्याने बर्नामने सांगितलेले धोरण अमेरिकन सरकारनें अमलात आणण्यास धडाक्यानें सुरवात केली असे म्हणण्यास हरकत नाहीं.

पण बर्नामचा साम्राज्यस्थापनेचा कार्यक्रम दिरंगाईनें नव्हे तर तातडीनें अमलात आणला गेला पाहिजे तरच तिसरें महायुद्ध अथवा कम्युनिस्टांनीं जग जिंकणें या गोष्टी अशक्य ठरूं शकतील असे तो म्हणतो. तें सगळें कसें, केव्हा होणार? त्या मार्गात अडचणी किती आहेत? बर्नामचे सिद्धांत व विचारसरणी यात सत्य कितपत आहे?

## बर्नामच्या विचारांतील चुका

महायुद्धातील अमेरिकन धोरणावर त्यानें जे आक्षेप घेतले आहेत त्याची उत्तरें लष्करी तज्ज्ञ देऊ शकतीलच. पण युद्ध चालू असता व नंतर ही चर्चा झाली त्यामुळें सामान्य माणसानाहि कांहीं मुद्दे कळतात. बाल्कन्समध्ये दुसरी आघाडी का सुरू केली नाही? चर्चिलचा तो आग्रह होता. प्रथम ईसेनॉवरला ते पटलें होतें. पण पुढें त्यानेंच नकार दिला. याचें कारण रशियाचा विरोध. रशियाला अँग्लोअमेरिकन्स बाल्कन्समध्ये यायला नको होते. ते आले असते तर रशियाने त्याना प्रतिकार तरी केला असता अथवा त्यानाच जर्मनीच्या तोंडीं देऊन आपण बचावाचें धोरण स्वीकारलें असतें. आणि मग जर्मनीनें पूर्व आघाडी थोडी ढिली सोडूनहि इंग्लंडवरच हल्ला केला असता तर? तसेंच, इंग्लंड व अमेरिका यांनीं सबंध जर्मनी व्यापायला हवा होता असें बर्नाम म्हणतो. पण त्याची तेवढी ताकद असती तर त्यांनीं तो व्यापल्यावाचून सोडला असता हें कोणासही पटविणें कठिण आहे.

रशियाला जपानी युद्धात गुतवून घ्यावे कारण अँग्लो-अमेरिकन्स युद्धात गुतले असता रशियाला खुला ठेवला तर तो चीनवर चढाई करील, इतर ठिकाणीं आक्रमण करून बसेल अथवा जपानशी स्वतत्रपणे युद्ध पुकारून जपानच ताबा घेईल, अशी भीति होती म्हणून रूझवेल्टने रशियाला गुतवून घेतले. बल्गेरियांत आपण घुसावे अशी अँग्लोअमेरिकनाची इच्छा होती. त्यामुळे अँग्लोअमेरिकन्स काळ्या समुद्रांत जाऊन रशियाच्या मर्मस्थानीं बसू शकले असते. पण रशियाने बल्गेरियात घुसण्याची त्वरा केली व अँग्लोअमेरिकनाना संधिच दिली नाही. तसेच रशियाने जपानबाबत केले असते या भीतीनेच रूझवेल्टने रशियाला युद्धाच्या करारात बाधून घेतले. पुढें अँटमबॉब टाकण्याची सिद्धता होताच रशिया जपानी युद्धात येऊं नये यासाठीच अमेरिकेने घाई। घाईने अँटम बॉब टाकला व अखेर रशिया युद्धात आलाच तरी रशियाल-अमेरिकेने जपानात पाऊल टाकू दिलेच नाही.

रशियाला युद्धापासून अलग ठेवणेच अवश्य होते हे बर्नार्डचें लिहिणें पढतमूर्खपणाचे आहे. रशिया आरंभी अलगच राहिला होता. तसाच तो अलग राहिला असता तर युद्धानतर त्याची शक्ति अफाट वाढली असती आणि युद्धानतर तहाचे टेबल त्यानेच आपल्या घरी नेले असते. हिटलरला हे नको होतं, म्हणून त्यानेच रशियाला रणागणात ओढून अमेरिकेवर उपकार केले. बर्नार्ड हा अचाट कल्पना चालवून लालित्यपूर्ण व चमत्कृतिपूर्ण लिहितो. पण त्याच्या लिहिण्यात जितकी साहित्यकी आकर्षकता आहे तितकी शास्त्रीयत नाहीं. म्हणून रोमाचित अथवा रोमटिक मनावर त्याच्या लेखनाचा जेवढ पगडा बसतो तेवढा निर्विकारपणे ( म्हणजे अरसिकपणें ) पण शास्त्रीय दृष्टीनें विचार करणाऱ्याच्या मनावर बसत नाही. त्याने लग्नाची उपमा वापरली आहे तीच पुन्हा वापरून बोलायचे तर लग्नाला हपापलेला नवरदेव जो अविचार करतो त्यासाठीं जन्मभर त्याला पश्चात्तापात भाजून घ्यावें लागते. बर्नार्ड-सारख्या ललित लेखकाच्या असत्य सृष्टीत असा रोमँटिक अविचार शोभून दिसेल. रूझवेल्टसारख्या व्यवहारजड मुत्सद्यास तो शोभला नसता. युद्धातल्या रणनीतीचे धागे दोरे जसे बर्नार्डला काहींहि कळले नाहीत तसे आतरराष्ट्रीय राजकारणांतले धोगेदोरेहि त्याला कळत नाहीत, असें थोडासा धीटपणाचा दोष पत्करूनहि, मला बोलावेसें वाटते.

बर्नाम साम्राज्यलोभानें बोलत नाहीं हें निःसशय खरें आहे. पण सोव्हिअट रशियाबद्दल त्याच्या मनांत जी धडकी भरली आहे तिनें त्याची दृष्टि अंध झाली आहे. त्याचे विचार उपेक्षणीय खास नाहींत. रशियाच्या दाडगाईनें घाबरलेले लोक सर्व जगभर पसरले आहेत. त्यांना बर्नामने मोहिनी घातली असून महाराष्ट्रातहि बर्नामचे अनेक भगत निर्माण झालेले आहेत. म्हणून अशा अनेकांवर मोहिनी घालणाऱ्या या धुरंधर लेखकाच्या विचारांची थोडी अधिक चर्चा केली पाहिजे.

बर्नामच्या एकंदर लिखाणांत त्याला ॲंग्लोअमेरिकन संस्कृति आणि सोव्हिअट संस्कृति एवढींच माहीत आहेत असें दिसतें. सोव्हिअट संस्कृति जुलमी आहे व ती ऐवजीं ॲंग्लोअमेरिकनांची उदात्त व पराक्रमी संस्कृति जगावर आली पाहिजे असा त्याचा साधा सिद्धांत आहे. बाकीचें जग निष्पाप पण दुर्बल आहे व त्याचें रशियन लांडग्यापासून रक्षण केलें पाहिजे अशी बर्नामची भावना आहे. पण जग इतकें साधें नाहीं. जगात ज्याना मागासलेली व दुबळीं राष्ट्रें म्हणतात त्यांच्याकडे नुसतें प्रेमाने व सहानुभूतीनें पाहिलें व त्याचें रक्षण केलें म्हणजे झाले हें खरें नव्हे. पारध्यास घाबरलेला नाजूक ससा अंग थरथरत बसतो, गोजिरवाणा दिसतो व पारध्यालाहि त्याची दया येते अशीं हीं मागसलेलीं व दुबळीं राष्ट्रें नसतात.

हीं मागसलेलीं व दुबळीं राष्ट्रें आजच्या पुढारलेल्या व बलवान राष्ट्राच्या पेक्षा फार मोठी—विस्तीर्ण, अफाट लोकसंख्येचीं आहेत. तीं राष्ट्रें या नात्यानें दुबळीं आहेत, त्याचबरोबर त्यांतील लक्षावधि लोकसंख्या नादान व जुलमी अशा मूठभर लोकांच्या जुलमाखालीं व पिळणुकीखालीं गांजलेली असते. आणि त्या जनतेची संस्कृतिहि अगदीं हीन असते. जनतेची उत्पादनशक्ति वाढविण्याचा प्रयत्न वरिष्ठ रक्तशोषकानीं मुळींच केलेला नसतो. या वरिष्ठांच्या स्वताच्या मागसलेपणामुळें व पिळणुकीमुळें राष्ट्र मागसलेलें, दुबळें व जुलमग्रस्त राहिलेलें असतें. रशिया हा असाच देश होता तो तेथल्या कम्युनिस्टांनीं या मागसलेपणांतून व पिळणुकीतून सोडविला. चीन हा देश असाच काल परवांपर्यंत होता. तेथील कम्युनिस्ट या परिस्थितींतून चीनला वर काढतील अशी आशा आहे. भारतहि मागासलेलेंच असून कॉंग्रेसचीं सरकारें त्याच्या उद्धाराचा प्रयत्न कसाबसा करीत आहेत.

ॲंग्लो-अमेरिकनानीं यापूर्वी असे मागसलेल्याच्या उद्धाराचे प्रयत्न केले, पण आता ते अशा उद्धारास प्रतिकारच करीत आहेत. या मागसलेल्या व पिळणुकीच्या परिस्थितीतून बाहेर पडण्याचा प्रयत्न कोणी थोडा केला कीं त्याला उत्तेजन देण्याऐवजीं तो प्रयत्न ठेचून टाकण्याकडे ॲंग्लोअमेरिकनांची हल्लींची प्रवृत्ति असल्याचे दिसून येते. जी. डी. एच्. कोल म्हणतो,

" ब्रिटनचे ज्या मागसलेल्या मुलुखाशीं राजकीय व आर्थिक संबंध आहेत तेथे मजूर सरकारनें आर्थिक प्रगति करण्याचा प्रयत्न करावा. असें करताना तेथल्या जनतेचें हित होईल अशी दृष्टि ठेवावी, आणि जरूर तेथें प्रतिगामी व अनियंत्रित सत्ताधारी वर्गाविरुद्ध त्यास मदत करण्याचेंहि टाळूं नये. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं असें धोरण मुळींच अवलंबिलं जात नाहीं. वास्तविक ब्रिटिश व अमेरिकन सरकाराचा आर्थिक बाबीविषयीं मूलभूत दृष्टिकोन अगदीं वेगळा आहे. तरी पण मागासलेल्या प्रदेशाबाबत त्यांचें धोरण एकच असते. निरनिराळ्या कारणानीं, पण एकाच प्रकारची भीति त्याना सोव्हिअट यूनिअनबाबत वाटते. अमेरिकनाना वाटतें कीं रशियाचें अर्थशास्त्र दुष्ट आहे, मागासलेल्या राष्ट्रावर भांडवशाहीची पकड बसण्याला सोव्हिअट अर्थशास्त्र हेच मोठें विघ्न आहे. त्यामुळें अमेरिकेचे आर्थिक नांगर मागासलेल्या राष्ट्रात घुसणें अशक्य होतें. ब्रिटिश सरकारला भीति वाटते ती सोव्हिअट रशियाच्या राजकारणाची. ब्रिटिश सरकारच्या मतें सोव्हिअट सरकार मागासलेल्या राष्ट्रात प्रक्षोभ माजवून ब्रिटनच्या साम्राज्यरस्त्यावर केव्हां संकट आणील, ब्रिटनच्या अंकित प्रदेशात केव्हा बंड माजवील व ब्रिटनच्या तुटपुंज्या साधनसंपत्तीवर फाजील ताण केव्हा आणील याचा काय नेम सांगावा ? अरब राष्ट्रात आणि मध्यपूर्व प्रदेशांत जुलमग्रस्त लोकाच्या बंडांतून काय उद्भवेल कोण जाणे या भीतीनें इंग्लंड व अमेरिका दुर्बल आणि जुलमी सत्ताधाऱ्यानाच पाठबळ देतात. "

ग्रीसमध्ये ब्रिटन व अमेरिका यानीं लोकशाहीविरोधी वर्गाच्या हातीं सत्ता देऊन त्यांच्या जुलमी राजवटीलाच संरक्षण दिलें, इटालींत फॅसिस्ट पोलिसांच्या हातीं सत्ता दिली, अरब राष्ट्रांत सरंजामी सत्ताधाऱ्यांनाच ॲंग्लोअमेरिकनांचा पाठिंबा आहे, इराणात तेंच आहे, हिंदुस्थानपाकिस्तानवादांत प्रतिगामी असें जें पाकिस्तान त्याचीच बाजू अमेरिका घेत आहे, चीनच्या जीवनाचा ज्या

चँग-कै-शेकच्या राजवटीने चुथडा केला त्याचीच बाजू अमेरिका घेत असून जो कम्युनिस्ट राजवट लोकहिताची व शिस्तीची आहे असे अनेकॲंग्लो-अमेरिकन मुत्सद्यांनी व लेखकांनी लिहिले आहे तिला दरडावून, धमकावून तिला रशियाच्या कवळेत अधिकाधिक प्रमाणात अमेरिकाच लोटीत आहे. ज्या कोरियात अमेरिकेने आज दक्षिण कोरियाच्या बाजूने शस्त्र हातीं घेतले आहे त्या दक्षिण कोरियाची परिस्थिति कशी आहे ? अमेरिकेच्या मदतीने जो सिंगमान ऱ्ही दक्षिण कोरियात अध्यक्ष होऊन बसला आहे त्याच्या राजवटीसंबधाने 'टाइम्स ऑफ् इंडिया' व 'मँचेस्टर गर्डियन'चा बातमीदार एका अलीकडील लेखात सांगतो,

" त्याच्या सरकारवर जपानी पद्धतीची हुकुमशाही छाया आहे इतकेंच नव्हे तर अनुभवी मुत्सद्दी त्याच्या सरकारात आहेत, पंतप्रधान व परराष्ट्रमंत्री हुकुमशाही प्रवृत्तीचे आहेत. देशातील बुद्धिमान लोकांचा सरकार उपयोग करीत नाही अशी तक्रार युनायटेड नेशन्स कमिशनने केली आहे. अधिकाऱ्यांत आपणास कोणी प्रतिस्पर्धी आहे असा ऱ्हीला संशय आला कीं त्याची तो हकालपट्टी करतो. अमेरिकन्स दक्षिण कोरियातून गेल्यापासून ऱ्हीने पोलिसराज्यच स्थापलें आहे. कोरियाची शेतमालकी सरंजामी पद्धतीची असून चाळीस वर्षे जपानच्या पिळणुकीनें देश गांजलेला आहे. अशा परिस्थितीत युद्ध संपल्यानंतर जे औद्योगिक, शेतीविषयक असे निकडीचे प्रश्न उद्भवले ते सोडविण्याचा प्रयत्न ऱ्हीने मुळींच केला नाहीं. शेतीविषयक सुधारणा अखेर या वर्षी यायच्या होत्या. पण युद्धच सुरू झाले आणि त्या सुधारणा बारगळल्या. सामाजिक व आर्थिक परिस्थितींत ऱ्हीने कोणतेहि पालट केले नाहींत. सरकार फक्त जमीनदाराच्या हक्काचें रक्षण करीत असे. शेतीच्या उत्पन्नापैकीं ८० टक्के भाग शेतकरी जमीनदाराला व सरकारला देतो. असे जुलुमी राज्य पोलिसच्या जबरदस्तीनेंच चाले हें सांगणे नकोच. "

बर्नाम अमेरिकेने जगावर साम्राज्य स्थापावे म्हणतो आणि तें साम्राज्य रशियाच्या साम्राज्यापेक्षां निश्चित चांगलें आहे अशी हमी घेतो. अमेरिकेनें साम्राज्य चालवावें पण जगातल्या कोणत्याहि राष्ट्राच्या अंतर्गत कारभारात हात घालूं नये, असें बर्नाम बजावतो. कम्युनिस्ट राज्यांत मात्र हस्तक्षेप नव्हे तर शस्त्रक्षेप करण्यासहि अमेरिकेस सांगतो. म्हणजे जगांतील मागासलेल्य

राष्ट्रास या अमेरिकन साम्राज्याने कोणता लाभ होणार ? ग्रीसमध्यें जुलुमी राजसत्ता राहणार, अरबांच्या प्रदेशांत सरजामी जुलूम कायम राहणार, जर्मनीमध्ये लोकशाहीऐवजीं जुलुमी राज्य होणार, इटालीत फॅसिस्ट पोलिसांचें राज्य येणार, दक्षिण कोरियात ऱ्हीचें जुलुमी राज्य स्थापन होणार, दक्षिण आफ्रिकेत काळ्या लोकांवर जुलूम चालू राहणार, जपानात पुन्हा सामुराई अधिकारावर राहणार, इतकेंच नव्हे तर आंतरराष्ट्रीय व्यापारावर सरकारी बंधनें नसावी असेंहि ट्रुमनयोजनेचें धोरण असून ब्रिटनचा सोशॅलिझम् अमेरिकेच्या डोळ्यात खुपतो आहे. अमेरिकेची नगी भांडवलशाही जगभर नांदली पाहिजे असें ट्रुमनयोजनेचे उद्दिष्ट आहे.

अमेरिकेचें हेंच साम्राज्य जगावर येणार काय आणि हे रशियापेक्षा चांगलें आहे असे बर्नाम जगाला मानायला सांगतो काय ? चीन आणि रशिया यानाहि कम्युनिस्टांच्या हातून काढून घ्या असें बर्नाम म्हणतो. मग ग्रीसमध्ये जुन्या राजाला आणलें त्याप्रमाणें चीन व रशिया येथें अनुक्रमें मांचूराजे व झार याना आणून बसविणार कीं काय ? अमेरिका स्वदेशात अनियंत्रित भांडवलशाहीची पुरस्कर्ती आहे. इंग्लंडांतला सोशॅलिझमहि अमेरिकेला हाणून पाडायचा आहे. आणि परदेशातला कोणताहि बदल हा कम्युनिस्ट बदल होय असें मानून परदेशात अत्यंत प्रतिगामी व पिळणुकीच्या राजवटी अमेरिका सरक्षित आहे. असें अमेरिकेचें साम्राज्य कोण पत्करणार ?

रशियाच्या धोरणाचें सर्वथैव समर्थन मला करायचें नाहीं. रशियाच्या धोरणाबद्दल जगात अनेकाना भीति बसली आहे ती सकारण आहे. रशियाने अंतर्गत विरोध दडपून टाकताना भयंकर दडपशाही केली. रशियाचे जगभर पसरलेले कम्युनिस्ट दूत केव्हाहि आपापल्या देशाचा विश्वासघात करू शकतात. पौर्वात्य देशात कम्युनिस्टानीं त्यांच्या काल्पनिक क्रांतीसाठीं खून, अत्याचार, दरोडे हे सर्व प्रकार केले. रशियाच्या परराष्ट्रसंबधात कोणतीहि संगति वा नीति नाही. फिन्लंड हे पुढारलेलें राष्ट्र म्हणून तो एकदा गौरवी. पुढें त्याने फिन्लंडवर सरळ सशस्त्र स्वारीच केली. ज्या हिटलरशीं कम्युनिस्टांनीं आरंभापासून वैर केलें, त्यानें युद्ध सुरू केल्यावर हें युद्ध हे राष्ट्रीय युद्ध आहे असा अभिप्राय मोलॉटोव्हनें दिला आणि रशियावर जर्मनीची स्वारी होताच पुन्हा जर्मन फॅसिस्ट हें सैतान ठरेल.

चेंबर्लेननें म्युनिच करार केला तोहि प्रतिगामी होता व हल्लीं अमेरिका ीसपासून कोरियापर्यंत जें धोरण अवलंबीत आहे तें धोरण प्रतिगामीच आहे. ग एकपरीनें रशियाइतकें ते वाईट असूं शकत नाहीं असें मानता येते. कारण ांच्या त्यांच्या देशात व जगात त्या धोरणावर प्रखर टीका होते, बहुमत विरुद्ध ल्याम तीं धोरणें त्या राष्ट्रांना बदलावीं लागतात. पण रशियाचें धोरण पोलादी ासतें. त्याची पकड कशानेंहि सुटत नाहीं. रशियांत व जगांत त्याचे पाठीराखे ाच्या गुलामाप्रमाणें वागून रशियाची प्रशंसा पोपटाप्रमाणें बडबडतात य ष्टीनें अमेरिकेचें एकंदर धोरण नैतिक दृष्ट्या अधिक श्रेष्ठच ठरेल.

पण मागासलेल्या राष्ट्रात अमेरिका हस्तक्षेप करते तेव्हां अमेरिकेचें धोरण ाकराचें प्रतिगामी असतें व रशियाचें तितके प्रतिगामी असत नाहीं.

ग्रीस व दक्षिण कोरिया येथें अमेरिकेनें प्रतिगामी वर्गांना पाठिंबा देऊन ानतेची पिळणूक व छळ चालू ठेवण्यास साहाय्य केलें. पण उलट रशियाने ्वेयुरोपांत शेतकरी-कामकऱ्यांचीं राज्यें स्थापलीं. इग्लंडांत व अमेरिकेत ाततेची लोकशाही आहे, निवडणुकी होतात आणि बहुमताला वेळोवेळ संत असणारे सरकार नेमता येतें हें ठीक आहे. पण ग्रीससारख्या ज्या देशाल ार्लमेंटरी लोकशाहीचा मुळींच अनुभव नाहीं तेथें इग्लंडच्या नेतृत्वाखाल ाजपक्षीयानीं हातीं दंडुका घेऊन निवडणुकांत प्रतिपक्षाना बडवलें, दडपलें व ाजपक्षाचा विजय घडवून आणला हें लोकशाहीचेंच यश काय !

इंग्लंडात, अमेरिकेंत भांडवशाही यशस्वी झाली व तिनें समाजाचा विकास केला. पण अजून विकास न झालेले व अत्यंत मागसलेले प्रदेश जगांत इंग्लंड अमेरिकेच्या कितीतरीपट मोठे आहेत. आणि भांडवलशाही त्यांचा विकास करूं शकत नाहीं. रशियांत भांडवलशाहीचा दीर्घकालीन प्रयोग झाला पण यानें समाजाला सरंजामशाहीच्या पिळणुकींतून मुक्त केलें नाहीं. इंग्लंड अमेरिकेंत ज्या पार्लमेंटरी पद्धतींनीं समाजविकासास साहाय्य केलें त्या पार्लमेंटरी पद्धतीच्या देखाव्यानें आतां मागसलेल्या समाजाची गुलामगिरी वाढते अस अनुभव जेथें येतो तेथें पार्लमेंटरी पद्धतीचा त्यागच करावा लागतो.

अमेरिकेचा सोव्हिअट रशियावर खरा आक्षेप आहे तो रशियांत सोव्हिअ पद्धति सोव्हिअट पुढाऱ्यांनीं अमलांत आणली हा नव्हे तर पूर्वयुरोपीअ राष्ट्रांत, चीनच्या अफाट मुलुखांतहि सोव्हिअट पद्धति अमलांत आलीं याच

अमेरिकेस संताप येत असून हें सोव्हिअट रशियाचें आक्रमणच होय असें अमेरिका म्हणते.

पण या प्रश्नाचा विचार करतांना दोन मुद्दे पृथकपणें विचारांत घेतले पाहिजेत. आक्रमणाचा मुद्दा पहिला व महत्त्वाचा खराच. पण रशियाच्या लगामीं पूर्व युरोपीयन राष्ट्रें व चीन इत्यादि राष्ट्रें खेचली गेलीं आहेत हें जितक्या मानानें खरें आहे तितक्या मानानें ग्रीस, इटाली, फ्रान्स, ब्रिटन, इझराइल वगैरे राष्ट्रें अमेरिकेच्या लगामीं खेचलीं गेलीं हें खरें नाहीं काय?

## दोन्ही गटांपासून अलग

शिवाय आज जगातील राष्ट्रांपुढे 'अमेरिकेचा गुलाम हो अथवा रशियाचा गुलाम हो' हा जो बिनतोड आदेश आलेला आहे तो जगांतील राष्ट्रांनीं कां पत्करावा? हीं दोन राष्ट्रें एकमेकांविरुद्ध युद्धास निघालीं आहेत. त्याच्यापैकीं कोणाच्या तरी युद्धदळांत सामील होऊन मढें होण्याच्या तयारीला लागलेंच पाहिजे असा बर्नामच्या एकूण आदेशाचा अर्थ आहे आणि हा आदेशच गैर आहे. दोघांपैकीं कोणाचें तरी गुलाम व्हावें आणि रणांगणाच्या रस्त्यानें यमसदनाकडे धाव घ्यावी असा जगावर बिनतोड प्रसंग आहे असें मानण्यास आपण तयार नाहीं हेंच पं. नेहरूंनीं भारतातर्फे जगाला बजावलें आहे.

केवळ शस्त्रबलांत भारतासारखीं राष्ट्रें दुबळीं असतील. पण रशिया व अमेरिका या दोघांकडेहि आज एवढीं प्रचंड शस्त्रास्त्रें आहेत कीं कदाचित त्यांत जगाचा संहारच होईल ही गोष्ट बर्नामही कबूल करतो. यामुळेंच हीं दोन राष्ट्रें एकमेकांना भीत आहेत व जगाला आपापल्याकडे खेचत आहेत पण जगांतील दुर्बलांनीं एक होऊन दोघांपासूनहि अलग राहणें हेंच इष्ट आहे व या 'दुर्बलां'च्या संघटनेंत कांहीं बळ उत्पन्न झालें आणि त्यांनीं तें या दोन एडक्यांच्या टकरीपासून अलग राहाण्यासाठींच खर्च केलें तर त्या दृष्टीनें जेवढें यश येईल तेवढेंहि युद्ध टाळण्याला उपयोगी पडेल. म्हणून पं. नेहरूंनीं 'भारत हा रशिया अथवा अमेरिका यांपैकीं कोणत्याहि गटांत सामील होणार नाहीं,' असें सांगितलें.

जी. डी. एच्. कोल यानें हीच कल्पना मांडली आहे. भांडवलशाही आणि कम्युनिझम् या दोन्ही समाजव्यवस्था एकमेकींच्या जिवाविरुद्ध उठल्या असून 'आपण दोघे एकत्र नांदूं शकत नाहीं म्हणून दोहोंपैकीं एकीचा संहार झालाच पाहिजे मग तसें करतांना कदाचित् दोहोंचाहि संहार झाला तरी चालेल' असें

बर्नाम अमेरिकेला सांगतो. रशियालाहि कोणीतरी रशियन 'बर्नाम' असेंच सांगतो आहे असें दिसतें, म्हणून ह्या दोन व्यवस्थांचे पुरस्कर्ते सारे जग आपापल्याकडे खेचीत आहेत. या वादात जगाची जर दोन विभागांत फाळणी झाली तर युद्ध आणि विध्वंस अटळ आहे. पण अशी विभागणी करता येऊच नये हें शक्य नाही काय ? कोल सांगतो,

"ही फाळणी व युद्ध अशक्य करण्यासाठीं इतर महत्त्वाच्या राष्ट्रांनीं रशिया व अमेरिका यांना सांगितलें पाहिजे कीं 'तुम्ही दोघेहि भले बलाढ्य असा खुशाल, पण आम्हांला आपल्या दावणींत तुम्ही खेचाल तर आम्ही प्रतिकार करूं.' अर्थात असें सांगतांना त्याचबरोबर आपलें स्वतंत्र जीवनहि आपण उभारण्यास सुरवात केली पाहिजे."

कोल पुढे सांगतो "असे करतांना बाकीच्या राष्ट्रांनीं सुटे सुटे व एकेकटें जीवन कंठणें गैर आहे, कारण त्यामुळे त्यांच्या त्यांच्यातच स्पर्धा आणि मारामाऱ्या होतील व अमेरिका आणि रशिया यांचे पक्षपाती गट यादवी माजवितील. या दोन बलाढ्य राष्ट्रांच्या तावडींत सापडायचें नसेल तर इतर महत्त्वाच्या राष्ट्रांनीं आपापले गट बांधून परस्पराच्या सहकार्यानें आपले आधुनिक प्रश्न सोडविले पाहिजेत."

असे गट, कोलच्यामते भौगोलिकदृष्ट्या अनेकहि असूं शकतील. उदाहरणार्थ हिंदुस्तान व दक्षिण आशिया हा एक गट असावा असें कोल सुचवितो. या दृष्टीनें इंडोनेशियाच्या स्वातंत्र्यासाठीं नेहरूनीं कां धडपड केली हे कळून येतें. भारत व पाकिस्तान यामधील आजचा वाद जर लवकर मिटला तर पाकिस्तान, भारत, ब्रह्मदेश, मलाया, इंडोचायना, सिलोन हा आर्थिक दृष्ट्या समृद्ध गट एकजूट होऊन आपले स्वतंत्र सहकारी जिणे एकजुटीच्या निर्धारानें जगूं शकेल. नेहरूंच्या राजकारणाकडे बारकाईने पाहिल्यास त्यांचा दृष्टिकोन हाच असल्याचें दिसून येतें. पण रशिया व अमेरिका यांच्या पकडींतून बाहेर राहण्याच्या या प्रयत्नात अथवा हा प्रयत्न यशस्वी होण्यासाठींच अंतर्गत समाजघटनेचा प्रश्न उपेक्षून चालणार नाही. त्या त्या राष्ट्रांतील अंतर्गत जनतेचें जीवन जितक्या प्रमाणांत कर्तृत्वशील, सुखी, समृद्ध होईल तितक्याच प्रमाणांत तीं तीं राष्ट्रें समर्थ ठरून आपापलें स्वातंत्र्य व परस्परसहकार्य टिकवू शकतील.

या दृष्टीने मागसलेल्या राष्ट्रांसाठीं रशियाचा समाजक्रांतीचा दृष्टिकोन इष्ट

ठरतो आणि मग अमेरिका व रशिया हीं दोन्ही आक्रमणशील राष्ट्रेंच होत असें मानले तरी अमेरिकेच्या आक्रमणाने ग्रीस, दक्षिणकोरिया वगैरे राष्ट्रांत मागसलेली समाजघटनाच टिकली व जनतेची पिळणूक चालू राहिली तर रशियाच्या पूर्व युरोपातील व उत्तर कोरियांतील आक्रमणानें त्या त्या देशांत समाजक्रांति होऊन पुरोगामी समाजरचना स्थापन झाल्या ही गोष्ट कबूल करावी लागते. बर्नाम ही गोष्ट कबूल करीत नाहीं, याचें कारण सोव्हिअट रशियाबद्दलच्या द्वेषानें त्याची दृष्टि अंध झाली आहे हेंच होय.

पूर्व युरोपियन राष्ट्रांत रशियन आक्रमणामुळें खरोखर फायदाच झाला. तेथें पार्लमेंटरी पद्धतीची परपरा कधींच नव्हती, सरंजामीवर्ग आपली सत्ता टिकविण्यासाठीं अत्याचारासहि तयार होते, पोलंडमध्यें पार्लमेंटरी निवडणुकांच्या वेळीं सरंजामी वर्गानीं अत्याचार केलेच. आणि या सरंजामी वर्गाच्या हातची सत्ता काढून घेऊन ती जनतेच्या हातीं देणें हाच तेथें मार्ग होता. रशियाच्या पाठिंब्यानें पूर्व युरोपांतल्या सामान्य जनतेनें ही गोष्ट घडवून आणली हें चांगलेंच झाले. ग्रीसमध्ये अमेरिकन आक्रमणानें प्रतिगामी समाजपद्धति जनतेच्या मानगुटीवर बसली तर पूर्वयुरोपांतील रशियन आक्रमणानें तेथें पुरोगामी स्वरूपाची क्रांति झाली हा फरक डोळस जगाला दिसत असून आक्रमण वाईटच, पण या दोन आक्रमणांत नैतिक दृष्ट्या अधिक चांगलें कोणते हें समंजस माणसास ठरविता येते. हें ठरविण्याचे स्वातंत्र्य तरी जगाला बर्नामनें व त्याच्या येथील अनुयायांनीं दिलें पाहिजे.

अखेर पूर्व युरोपांतील लहान लहान राष्ट्रांना आपापल्या वेगळ्या वेगळ्या देशांत केवळ सोव्हिअट पद्धत अवलंबून भागणार नाहीं तर त्यांनीं आपापलीं राज्यें एकमेकांस जोडून घेऊन त्याचा परस्परावलंबी संघ केलाच पाहिजे. युगोस्लाव्हिया व पूर्वयुरोपीय राष्ट्रें यांच्यांत आज भांडण आहे तें कांहींसें यामुळेंच आहे. हंगेरी, रुमानिया, बल्गेरिया, रशिया व युगोस्लाव्हिया हीं राष्ट्रें डान्यूब नदीनें एकत्र बांधलीं आहेत. रशियाच्याच पाठिंब्यामुळें दान्यूब खोऱ्यांतलें अँग्लो-फ्रेंच अमेरिकन भांडवलशाहीचें वर्चस्व नष्ट झालें. अर्थात आतां हीं राष्ट्रें आर्थिक दृष्ट्या एकजूट होणें हें त्याच्या समृद्धीच्या व सामर्थ्याच्या दृष्टीनेंहि इष्ट आहे.

पण यामुळें आपल्यावर रशियाचें साम्राज्य येईल अशी युगोस्लाव्हियाला

भीति वाटते. उलट रशियाखेरीज बाकीच्या पूर्वयुरोपीय राष्ट्रांची मोट बांधून त्यांचा 'स्टालिन' आपण व्हावें अशी युगोस्लाव्हियाचा टिटो हा महत्त्वाकांक्षा बाळगतो व त्यामुळें रशिया व पूर्व युरोपीय राष्ट्रे यांचेंच युद्ध माजेल अशी भीति रशियाला वाटते. जोंवर युद्धाचें वातावरण जगावर आहे तोंवर हें भांडण मिटणेंहि कठीण आहे.

पण युगोस्लाव्हियांत टिटोच्या कम्युनिस्ट पक्षानें स्वतांच्या बलावर आणि पूर्व युरोपिअन राष्ट्रांतील कम्युनिस्टांनीं रशियाच्या पाठिंब्यावर सरजामदाराची सत्ता मोडून काढली, जमिनी शेतकऱ्यांना दिल्या, मोठे कारखाने राष्ट्रीय मालकीचे केले व योजनाबद्ध अर्थव्यवस्था अमलांत आणून समाजजीवनाची प्रगति केली हें कोणासहि मान्य करावेंच लागेल. उत्तर कोरियांतहि रशियाच्या वर्चस्वानें ही सर्व प्रगति घडून आली असून उत्तर कोरियाचें रणसामर्थ्यहि केवढें प्रचंड वाढलें आहे हें लक्षांत घेतां सोव्हिअट पद्धति माणसाची आजच्या काळीं मुख्यतः मागसलेल्या देशांतील माणसांची प्रगति केवढी करते हें स्पष्टपणें दिसून आलें आहे.

केवळ रणशौर्य हिटलरशाहींतहि निर्माण झालें हें खरें. पण हिटलरनें भांडवलदार वर्गामार्फत जनतेची पिळणूक चालू ठेवली व जर्मनी हें साम्राज्याचें केन्द्र ठरवून इतर अंकित राष्ट्रांना गोठ्यांतल्या गुरांचें जीवन दिलें आणि हिटलरचा हेतुहि तोच होता हेंहि स्पष्ट आहे.

सोव्हिअट पद्धतिहि अशीच ठरली तर ? ती अशीच आहे असें बर्नाम म्हणतो. पण तें खरें असलें तरी सोव्हिअट रशियाच्या अमलांत न जातां त्याची समाजक्रांतीचीं तत्त्वें आत्मसात करणें व तीं शांतिमार्गानें अमलांत आणणें हा येथें उपाय आहे. अमेरिकेच्या गुलामगिरींत जाणें हा उपाय नव्हे. किंबहुना सोव्हिअट पद्धतीच्या अंगीं मागसल्या समाजांना समर्थ व समृद्ध करण्याचा गुण असल्यामुळेंच, ज्यांना आपलें स्वातंत्र्य टिकवायचें आहे अशा मागासलेल्या राष्ट्रांनीं त्या पद्धतीचा अभ्यास करून ती स्वतंत्रपणें आचरणांत आणण्यासाठीं झटलें पाहिजे. ती पद्धति शांततेनें व स्वतंत्रपणें अमलांत आणतां येईल. हिंसा अथवा रशियाचें वर्चस्व हीं अपरिहार्य नव्हेत.

भारतानें ब्रिटिश पार्लमेंटरी लोकशाहीचा अभ्यास करून ब्रिटिश सरकार येथून गेल्यानंतर ब्रिटिशांच्या मार्गानें आपली सामाजिक व राजकीय घडी बस-

विण्याचा प्रयत्न पुष्कळ यशस्वीपणें चालविला आहे. त्यांत जी उणीव भासते व अपयश येते त्याचें कारण सोव्हिअट पद्धतीने आर्थिक प्रश्न कसे सुटतात याचा अभ्यास येथे पुरेशा प्रमाणावर होत नाहीं आणि त्यामुळें त्यांचा अंमल करण्याचें कोणाच्या ध्यानातहि येत नाहीं हे होय. पूर्वयुरोपांत पार्लमेंटरी पद्धति सोडावी लागली तशी येथे ती अजीबात सोडावीच लागेल असें नव्हे. फक्त तिच्या तंत्रात काहीं बदल करावा लागेल. प्रत्येक राष्ट्राचा इतिहास हा निरनिराळ्या प्रकारे होऊं शकतो. पण येथील विकास यापुढें अधिक यशस्वी व्हावा आणि अमेरिका अथवा रशिया यांच्या पकडींत सापडावें लागणार नाहीं इतकें आपलें संघटन व बळ वाढावे यासाठी सोव्हिअट समाजरचनेचें रहस्य आपण समजून घेतले पाहिजे. पुढील प्रकरणात तो प्रयत्न करूं.

---

## : ९ : सोव्हिअट रचनेचें तात्त्विक विवरण

आधुनिक इतिहासात रशियांतील सोव्हिअट क्रांति ही फारच फार मोठी घटना होय. गेल्या छत्तीस वर्षांत दोन भयंकर महायुद्धं झालीं. त्यांचीं कारणें इतिहासांत खोलवर गेलेलीं असून परिणामहि जगद्व्यापी व दूरवर पोंचणारे झाले आहेत. पण त्या दोन्ही युद्धापेक्षाहि अधिक भयानक अथवा चांगले परिणाम रशियन क्रांतीचे झाले व होत असून ह्या क्रांतीची छाया साऱ्या जगावर आजवरच्या पेक्षांहि पुढील काळांत अधिक दाट पडणार आहे. जगाच्या राजकीय, आर्थिक, सामाजिक व आंतरराष्ट्रीय संबंधावर रशियन क्रांतीचे परिणाम होत असून जगभर या सर्व क्षेत्रांत नवीन भीति व नवीन आकांक्षा निर्माण केल्या जात आहेत.

एकुणिसाव्या शतकांत इंग्लंड हें लोकशाहीप्रधान राष्ट्र म्हणून जगापुढें आलें. इंग्लंडचे नामधारी आनुवंशिक राजे, तेथील सरदारांचें हौस ऑफ लॉर्ड्स् आणि सामान्य जनतेचें हौस ऑफ् कॉमन्स हा जगांत एक राज्यव्यवस्थेचा चांगला नमुना गणला जाऊं लागला. इंग्लंडचें वर्चस्व जगांतील सर्व राष्ट्रांत पहि

लागल्यामुळें इंग्लंडच्या पार्लमेंटच्या नकला साऱ्या जगभर केल्या जाऊं लागल्या व अफगाणिस्तान, इराण, इजिप्त अशा सरंजामी राष्ट्रांतहि समाजव्यवस्था मुळींच न बदलता 'पार्लमेंटें' स्थापन होऊं लागलीं. विशेषतः राजा व सरदार वर्ग यांना बरबाद न करता लोकशाहीचा देखावा उभारता येतो ही कल्पना सरंजामी राष्ट्रांना विशेष आकर्षक वाटली. पहिल्या महायुद्धापर्यंत जगांतील अनेक राष्ट्रांत ब्रिटनच्या लोकशाहीच्या या नकला गिरविल्या गेल्या.

पहिल्या महायुद्धाच्या अखेरच्या दिवसांत अमेरिका युद्धांत पडली व युद्धानंतर तह करण्याचे कामीं अमेरिकेकडे पुढारीपण आलें. अमेरिकेनें जगांत 'लोकशाही' स्थापणें हें आपलें युद्धाचें ध्येय जाहीर केलें. ही 'लोकशाही' कोणत्या स्वरूपाची, याची चर्चा कोणींच केली नाहीं. वास्तविक १८ व्या व १९ व्या शतकांत लोकशाही जी जन्मास आली ती सर्वत्र सारखी नव्हती. इंग्लंडात भांडवलदार वर्ग पुढें येऊन त्यानें ब्रिटिश लोकशाहीचा सागाडा उभारला. पण इंग्लंडात राजघराणें अथवा सरंजामदार बरखास्त झाले नाहींत. उलट फ्रान्स व अमेरिका या देशांत जो लोकशाही निर्माण झाली तींत राजा व सरजामदार वर्ग यांस सफशेल फाटाच मिळाला होता. या दोहोंपैकीं कोणती लोकशाही पहिल्या महायुद्धानंतर स्थापली जावी याचा खुलासा अमेरिकेचा अध्यक्ष विल्सन यानें न करताच जगान 'लोकशाही' स्थापण्याचा आपला उद्देश आहे असें विल्सननें जाहीर केले.

पुढें अमेरिकेनें तहाच्या कामातून अंग काढून घेतलें व मग लोकशाहीचा नामोल्लेखहि बंद पडला. युरोपात अनेक लहान लहान राष्ट्रकें निर्माण करण्यांत आलीं व त्यांच्यांत लोकशाहीचे देखावे उभारण्यात आले तरी जुनी सरंजामी समाजपद्धति नष्ट करण्याची गरज कोणासच वाटली नाहीं. विल्सनच्या घोषणेमुळें जगांत लोकशाही व राष्ट्रीय स्वातंत्र्य यासंबंधानें आकांक्षा वाढू लागल्या. पण संयुक्तांनीं त्या पुऱ्या केल्या नाहींत व जगांतल्या मागासलेल्या जनतेंत असतोष बळावूं लागला. रशियात युद्धकाळांत जी लोकक्रांति झाली तिकडे आतां हे मागासलेल्या राष्ट्रांतले असंतुष्ट लोक आशेनें पाहूं लागले.

विल्सननें लोकशाहीचा पुकारा केला पण खुलासा केला नाहीं. मागासलेल्या राष्ट्रांतील सरंजामी राज्यकर्त्यांनीं पार्लमेंटाचा देखावा उभा करून इंग्लंडसारखीच ही लोकशाही आहे अशी स्वतांची व आपल्या देशांतील जनतेची समजूत

घालण्याचा प्रयत्न चालविला. यावेळीं रशियन क्रांतीचा कम्युनिस्ट पुढारी लेनिन हा खरी लोकशाही कोणती याचा खुलासा करीत होता. लेनिननें रशियात इंग्लंडांतल्याप्रमाणें राजा व सरदार न ठेवता नष्ट केलेच होते, पण अमेरिका व फ्रान्स येथें होती तशी भांडवलशाहीहि शिल्लक न ठेवता शेतकरी-कामकऱ्याचें राज्यच निर्माण केलें. लेनिन म्हणतो,

"कामकऱ्यांची लोकशाही ही भांडवलदारी लोकशाहीपेक्षां लक्षपट खरी लोकशाही आहे. भांडवलदारी लोकशाही सत्ता जितकी लोकशाहीप्रधान असते तिच्यापेक्षां सोव्हिअट सत्ता फारच अधिकपट लोकशाहीप्रधान असते."

लेनिननें आपल्या लोकशाहींतच सामान्य जनतेस खरेखुरे हक्क मिळतात व सामान्य जनतेचें खरें खुरें हित पाहिलें जातें असें सांगितल्यामुळें अँग्लो-अमेरिकन साम्राज्यशाहीखाली पिचलेल्या लोकांचें प्रथम लेनिनच्या लोक-शाहीकडे विशेष लक्ष वेधलें व त्यांना तीबद्दल आपुलकीहि वाटूं लागली. पण जसजसा या सर्व लोकशाहीप्रकारांचा अभ्यास होऊं लागला व रशियन समाजव्यवस्थेचें आणि राजकीय धोरणाचें स्वरूप उग्र होऊं लागलें तसतसें अँग्लो-फ्रेंच-अमेरिकन लोकशाही व रशियन लोकशाही यांतील फरकांकडे लोकांचें लक्ष वेधूं लागलें. हा फरक कार्लमार्क्स हा जो रशियन कम्युनिस्टांचा मूळ तत्त्ववेत्ता त्यानें आपल्या लिखाणात जागोजाग विशद केला आहे.

## कम्युनिस्ट विचारसरणी व समाजरचना

अँग्लो-फ्रेंच-अमेरिकन लोकशाहीचा पाया आधीं व्यक्तिव्यक्तींचें पृथकत्व व स्वातंत्र्य हा होता. त्याप्रमाणें सर्व व्यक्ति कायद्यापुढें समान आहेत इतकेंच नव्हे तर व्यक्ति व्यक्ति या स्वतंत्र व समान हक्कांच्या असून आपापला स्वार्थ साधणें हा व्यक्तिमात्राचा हक्क आहे व तसेंच तें व्यक्तिमात्राचें कर्तव्यहि आहे. राज्यकार्याचें कर्तव्य व्यक्तिमात्राच्या शरीराचें व मालमत्तेचें रक्षण करणें आणि व्यक्तिव्यक्तींना करारपालन करायला लावणें एवढेंच असलें पाहिजे. व्यक्तिमात्रास आपल्या बौद्धिक व शारीरिक कर्तबगारीनें मालमत्ता करण्याचा आणि आपला माल, आपली शक्ति व आपली बुद्धि कोणासहि व कोठेंहि आपल्या इच्छेप्रमाणें विकण्याचा, गहाण ठेवण्याचा, भाड्यानें देण्याचा, मोफत देऊन टाकण्याचा हक्क आहे, अशा व्यवहारांत व्यक्तिव्यक्तींस करारस्वातंत्र्य असून सरकारनें फक्त या करारांचें पालन करवून घेतलें म्हणजे झालें, हा

अँग्लो-फ्रेंच-अमेरिकन लोकशाहीचा पाया होता. सरंजामी राज्यकर्ते लोकांचें हे हक्क मान्य करीनात म्हणून फ्रान्समध्ये राजघराणें व सरदार यांची सत्ता उलथून पाडली गेली आणि इंग्लंडमध्ये राजा व सरदार यांनी लोकांचे हे हक्क मान्य केल्यामुळे इंग्लंडात राजे व सरदार कायम राहिले.

मार्क्सनें या व्यक्तिनिष्ठ समाजव्यवस्थेचा मुख्य दोष दाखविला तो असा कीं व्यक्तिव्यक्ति या परस्परभिन्न असतात हे म्हणणें मुळी आर्थिक संघटनेच्या दृष्टीनें खोटेंच आहे. व्यक्तिव्यक्ति या शरीरानें परस्परांहून भिन्न असतील, पण आर्थिक दृष्ट्या त्या परस्परांशी जखडलेल्या आहेत. तेली साऱ्या गांवासाठीं तेल काढतो, शेतकरी साऱ्या गांवासाठी धान्य पिकवतो, सुतार गांवासाठीं निरनिराळें लाकडी काम करतो, न्हावी साऱ्या गांवाची हजामत करतो, लोहार साऱ्या गांवासाठी लोखंडी सामान तयार करतो, मास्तर साऱ्या गांवच्या मुलांना शिकवितो, भटजी गांवांतील लोकांचीं लग्नें लावतो, याप्रमाणे एकेका गांवांतील माणसें आर्थिक उत्पादनाचें काम परस्परांसाठीं करतात. सर्वांचें काम मिळून एकच सामुदायिक काम असतें. अर्थात् व्यक्तिव्यक्तींना आपण पृथक आहों असें वाटत असलें तरी कोणीच व्यक्ति पूर्ण पृथक व स्वतंत्र नसून समाजाचें घटकत्व हाच प्रत्येक व्यक्तीचा प्रमुख दर्जा आहे. अर्थात प्रत्येक व्यक्तीचे हक्क व कर्तव्यें या सामाजिक सांगडीशी सुसंगत अशी असलीं पाहिजेत.

राज्यकर्त्यानें अथवा व्यक्तिव्यक्तीनें केवळ व्यक्तिमात्राचा विचार न करता सर्व समाजाचा विचार केला पाहिजे हा मार्क्सच्या शिकवणीचा पहिला धडा आहे. असा विचार करताना भांडवलशाहीनें बहुसंख्य समाजाची पिळणूक व दारिद्र्य कसें वाढत जातें हे मार्क्स दाखवितो. मार्क्सनें मालमत्तेच्या स्वरूपांतला एक फरक विशेष ठळकपणे मालकी हक्कांच्या संदर्भात पुढें आणला. संपत्तीचे दोन प्रकार होतात. एक उपभोग्य संपत्ति व दुसरी उत्पादक संपत्ति संपत्तीच्या उत्पादनाचें प्रमाण ज्या अनेक कारणांनीं वाढतें, त्यांत उत्पादक संपत्ति अधिकाधिक सुधारत जाणें हें एक महत्त्वाचें कारण असतें. यंत्रसामुग्री उत्पन्न झाली, सुधारत गेली कीं तिच्या साहाय्यानें संपत्तीचें उत्पादन वाढतें. सुधारलेलीं यंत्रें व मागासलेलीं उत्पादनसाधनें या दोहोंचा माल बाजारांत विक्रीस आला तर सुधारलेल्या यंत्रांचा माल स्वस्थ पडून विकला जातो व मागासलेल्या उत्पादनसाधनांचा माल न खपून हे मागासलेल्या उत्पादनसाधनांचे मालक बेकार

होतात. ते मग सुधारलेल्या यंत्रवाल्याकडे मजूरीस जातात व त्याच्या जवळ स्वतांची यंत्रसामुग्री नसल्याने चरितार्थासाठी यंत्रवाल्याची नोकरी त्यांना चढाओढीने मिळवावी व करावी लागते. मग यंत्रवाले अशा कफल्लकांना कमीत कमी पगार देऊन त्याना जास्तीत जास्त राबवितात व त्यांचेकडून अधिकात अधिक माल काढून घेतात.

असा सर्व खूप उत्पन्न होणारा माल भराभर न खपल्यामुळे नवे उत्पादन थांबते व कामगाराना बेकारी येते. पण व्यक्तिनिष्ठ समाजातील सरकारचे कर्तव्य व्यक्तिव्यक्तीना आपापला स्वार्थ साधू देऊन फक्त व्यक्तिव्यक्तीना करारपालन करायला लावणे एवढेच असल्याने अशा व्यक्तिनिष्ठ समाजात ज्याच्या हातीं यंत्रसामुग्री म्हणजे भांडवल त्याचेच वर्चस्व स्थापन होते. अशा समाजांत सर्वांना मतदानाचा हक्क देऊन पार्लमेंटरी लोकशाही निर्माण केली तरी एकंदर समाजाचे जीवन वाढत्या प्रमाणांत भांडलदारांच्या हाती जात असल्यानें ती लोकशाही नसून भांडवलशाहीच होते. म्हणून यंत्रसामुग्री इत्यादि धनोत्पादन-साधने खाजगी व्यक्तींच्या हाती न ठेवता समाजाचें प्रतिनिधि असे जे सरकार त्याच्या हाती ठेवावी असे मार्क्स सागतो व तीच खरोखर लोकशाही होय असें तो म्हणतो. लेनिन हा मार्क्सचा अनुयायी असून धनोत्पादनसाधने समाजाचे प्रतिनिधि असे जे सरकार त्याच्या हाती लेनिनने दिलीं म्हणून त्याने आपली समाजव्यवस्था हीच खरी लोकशाही होय असे म्हटले आहे.

मानवी जीवन हे वैयक्तिक नसून आर्थिकदृष्टया ते सामाजिक आहे, हा जो सिद्धांत मार्क्सने मांडला त्या अनुसार लेनिनने रशियांत समाजरचना केली. यामुळें बेकारीनिवारण, शिक्षण, आरोग्य, घरे वगैरे सर्व जबाबदारी समाजाचे प्रतिनिधि असे जे सरकार त्याने पत्करली. त्यामुळें मार्क्स व लेनिन यांची लोकशाहीची कल्पना अधिक लोकहिताची आहे हीहि गोष्ट सिद्ध झाली. अँग्लो-अमेरिकन लोकशाहींत लोकांना मतदानाचा हक्क मिळाला तरी भांवडलदाराच्या हातीं आर्थिक सत्ता असल्याने लोकांना पार्लमेंटरी लोकशाहीचा फक्त सागाडा मिळतो, त्यांच्या नशीबीची आर्थिक गुलामगिरी टळत नाहीं हे मत आतां जगातील बहुसंख्य विचारवंतास मान्य झाल्यामुळे अँग्लोअमेरिकन लोकशाहीपेक्षा रशियन लोकशाही श्रेष्ठ मानण्यात येऊ लागली आहे. तसेंच अँग्लो-अमेरिकन लोकशाहीच्या मूळ कल्पनेंत समाजकल्याणाचे कायदे करण्याची

जबाबदारी सरकारवर नसे, पण रशियन कम्युनिस्टांच्या लोकशाहींत लोकांच्या फक्त राजकीयच नव्हे तर सर्वांगीण जीवनाची जबाबदारी सरकारवर असल्यानें सरकार ही संस्था सर्वतोपरीं लोकहितकारी ठरते. रशियन लोकशाहींतील या चांगल्या गोष्टींचे अनुकरण आतां ब्रिटिश लोकशाही करीत आहे.

रशियन कम्युनिस्ट राजवटीवर जो महत्त्वाचा एक आक्षेप येतो तो ती एक-पक्षीय लोकशाही आहे हा होय. रशियात अथवा कोणत्याहि कम्युनिस्ट राष्ट्रांत कम्युनिस्ट पक्षाखेरीज इतर पक्षांना मतदानाचा हक्क नाहीं, निवडणुकीस उभे राहता येत नाहीं, अधिकाराची जागा मिळत नाहीं. एकाच कम्युनिस्ट पक्षानें उभे केलेले उमेदवार व मतदानाची सक्ति अशा परिस्थितीत निवडणुकीचें स्वातंत्र्य ते कसले व लोकशाही ती कसली, असा हा आक्षेप असून बऱ्याच अंशीं तो खरा आहे मात्र त्याची दुसरी बाजू समजून घेतल्यास हा आक्षेप बराच निर्बल होतो. इंग्लंड, फ्रान्स यांसारख्या 'लोकशाही' राष्ट्रांत पार्लमेंटरी मार्गानेंच सरकारी कारभार चालवायचा या मुद्यावर एकमत असून धनोत्पादनसाधनांवर खाजगी मालकी असली पाहिजे, पार्लमेंटहि त्या मालकी-वर आक्रमण करूं शकत नाहीं आणि खाजगी मालकी रद्द करायची तर तीसाठीं नुकसानभरपाई दिली पाहिजे असा संकेत असतो. उलट रशियांत सरंजाम-दार व भांडवलदार यांच्या ईस्टेटी खालसा करूनच नवी समाजघटना उभारावी लागली. या साऱ्यांना नुकसानभरपाई द्यायची तर पुढील शतकभर जनतेचें जीवन त्या वर्गाच्या दारीं गहाण ठेवावें लागलें असतें. अर्थात् मालकशाहीच्या पुरस्कर्त्यांना मतदानाचा हक्क तेथे कसा द्यायचा ? इंग्लंड-अमेरिकेंत पार्लमेंटरी मार्ग अवलंबायचे या मुद्यावर एकमत असतें व जनता सुसंस्कृत आणि पार्लमेंटरी मार्गात रुळलेली असते. शिवाय इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका या देशांतही पार्ले-मेंटरी पद्धति वरिष्ठ वर्गावर लादण्यासाठीं प्रत्येक ठिकाणीं यादवीच्या आगींतून जावें लागलें आहे. नतर दीर्घकालानें ही पार्लमेंटरी पद्धति रूढ झाली रशियांत ज्या सरंजामदार भांडवलदाराना राजकीय व आर्थिक सत्तापदावरून हाकालले आहे त्यांनी धनोत्पादनसाधनें सार्वजनिक करण्याची मुख्य भूमिका असणारी नवी लोकशाही कधींच मान्य केली नाहीं उलट परक्यांची मदत घेऊन यादवी माजविली. रशियासारख्या मागसलेल्या देशांत क्रांतिकारक कट, खून बंडें हे प्रकार परंपरागत असल्यानें कम्युनिस्ट राजसत्तेशीं मूलतः विरोध असणारीं

माणसे त्या राज्यसत्तेशीं तडजोड कधींच करीत नाहींत आणि तीं शांततेने राहून कायदा पाळतील असा भरवसाहि धरता येत नाहीं. या वर्गातील माणसांची संख्या अगदी थोडीहि असते, समाजांतील धनोत्पादन, संस्कृतिवर्धन, समाज रक्षण वगैरे कोणत्याहि कार्याला त्यांची मदत नसते व ते विघ्न आणू शकतात. समाज एका अवस्थेतून दुसऱ्या अवस्थेंत जाताना अनेक संकटांना त्यास तोंड द्यावे लागतें. अशा वेळीं समाजक्रांतीचे शत्रुत्व पत्करणाऱ्या माणसांना मतदानाचा हक्क अथवा समाजांत थारा देणे कसे योग्य होईल असें रशियन कम्युनिस्ट विचारतात व त्यांचे हें म्हणणे फारसे चूक वाटत नाही.

धनोत्पादनसाधनें सार्वजनिक मालकीत असावी हें कम्युनिस्ट पक्षाचे मुख्य तत्त्व असून सर्व राज्यघटना व राज्यकारभार त्या मतावर आधारलेला असतो. अर्थात् ज्याना हें मत मान्य नाहीं अशाना मताधिकार देण्याने राज्यकारभारांत फक्त अडवणुकीखेरीज कोणता फायदा होणार ? भांडवलशाही देशांत धनोत्पादनाच्या बहुतेक साधनांवर व व्यवहारावर खाजगी मालकी व नियंत्रण असून पार्लमेंटांत उलटसुलट कायदे कांहींहि झाले तरी या खाजगी मालकांच्या हक्कास अथवा व्यवहारास कोणताहि बाध येत नाही. पण धनोत्पादनसाधने रशियासारख्या ज्या देशांत सार्वजनिक सरकारच्या मालकींत असणार तेथें सरकारी व्यवहार म्हणजे जनतेचा सर्व सामुदायिक जीवनव्यवहारच होय. तो एकदा एका धोरणानें जितका जितका अधिक काळ व खोलवर चालत राहील तितका तितका तो थोडाहि उलट दिशेला खेचणे म्हणजे जनतेचें जीवन उध्वस्त करणेच होय अशा राष्ट्राच्या ज्या पार्लमेंटांत खाजगी मालकीचे पुरस्कर्ते असतील तेथे त्यानीं मताधिक्य करून खाजगी मालकी पुन्हा सुरू करण्याचा प्रयत्न केला तर त्या राष्ट्राचें जीवन नष्टच होईल

भांडवलशाही राष्ट्रातलें आर्थिक जीवन फुटीर असून सरकारची धोरणे सर्वंकष नसतात. त्या धोरणांत कांहींहि बदल झाला व एक सरकार जाऊन दुसरे आले तरी समाजाच्या आर्थिक सांगाड्यास धक्का लागत नाहीं. कम्युनिस्ट समाजाची परिस्थिति याहून मूलतःच भिन्न असते. कम्युनिस्ट राष्ट्रांतील समाज हा जिवंत शरीराप्रमाणें सर्व रोमरोमीं एकजीव असून सरकार हें त्याचें काळीज असते. काळजाची धोरणें उलट सुलट केल्याने शरीर जगणार नाहीं.

बारीक दृष्टीनें पाहिल्यास असें दिसते कीं, भांडवलशाहींतली लोकशाही ही एक-

पक्षीयच असते. म्हणजे समाजजीवनासंबंधानें कांहीं तत्त्वाबाबत एकमत असणारे वर्गच पार्लमेंटांत निवडून येऊं शकतात. इंग्लंडात प्रचंड बहुसंख्य जनतेत पार्लमेंटरी राजकारणावर विश्वास आहे. इंग्लडांत याविरुद्ध मत असणाऱ्यास बंदी नाहीं, याचे कारण अशा मताचा प्रचार तेथले लोकच चालू देणार नाहींत व एखादा दुसरा बडवाला पार्लमेंटांत निवडून आला तर त्याचें कोणी ऐकणार नाही. इंग्लंडात जर कम्युनिस्ट अथवा फॅसिस्ट बरेच निवडून येऊ शकतील आणि बहुमत न मिळाल्यास आम्ही बंड करूं असे म्हणतील तर त्याना उमेदवार उभे राहू देण्यांत येणार नाहीं इतकेंच नव्हे तर त्यांना खुलेंहि राहू दिलें जाणार नाहीं. इंग्लंडात व अमेरिकेत पूर्वी यादवीनंतर शांतता लवकर झाली व परचक्र आले नाही यामुळे तेथें सर्व लोकाना लोकशाही हक्क लवकर मिळाले. फ्रान्समध्ये क्रांतीनतर युद्धे उद्भवलीं आणि मुख्यतः याच आंतरराष्ट्रीय संकटाच्या धाकामुळें फ्रान्समध्ये क्रांति व लोकशाही स्थिर होऊं शकलेली नाहीं. रशियन कम्युनिस्टाना लोकशाही व्यापक करण्याच्या मार्गांत हा युद्धाचा धोकाच मोठा वाटतो.

रशियांत धनोत्पादनसाधनें सार्वजनिक मालकींत राहिली पाहिजेत एवढ्या मुख्य मुद्यापुरतेंच मतैक्य निवडणुकींत अपेक्षिलें जातें. प्रत्यक्ष आर्थिक व्यवहारांत मतवैचित्र्य पुष्कळ असतें. त्या मतभेदांच्या जाहीर चर्चा पुष्कळ चालतात. उत्पादन, वाहतूक, वाटणी, धनोपयोग या सर्व व्यवहारावर या सर्व चर्चाचा व टीकांचा उपयुक्त परिणाम होत असतो आणि लोकांचे सर्व जीवनव्यवहार या टीकेंत व चर्चेत येतात.

मुंबईतील वर्तमानपत्रें फक्त मंत्रिमंडळाचीं खासगी जीवितें व त्यांचा राज्यकारभार यावर चोंचा मारीत बसूं शकतात. पण एका मुंबई शहरांतहि लक्षावधि जनतेचे जीवन ज्या अवाढव्य खाजगी धनोत्पादनव्यवहाराने जखडले आहे त्या व्यवहाराभोवतालची पोलादी भिंत कोणींहि फोडू शकत नाहीं. जेथे सर्व समाजजीवन हें चर्चेचा, टीकेचा, अभ्यासाचा व सुधारणाप्रयत्नाचा विषय होऊं शकतें तेथेंच खरी लोकशाही आणि मतस्वातंत्र्य असते. अब्जावधींचा उत्पादनव्यवहार खाजगी मालकीच्या तटबंदीच्या आड जेथे चालतो तेथें मंत्रिमंडळाच्या धड अथवा फुटक्या मोटारींची तपासणी करायला पत्रकाराना स्वातंत्र्य मिळतें व लक्षावधि लोकांच्या जीवनावर तैमुरलंगी हुकूमशाही गाजविणाऱ्या धनपतींना जे पत्रकार कांहींहि करूं शकत नाहींत ते पत्रकार आणि

पुढारी मंत्रिमंडळाचा पाडावहि करूं शकतात हा फक्त लोकशाहीचा निर्जीव तमाशा आहे. येथे नव्याण्णव टक्के लोकजीवन खाजगी उत्पादकांच्या पोलादी भिंतीआड ठेवून एक टक्का लोकजीवनापुरतें नागरिकस्वातंत्र्य देताना राज्यकर्त्यांना जी बेजबाबदारीची वृत्ति परवडते ती बेजबाबदारी सर्व समाजाचे उत्पादन व जीवन स्वतां हाताळणाऱ्या सरकारला परवडणार नाहीं.

या सर्व चर्चेत एक मुद्दा पुनः पुनः लक्षांत घेणे जरूर आहे तो हा कीं भांडवलशाहीप्रधान समाजातली ही लोकशाही इंग्लंड अमेरिका यासारख्या कांहीं अगदीं थोड्या देशांत, तेथली जनता लोकशाहींत रुळलेली असल्यानें, नांदत आहे. इतर सर्व देशांत खाजगी मालकांच्या हातीं कोट्यवधि लोकांचें जीवन आहे, जनता अशिक्षित, बेशिस्त व असंतुष्ट आहे, कोणत्याहि खऱ्या खोट्या कारणांनीं ती संपावर जाते, मारामारीस प्रवृत्त असते आणि तिचे शहाणे अथवा मूर्ख पुढारी तुरुंगाची हवा मधून मधून खात असतात. अशा देशानीं व तेथील पत्रकारांनीं रशियांत हुकुमशाही असून आमच्या येथें लोकशाही आहे व म्हणून आमचें समाजजीवन श्रेष्ठतर होय असें म्हणणें हें लोकशाहीचें स्पष्ट विडंबनच ठरेल.

कम्युनिस्ट लोकशाही अथवा सोव्हिअट लोकशाहीचा आणखी एक विशेष असा आहे कीं, पांच वर्षांतून एकदां कायदेमंडळासाठीं मतें देण्याचा हक्क बजावला म्हणजे लोकशाहीचा हक्क संपला, बाकी लोकांचें नेहमींचें कर्तव्य म्हणजे खाजगी मालकशाहीनें आंखून दिलेल्या चाकोरींत भांडवलदाराच्या नफ्यासाठीं डोळे बांधून घाणा ओढीत राहाणें हेंच होय. असें भांडवलशाही समाजांतलें ' नागरिक स्वातंत्र्य ' रशियांत नाहीं. खेड्यांतील ग्रामपंचायतींत म्हणजे 'सोव्हिअट-' मध्ये सर्व खेडुतांना मतदानाचा अधिकार आहे इतकेंच नव्हे तर सहकारी खरेदीविक्री, सहकारी शेती, वाहतूक, खेळ, शिक्षण आरोग्य, धंदे, घरबांधणी या सर्व बाबतींतलीं धोरणें ठरविण्यांत प्रत्येक नागरिकाला भाग घेता येतो. ठरतील त्या योजना पार पाडण्यांतहि त्याला भाग घ्यावा लागतो. यामुळें सर्व जीवनच लोकशाहीमय होतें. या सर्वांपेक्षा मोठी गोष्ट म्हणजे रोजगारीचा हक्क तेथें असल्यामुळें बेकारीची भीति कोणासहि नाहीं.

वर वर्णिलेलें सव सुमंगल जीवन रशियांत असेलच असें ठामपणें कोण सांगणार ? पण हें सर्व इष्ट व व्यवहार्य असून सिडने वेबसारख्यांनीं रशियांत तें

आहे अशी साक्ष दिली आहे. आणि रशियांत तसे ते सगळे नसले तरी भारतासारख्या मागसलेल्या देशांत शांततेच्या व लोकशाही मार्गाने ते आणणे इष्ट व शक्य आहे आणि इतक्यापुरतें ते प्रशसनीयहि आहे. रशियांतील ही राजकीय सघटना लोकशाहीप्रधान आहे अशी मान्यता जगभर बऱ्याच मोठ्या प्रमाणांत मिळाली आहे सोव्हिअट रशियाचे धोरण आक्रमक आहे असा संशय अलीकडे अनेकाना येऊं लागला असल्याने सोव्हिअट रशियाचे मित्रहि रशियावर आज उलटले असून त्याचे समाधान कसें करावे याचा विचार रशियन मुत्सद्यानीं केलाच पाहिजे. पण सोव्हिअट समाज पद्धतीचा विचार सोव्हिअट सरकारच्या आक्रमक धोरणाहून अलगपणे केला पाहिजे. निवळ तात्त्विक दृष्टीने जगातील मोठमोठ्या विचारवतांनीं रशियन पद्धति ही लोकशाही आहे असें सिडनेवेबप्रमाणेच मत दिले आहे. यामुळेच मॉस्को, याल्टा व पॉट्सडॅम येथें इग्लंड, अमेरिका व रशिया यांच्या ज्या परिषदा युद्धाअखेर अखेर भरल्या तेथें फॅसीझमूचा नाश व लोकशाहीची स्थापना करण्याचे कार्य इंग्लडअमेरिकेप्रमाणे रशियाकडेहि विश्वासपूर्वक देण्यात आले. त्या कराराची अंमलबजावणी रशिया करीत नाहीं अशी तक्रार ॲंग्लो-अमेरिकन्स करीत आहेत. पण ग्रीस, इटाली, दक्षिण कोरिया वगैरे देशात ॲंग्लो-अमेरिकनांनीं फॅसीझमूचा नाश व लोकशाहीची निर्मिति करण्याचा करार कितीसा पाळला हे विचारात घेतले म्हणजे लोकशाहीची स्थापना कोणीं अधिक केली हें सहज कळून येते.

ज्या मालाची नक्कल होऊं लागते तो माल उत्कृष्ट असलाच पाहिजे असें मानण्याची व्यापाऱ्यांत रूढि आहे. गेल्या शतकात ब्रिटिश पार्लमेंटची नक्कल मागासलेल्या राष्ट्रांत झाली तो ब्रिटिश पार्लमेंटच्या श्रेष्ठतेचा पुरावाच होता. चालू शतकांत 'शेतकरीकामकऱ्याचें राज्य' 'शेतकरीकामकरी जनता' वगैरे शब्द व त्यांतील कल्पना गौरवास्पद ठरल्या आहेत, याचें कारण रशियन सोव्हिएट राज्य ही कल्पना जगांत श्रेष्ठ गणली जात आहे हेच होय. सोव्हिएट रशियाच्या ज्या कल्पनेची जगभर जास्तींत जास्त नक्कल झाली अशी कल्पना म्हणजे 'आर्थिक नियोजन' ही होय. रशियन कम्युनिस्टांनीं व त्यांच्या जगांतील अनुयायानी जगभर क्रांतींचे झंझावात उठविले, आणि जगाचा थरकाप केला, ते साऱ्या जगाच्या आदरास, भीतीस, तिरस्कारास पात्र झाले,

पण याहीपेक्षा सोव्हिएट रशियाच्या आर्थिक नियोजनाच्या कल्पनेने जगावर अधिक छाप टाकली आहे. सोव्हिअट रशियामागून नात्सी जर्मनीनें चार वर्षांची आर्थिक योजना आंखली, तुर्कस्ताननें पाच वर्षांची आंखली, मेक्सिकोने सहा वर्षांची आंखली, भारतांत टाटाबिर्लांनीं अशीच योजना आंखली. भारत सरकारने आतां कायमचीच नियोजनसमिति बसविली असून नियोजन असणें हे सुधारणेचें लक्षण मानले जाऊं लागलें आहे. सैन्याने जग जिकण्यापेक्षा कल्पनांनी जग जिकणें हे अधिक श्रेष्ठ असेल तर रशियाच्या आर्थिक नियोजन पद्धतीने खरोखर नैतिक दृष्ट्या जग जिंकले आहे व हे त्याचें यश फार श्रेष्ठ होय ही गोष्ट मान्य केलीच पाहिजे.

रशियन कम्युनिस्टांना कार्लमार्क्सच्या शिकवणींतून स्फूर्ति मिळाली व त्यानें दिलेल्या विचारसरणीअनुसारच रशियन कम्युनिस्टांनीं आपली प्रगति करून घेतली. पण तपशीलाचा पुष्कळ विचार रशियन कम्युनिस्टाना स्वतःच करावा लागला. मार्क्सनें असा तपशील त्याना पुरविलेला नव्हता. हें स्वाभाविकहि होते. मार्क्स हा वस्तुस्थितीशीं संबंध नसणारीं मानसिक स्वप्ने तर्कानें रेखाटत बसणारा नव्हता. त्यानें भांडवलशाही व्यवहाराचे सूक्ष्म परीक्षण करून तिच्या नाशाची प्रवृत्ति तिच्या ठिकाणींच कशी आहे हे स्पष्ट केले. भांडवलशाहीमागून धनोत्पादनसाधनें सार्वजनिक सरकारच्या मालकीचीं होतील व बहुसख्य जनतेच्या विकासासाठीं बहुसंख्य जनतेच्या हातून त्यांचा वापर होणार असल्यानें तीच खरी लोकशाही असेल असे मार्क्सने म्हणून ठेवले. उत्पादन व वाटणी ही सरकारनियंत्रित होणार असल्यानें विनिमयाचे कार्य नफेबाज व्यापारी वर्गाकडे राहणार नाहीं, व्यापारी ही संस्थाच नष्ट होईल आणि खरेदीविक्री हें कार्य पोस्टासारखें राज्यकारभाराचा एक भाग म्हणून चालविलें जाईल हेंहि मार्क्सनें कॅपिट्ल् ग्रंथांत सुचवून ठेवले. पण याहून अधिक तपशीलवार अशी भांडवशाहीनंतरची समाजरचना तो रेखाटू शकला नाहीं.

स्वतां लेनिननें रशियन क्रांतीपूर्वी आपणांस क्रांतीनतर आर्थिक पुनर्घटना कशी करावी लागणार याची पूर्वयोजना आखलेली नव्हती. आणि याचें कारण कोणत्या परिस्थितींत कशी क्रांति होणार हें त्यालाहि तर्किता येणारें नव्हते. यामुळें १९१७ सालीं रशियांत क्राति होऊन सत्ता हातीं आल्यावर सहा महिन्यांनीं "भांडवलशाही समाजघटनेंतून सोशॅलिस्ट समाजघटना कशी

निर्मात्री याची काहीच योजना आम्हीं सत्ता घेतली तेव्हां तयार नव्हती, कोणाहि सोशॅलिस्टानें अशा कांहीं प्रश्नाचा विचार केल्याचे मला माहीत नाहीं, बोल्शेव्हिक अथवा मेन्शेव्हिक यांपैकीं कोणीहि अशासंबंधानें काहींहि लिहिलेले नाहीं" असें लेनिनला आढळून आले. यामुळे क्रांतीनतर उद्भवलेले अवाढव्य प्रश्न कसे सोडवावें हा मोठा बिकट प्रश्न कम्युनिस्टांपुढें उभा राहिला. कांहींसा साऱ्या मानवजातीच्या इतिहासांत न उद्भवलेला असा हा प्रश्न होता.

## भांडवलदारी अर्थशास्त्र व त्यांतील चूक

सरजामशाहीनतर भांडवलशाही जेव्हां सुरू झाली तेव्हा सरकार या संस्थेचें काम अवघड होण्याऐवजीं अगदीं सोपें झाले. भाडवलशाहीचा आर्थिक सिद्धान अगदीं साधा होता. मागणी आणि पुरवठा याचा सिद्धांत आर्थिक व्यवहाराचा नियामक आहे असें भाडवलशाहीचे तत्त्वज्ञान होते. लोकांना कोणता माल किती लागतो व तो कोणी निर्माण करावा याची चिंता सरकारनें करण्याचें कारण नाहीं. भांडवलदारी अर्थशास्त्रज्ञांच्या मतें बाजारात ज्या मालाला मागणी असेल त्याचा पुरवठा मागणीपेक्षा कमी असला तर त्या मालाच्या किमती वाढतात, यामुळें त्यांत जास्त नफा मिळण्याचा संभव निर्माण होतो. यामुळें उत्पादक जे असतात ते त्या मालाचा पुरवठा वाढवितात. हा पुरवठा वाढता वाढता मागणीपेक्षा अधिक झाला कीं किमती उतरूं लागतात. नफ्याची कूस कमी होते आणि उत्पादक हे त्या मालाची निर्मिति कमी करून जास्त मागणी असणाऱ्या दुसऱ्या मालाच्या निर्मितीमागे लागतात. याप्रमाणे समपातळींत राहणें हा जसा पाण्याचा धर्म आहे त्याप्रमाणें मालाच्या मागणीच्या प्रमाणांत मालाचा पुरवठा होत राहणे हा बाजारव्यवहाराचा धर्म असून सरकारनें चोऱ्या, धमकीबाजी, फसवणूक, करारभंग असे गुन्हे होऊ न देण्याची खबरदारी घ्यावी व यापरते बाजारव्यवहार, उत्पादन, वाटणी या सर्वांबाबत आपण दूर राहून लोकांना पूर्ण स्वातंत्र्य द्यावे असें भाडवलशाहीचे अर्थशास्त्र होते, त्यामुळें भाडवलशाही सरकारचे काम सोपे झालें.

मार्क्सने या अर्थशास्त्रांतली चूक दाखविली. माणसाची उत्पादनसाधनें व त्यांची उत्पादनशक्ति स्थिर राहून प्रत्येक उत्पादकांजवळ त्यांचें स्वतांचे उत्पादनसाधन असलेंच पाहिजे असें भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञानीं गृहीत धरलें होतें व भांडवलशाहीच्यापूर्वी तशीच अवस्था असल्यानें त्यांनीं

ती अवस्था गृहीत धरली. पण माणूस आपले चरितार्थधन सृष्टीपासून निर्माण करण्याच्या क्रमांत आपलीं उत्पादनसाधनें अधिकाधिक कार्यक्षम करीत आहे असें मार्क्सनें पाहिलें आणि या प्रयत्नाचा मानव समाजावर भांडवलशाहीच्या अर्थशास्त्रानुसार काय परिणाम होतो याचें मार्क्सनें संशोधन केलें. त्यावरून त्याला असें दिसून आलें कीं जो उत्पादक आपले उत्पादन सुधारतो, गुणानें व परिमाणानें अधिक करतो, त्याचा माल बाजारात अधिक स्वस्त होतो, मागासलेल्या उत्पादकाशीं चढाओढीन पुढारलेल्या उत्पादकाचा माल खपतो, मागासलेल्या उत्पादकाचा खपत नाही, त्याचें दिवाळें वाजतें, त्याचें उत्पादनसाधन निकामी होतें व तो कफल्लक होतो. सुधारलेलें उत्पादनसाधन स्वतःच्या मालकीचें करण्याची ऐपत त्याला नसते आणि मग तो बेकारी व उपासमार टाळण्यासाठी सुधारलेल्या उत्पादनसाधनाच्या मालकाकडे रोजगारीसाठीं जातो.

उत्पादनसाधनाच्या म्हणजेच भांडवलदाराच्या दाराशीं असेच कफल्लक झालेले इतर रोजगारेच्छूहि आलेले असतात. उत्पादनसाधन सुधारलेलें असल्यानें मजुरांची संख्या आतां कमी लागते. अर्थात् साऱ्या कफल्लकांना रोजगारी मिळण्याची आशा नसते. यामुळे त्यांच्यात चढाओढ लागून मजुरांचे दर कमी होतात व तरीहि कोणी तरी बेकार राहतातच. या मजुराकडून जास्तीत जास्त काम भांडवलदार करून घेतो व खर्चवेच वजा जाता त्याला अधिकाधिक नफा राहूं लागतो, तो अधिकाधिक धंदेवाल्यांना कफल्लक करीत सुटतो, उत्पादनसाधनें अधिकाधिक सुधारत नेतो.

याचा मानव समाजावर एक विचित्र व दुःखदायी परिणाम होतो. मजूर हाहि एक भांडवलशाहींतला माल बनतो. मग त्याजबद्दलची मागणी वाढली कीं त्याची किंमत म्हणजे मजूरी वाढली पाहिजे. पण भांडवलदार हे घडूं देत नाहीं. तो उत्पादनसाधनें सुधारत नेऊन मजूरांच्या बाजारात मजूर असतील त्यापेक्षा नेहमींच आपली मागणी कमी ठेवण्याची खबरदारी घेतो. यामुळें काहीं मजूर नेहमीं बेकार राहतात, मजूरांची मजूरी नेहमीं कमी राहते आणि त्यांना जास्तींत जास्त राबवून भांडवलदार जास्तीत जास्त नफा मिळवितो व अधिकाधिक मागसलेल्या उत्पादकांना बेकार करून मजूराच्या बाजारांत आणतो. म्हणून बेकारी म्हणजेच उपासमार ही भांडवलशाहीच्या भरभराटीची आवश्यक परिस्थितिच होऊन बसते. पुढें भांडवलदारभांडवलदारांत चढाओढ वाढत

जाऊन मोठा मासा लहान माशास खातो तसें येथे घडतें व बडे भांडवलदार बाकीच्यांना गिळकृत करून बाजारावर हक्कदारी मिळवितात.

नतर ते मागणी व पुरवठा या सिद्धांतालाच गळफास घालतात. कारण बाजारात चढाओढ थाबून हक्कदारी स्थापन झाली म्हणजे मागणीपेक्षा पुरवठा नेहमींच कमी ठेवून भांडवलदार मालाच्या किंमती उतरू देत नाहींत, मालाची निपज जास्त झाली तर भाव उतरूं नयेत म्हणून कॉफी जाळतात, पकडलेले मासे समुद्रांत लोटून देतात, दुभत्या गुरांची कत्तल करतात अशा प्रकारे भांडवलशाही जीवनांत अराजक, विध्वंस याला ऊत येतो आणि समाजाचे पोषण न करतां भांडवलशाही विध्वंसच करीत आहे असें दृश्य उभें राहते. अशा आशयाची भांडवलशाहीची मीमांसा कार्ल मार्क्स व लेनिन यांनी केली आणि समाजवाद्यांनीं भांडवलशाहीचा नाश करून धनोत्पादनसाधने समाजाच्या मालकीचीं करावीं व उत्पादन करायचें त मूठभरांच्या नफ्यासाठी न करतां समाजाच्या पोषणासाठीं व संवर्धनासाठी करावें हा आदेश दिला.

या आदेशानुसार वागायचे म्हणजे सरकार या संस्थेनें आतां केवळ प्रेक्षक बनून स्वस्थ न राहतां समाजाच्या सर्वांगीण जीवनांत हस्तक्षेप करणें भाग होते. त्यासाठीं आखलेली अशी योजना कांहीहि नव्हती. पण लेनिन व त्याचे अनुयायी यानीं ध्येयनिष्ठेनें काम सुरू केलें व जशा अडचणी आल्या तशा त्या निवारीत जाऊन जगाला धनोत्पादन व समाजसंघटना याचे एक उत्कृष्ट शास्त्र तयार करून दिलें.

क्रांति होताच रशियावर यादवीचे संकट कोसळलें. यामुळे सर्वत्र युद्धाचें वातावरण पसरलें. यादवी हे निव्वळ शस्त्रयुद्ध नसते. आंतरराष्ट्रीय युद्धांत रणांगणावर शस्त्रे लढतात, पण आघाडीमागे दोन्ही देशात उत्पादन चालू असते. म्हणून आंतरराष्ट्रीय युद्ध हें मुख्यतः शस्त्रयुद्ध असते. उलट यादवींत शस्त्रयुद्ध चालू असतें ते उत्पादनाच्या मध्यभागींच सुरु राहून उभय पक्षांच्या हातून स्वतांच्या व एकमेकाच्या उत्पादनसाधनांची व उत्पन्न मालाची नासाडी होत असते. यामुळें यादवींत रशियातील संपत्तीचा अपार विध्वंस झाला. ही यादवी लढतांना कम्युनिस्टांनीं सुरवातीस मालकी हक्काची सर्व कल्पना गुंडाळून युद्धकालीन कम्युनिझम् स्थापन केला आणि देशांतील सर्व संपत्ति सरकारनें मालकी हक्कानें यादवीच्या कामीं लावली. या काळीं नियोजन असें

कांहींच नव्हत. पण क्रांतीचे पुढारी अतीशय कर्तृत्वमय अशा अनुभवाच्या भट्टींत भाजून निघाल्यानें त्याना पुढील काळासाठीं धैर्यबळ पुष्कळ मिळालें.

यादवीनंतर पुढलें पाऊल कसे टाकावे यासंबधाने बोल्शेव्हिक पुढाऱ्यात पुष्कळ खल झाला. उत्पादन लवकर वाढून सोव्हिअट रशिया समृद्ध व बलवान लवकर कसा होईल ही पुढाऱ्यांना मुख्य चिंता होती. कारण भांडवलशाही राष्ट्रें रशियांतील क्रांति उध्वस्त करण्यास टपून बसलीं होतीं. याच भीतिमुळें प्रथम जागनिक क्रांति करण्यास हात घालावा म्हणजे सभोवार मित्रराष्ट्रे निर्माण होतील अशी कल्पना बाधून परराष्ट्रांत बोल्शेव्हिकांनीं क्रांति घडवून आणण्याचे प्रयत्न केले. पण ते सर्व फसले. इतकेंच नव्हे तर यादवीच्या काळीं सर्वत्र मालकी हक्क नष्ट करून जो कम्युनिझम् निर्माण करण्यांत आला होता त्यामुळें उत्पादनाला हुरूप कोणासच उरला नाहीं. म्हणून बोल्शेव्हिकानीं 'नवे आर्थिक धोरण' सुरू करून भांडवलशाही व मालकी हक्क यांना अधिक वाव करून दिला. त्यामुळे पुन्हा उत्पादनाची घडी बसूं लागली, पण बेकारीहि वाढूं लागली.

## स्टालिननें केलेली पुनर्घटना

दरम्यान लेनिन मृत्यु पावला. त्याच्या मृत्यूनंतर स्टालिननें जागतिक क्रांतीचें ध्येय तहकूब करून 'एकेका देशांत सोशॅलिझम्' (सोशॅलिझम् इन् वन कंट्री) हे नवे धोरण अमलांत आणण्याचे जाहीर केले व आर्थिक उत्कर्षाच्या प्रचंड योजना हातीं घेतल्या. पाश्चात्य देशात लहान लहान धंद्यांतून मोठमोठ्या धंद्यांची वाढ दीर्घकाल सावकाशपणें होत होती. पण अशी वाढ करण्यास सोव्हिअट रशियास वेळ मिळणार नाहीं, परचक्र लवकर येईल असा अदमासं स्टालिननें बांधला व आर्थिक उत्कर्षाचें काम अवाढव्य प्रमाणांत आरंभापासून चालू केलें. परराष्ट्रांकडून भांडवल मिळणार नव्हतें. ते भांडवल स्वदेशांत उत्पन्न करण्याच्या योजना स्टालिनने अवलंबिल्या, आणि त्यासाठीं समाजवाद्यांचें मूलग्राही अर्थशास्त्र त्याला उपयोगी पडले. भांडवल म्हणजे संचित धन, म्हणजेच अखेर माणसाच्या शरीरमनांतील श्रमशक्तीचा वापर. कामगार कामावर जायचे म्हणजे त्याना अन्नवस्त्र घरें ही पहिली गरज. त्यासाठीं प्रथम धान्य, कापूस, लाकडे याची तजवीज हवी. हें लक्षांत घेऊन स्टालिननें 'नवीन आर्थिक

धोरणां'तील खाजगी मालकी रद्द केली व बड्या जमीनमालकांच्या जमिनी सहकारी शेतींत आणल्या.

या बाबतींत बड्या जमीनमालकांनी सरकारी धोरणास विरोध करून सरकारच्या हातीं गुरे जाऊ नयेत यासाठी लक्षावधि गुरांचा संहार केला. पण स्टालिनने आपला निर्धार सोडला नाही. ही सामुदायिक शेती रशियात आरंभापासूनच इतकी यशस्वी झाली की रशियन क्रांतीतले सर्व कर्तृत्व नष्ट झाले तरी ही सामुदायिक शेती नष्ट होणार नाही असे मत मॉरिस हिंटसने व्यक्त केले आहे. शेतीची ही सर्व संघटना साऱ्या जगात व रशियाच्या जीवनात अगदीं नवीनच होती. ती यशस्वी करण्याने शेतकरीकामकऱ्याना आत्मविश्वास आला. कारखान्यासाठीं भाडवल कुठले ? शेतीचे धान्य तयार होत होतेच. कामगाराची श्रमशक्ति हे दुसरे भाडवल होते. या कामगाराना कामावर बोलवून सरकारनें त्याच्या अन्नवस्त्रांची व घराची तजवीज केली. परदेशातून प्रथम तज्ज्ञ आणले व रशियन मजूर शिकवून तयार केले. साक्षरताप्रसार ताबडतोब केला इतकेच नव्हे तर कारखाने, शेती, खाणी, वाहतूक यांसाठी लागणारे तज्ज्ञहि तयार केले. कारखानदारी उभारणे व चालविणे याचा अनुभव रशियाला झारशाहीत कारखानदारी सुरू झाल्यामुळे थोडा बहुत होताच. शिवाय शभर वर्षे अॅंग्लो-अमेरिकन कारखानदारी वाढत होती. तिचाहि कम्युनिस्टानीं अभ्यास केला होता. कारखानदार हा आपल्या कारखान्यास लागणारा कच्चा माल, मजूरी, मजूर, इमारती, व्यवस्थापक, तज्ज्ञ, बाजार, या सर्वांचा आगाऊ अदाज करून मग उत्पादनसघटना उभी करतो. हे मर्यादित अर्थाने आर्थिक नियोजनच असते. हीच पद्धति रशियन कम्युनिस्टांनी सारे राष्ट्र हा एक कारखाना ठरवून त्याला लावली.

लेनिनच्या कारकीर्दीत त्यानें शेती ज्याप्रमाणे शेतकऱ्यांच्या हातीं दिलीं त्याप्रमाणें कारखाने कामगारांच्या हातीं द्यावे हा सिद्धांत अमलांत आणण्याचा प्रयत्न केला व त्या त्या कामगाराच्या हातीं ते ते कारखाने दिले. पण त्यामुळें कारखान्यात अव्यवस्था माजली म्हणून लेनिनने ती पद्धत बद करून पगारी व्यवस्थापकांच्या चालकत्वाखालीं कारखाने दिले. त्याचप्रमाणे शेती, उद्योगधंदे वगैरेंसाठीं योजना आंखणारे कायमचें कमिशन नेमून त्यामार्फत सरकारनें योजना आंखल्या. या योजनांत खाणी, कारखाने यांना लागणाऱ्या सर्व मालाच्या

उत्पादनाची तजवीज जशी होती, तशीच एंजिनिअर्स, डॉक्टर्स, तज्ज्ञ वगैरे किती हवे याचीहि योजना आखली जाऊन त्यांच्या शिक्षणाची योजना आंखली जाई.

यामुळें सरकारी बजेटाची कल्पना सर्वस्वी बदलली. भांडवलशाहीत खाजगी धंदे हे सरकारच्या अखत्यारींत नसून खाजगीत व गुप्त असतात. यामुळें सरकारी उत्पन्नाचा अंदाज हा जुगार असतो आणि सरकारवरच्या राष्ट्रसंवर्धनाच्या खर्चाच्या जबाबदाऱ्या मात्र सतत वाढत असतात. रशियांत सर्व धंदे सरकारी मालकीत व शेती सरकारी नियंत्रणाखालीं असल्यानें सर्व राष्ट्राचें उत्पन्न व खर्च हाच सरकारी जमाखर्च झाला. देशाच्या सर्व उत्पादनाचे भावि उत्पादनाचें साधन आणि उपभोगाचे धन असे दोन प्रकार करून जनतेच्या हिताच्या दृष्टीने खर्चाचें बजेट आंखणे व भावि उत्पादनासाठीं हिशेबानें धन राखून ठेवणे हें शक्य झाले. हल्लीं इंग्लंड हळुहळू समाजवादाकडेच चाललें असल्यानें इंग्लंडात सरकारी बजेट मांडण्यापूर्वी 'राष्ट्रीय उत्पादन व खर्च' याचा खर्डा प्रसिद्ध करण्यांत येतो हें रशियांतील कम्युनिस्ट पद्धतीचेच अनुकरण आहे. पण भांडवलशाही देशांतले आर्थिक नियोजन आणि कम्युनिस्ट रशियांतले आर्थिक नियोजन यांत जमीनअस्मानाचा फरक पडतो. वर म्हटल्याप्रमाणें भांडवलशाही देशांतील बहुतेक संपत्तिसाधने खाजगी मालकांच्या स्वाधीन असल्याने सरकारला लोकोपयोगी कार्यासाठीं पैसाच नसतो आणि कागदावर आखलेल्या योजना प्रत्यक्ष अमलांत येत नाहींत व सरकार लोककल्याण करूं शकत नाहीं. स्टालिन म्हणतो,

"तुम्हीं जर भांडवलशाहीपासून आपणास मुक्त करून घेतलें नाहीं, धनोत्पादनसाधनांवरील खाजगी मालकी जर तुम्हीं नष्ट केली नाहीं तर तुम्ही पूर्वनियोजित अर्थसंघटना निर्मू शकणार नाहीं. कारण पूर्वनियोजित अर्थसंघटना म्हणजे काय ? तिचीं कांहीं कांहीं दृश्य लक्षणें कोणतीं असतात ? पूर्वनियोजित अर्थसंघटनेचा पहिला उद्देश बेकारीनिवारण हा असतो. भांडवलशाहींत कांहीं मर्यादेपर्यंत बेकारी कमी करता येते असें म्हटलें तरी पण बेकारी संपूर्ण नष्ट करावी म्हणण्यास कोणीहि भांडवलदार तयार होणार नाहीं. कारण मजूरांच्या बाजारांत रोजगारीची कोंडी करून स्वस्तांत स्वस्त मजूर मिळविणें हें भांडवलशाहीचें आद्य कर्तव्य असतें. भांडवलशाहीचा हा पहिला मोठा दोष

असतो. शिवाय पूर्वनियोजित अर्थसंघटनेचे दुसरे महत्त्वाचे उद्दिष्ट जनतेच्या गरजेचे पदार्थ प्रथम उत्पन्न करणें हें असते. पण ज्या मालाच्या उत्पादनांत नफा जास्त असतो त्या मालाचें उत्पादन भांडवलदार अधिक करतो, लोकोपयोगी माल निर्माण करणे हा त्याचा हेतुच नसतो. भाडवलदारावर त्याचा नफा कमी करून लोकांच्या गरजेअनुसार उत्पादन करण्यास तुम्ही कधींच सक्ती करू शकणार नाहीं."

## कीन्सचीं अर्थतत्त्वें आणि सोव्हिअट अर्थतत्त्वें

इंग्लडांत हळुहळू नियोजित अर्थव्यवस्था अमलांत येत आहे, पण त्यासाठीं त्यांना वाढत्या प्रमाणांत समाजवादी संघटना निर्मावी लागत आहे. इंग्लंडसाठी भांडवलशाहीचा प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ लॉर्ड कीन्स याने जीं आर्थिक तत्त्वें प्रतिपादिलीं ती रशियन पद्धतीवरून त्याने घेतलीं नसलीं व स्वतंत्रपणें त्याला सुचलीं असलीं तरी ती रशियन पद्धतीसारखीच आहेत. प्रो. एडवर्ड कार या लेखकानें लॉर्ड कीन्स याच्या आर्थिक तत्त्वांचा गोषवारा पुढीलप्रमाणें दिला आहे. भाडवलशाहींतले जे दोष नष्ट करणे इष्ट आहेत ते कोणते? लॉर्ड कीन्स म्हणतो,

( १ ) " समाजातील व्यक्तिमात्रानें उपभोग न घेता काटकसर करून जे धन शिल्लक ठेवलेले असते, तें खात्रीनें अथवा सहजगत्या नवीन उत्पादक भांडवल निर्माण करण्याच्या धंद्यांत जातेच असे नाही.

( २ ) सुस्थितींतलीं माणसे उपभोग न घेता काटकसर करून जी शिल्लक टाकतात ते काहीं सर्वथैव समाजोपयोगी धन बनूं शकत नाहीं. इतकेंच नव्हे तर इतर समाजानें पैसा खर्च केला तर तो जेवढा समाजोपयोगी होतो तेवढा या सधनांच्या शिलकेचा समाजाला उपयोग होत नाहीं. म्हणून " समाजात आर्थिक विषमता असावी म्हणजे श्रीमंताकडून भांडवलास पैसा मिळतो " हा अर्थशास्त्रज्ञांचा सिद्धांत चुकीचा ठरला आहे.

( ३ ) खाजगी शिल्लक व भांडवल यांच्या अभावीं देखील सरकारनें सामुदायिक शिल्लक ( कर वगैरे रूपानें ) निर्माण केली तर जरूर तेवढें भांडवल निर्माण करणें सहज शक्य होते.

( ४ ) या सामुदायिक शिलकेस भांडवलाच्या व्यापक राष्ट्रीकरणाची जोड द्यावी. म्हणजेच खाजगी शिल्लक नफेबाजीच्या उत्पादनासाठीं भांडवल

म्हणून वापरतात तसें होऊ न देता लोकहिताच्या धोरणानें उत्पादनासाठीं वापरावी. संपूर्ण रोजगारीचें धोरण त्यामुळेंच यशस्वी होते.'

ही सर्व तत्त्वें रशियांतील कम्युनिस्ट आर्थिक संघटनेत कशी अंतर्भूत होतात हे सांगणें फार सोपें आहे. भांडवलदार अथवा जमिनदार वर्ग आपली शिल्लक लोकोपयोगी उत्पादनास भांडवल म्हणून देत नाहींत ही कीन्सची तक्रार रशियांत निरुपयोगीच आहे. कारण रशियात भांडवलदार वर्ग व जमीनदार वर्ग नाहीतच. जे सामान्य श्रमजीवी लोक रशियांत आहेत त्यांची शिल्लक सरकार प्रत्यक्ष अप्रत्यक्ष करांनीं मिळविते, शिल्लक टाकण्याची सक्ती करून मिळविते, रेशनिंग व भावनियंत्रण करून, आणि लोकोपयोगी धंदे सरकारमार्फत चालवून पूर्ण रोजगारी निर्माण करते. भांडवलशाही अखंडपणे चालण्यासाठीं मजूरांच्या बाजारांत कायमची बेकारी थोडी फार असावी लागते. कम्युनिस्ट पद्धतींत उत्पादनाचा हेतु रोजगारी पुरविणें व लोकोपयोगी वस्तु पुरेशा प्रमाणात निर्माण करणें असा दुहेरी असतो.

अर्थात् कोणत्या धंद्यांत किती भांडवल घालायचें यासाठीं बाजारांतील मागणी व पुरवठा हें तत्त्व वापरता येत नाहीं. भांडवली मालाची गरज किती आहे आणि उपभोग्य मालाची गरज किती आहे याचा हिशेब नियोजन-समिति करीत असते. राष्ट्रास कारखानदारीची गरज अधिक वाटली तेव्हां उप-भोग्य मालाचें प्रमाण अगदीं बेताचें ठेवून नियोजनसमितीनें कारखानदारी मालाच्या निर्मितीकडे श्रम व भांडवल याचा ओघ अधिक वळविला. तरी पण उपभोग्य माल कमी निपजला म्हणून त्याच्या किमती वाढल्या नाहींत. दुसरे महायुद्ध चालू असता आवश्यक जिनसांचें रेशनिंग असून सर्व माल ठराविक किमतीला मिळत असे. कांहीं विशिष्ट मालाच्या किंमती गिरण्यांच्या दुकानांत अथवा सहकारी दुकानात मजूर अथवा सहकारी दुकानांचे सभासद यांना स्वस्त मिळत, तर अधिक पगाराच्या लोकांना महाग पडत.

भावनियंत्रण ही पद्धत सोव्हिअट रशियांतच प्रथम निघाली व आतां सर्व जगभर तिचें बरेंवाईट अनुकरण होत आहे. भांडवलशाहींत अनियंत्रित बाजार हेंच वैशिष्ट असल्यामुळे भावनियंत्रणाचा प्रश्नच उद्भवला नाहीं. पुढें भांडवल-दारी सरकारांना लोकांना न कळत किंमतींचा चढउतार करणें जरूर झालें व आपलें उत्पन्न वाढविण्याचा अप्रत्यक्ष युक्त्या योजाव्या लागल्या. यामुळें चलन-

व्यवहार अनिर्बंध होता त्यावर नियंत्रण घालावे लागले. हें चलन सोन्याच्या आधारावर कागदी स्वरूपात उभारण्याची पद्धत पडली. पण जगांतलें सारे सोने एकदोन राष्ट्रांतच बहुतेक जाऊन पडले, त्यामुळे 'सोन्याच्या आधारावर चलन' ही शब्दयोजना निव्वळ कागदीच ठरू लागली. नंतर कांहीं ठराविक वस्तूच्या किमतीचे सूचकांक कल्पून त्यावर चलनपरिमाण आधारावे ही कल्पना निघाली. पण अखेर सर्वसामान्य जनतेच्या जीवनाचा विचार करता चलनपद्धति कशीहि असो, लोकांच्या मिळकती आणि आवश्यक वस्तूना द्याव्या लागणाऱ्या किमती व त्या वस्तूंचा लोकाना निश्चित पुरवठा ही जबाबदारी भांडवलदारी राष्ट्रानाहि पत्करावी लागत आहे. कम्युनिस्ट समाजघटनेतली ही कल्पना भांडवलशाही समाजघटनेंत अमलांत आणण्याचा प्रयत्न होतो व त्यास यश येत नाहीं. कारण स्टालिन म्हणतो त्याप्रमाणे भांडवलशाही पद्धतींत आर्थिक नियोजन अशक्यच आहे. पण रशियन समाजघटनेतील कांहीं तत्त्वाची नक्कल तरी केल्यावाचून भांडवलदारी राष्ट्रांना आज जिणेच अशक्य झाले आहे.

सामाजिक हित हे सोव्हिअट आर्थिक नियोजनाचे मुख्य तत्त्व आहे. भांडवलशाहींत एकेका धंद्याचे नियोजन होते. पण समाजहित हा त्याचा प्रमुख हेतु असूं शकत नाहीं. हेन्री फोर्ड अथवा टाटा कंपनी यांच्या कारखान्यांत कामगारांसाठीं अनेक सुखसोयी केलेल्या आहेत. पण सारे जग त्यांना नफेबाजीचा बाजार म्हणून वापरतां येतें आणि जगांतील मजूराच्या बाजारातील उत्तमोत्तम माणसें आणि कच्च्या मालाच्या बाजारांतील उत्तमोत्तम माल ते निवडून घेऊ शकतात. अर्थात् बाकीच्या कारखानदाराना ही संधि कमी होऊन त्यांना कामगाराची स्थिति सुधारता येतच नाही. म्हणून एकंदर भांडवलशाहीचा विचार करता कमींत कमी मजूरी देऊन जास्तींत जास्त उत्पादन केल्यास व हा माल आपापल्या देशाबाहेर विकल्यासच नफा मिळविता येतो. मजूरमजूरांत चढाओढ राहावी यासाठीं थोडीफार बेकारीहि सांभाळावी लागते, स्वदेशांतील लोकाची मजूरी व इतर मिळकत कमी असल्याने त्याची खरेदीशक्ति कमी राहते व त्यांना जो माल अवश्य असूनहि खरेदी करतां येत नाहीं असा माल नफ्यासाठीं भांडवलदारांना परदेशीं पाठवावा लागतो.

हिटलरनें भांडवलशाही उत्पादन संघटित केले, सारा देश हा जणूं कांहीं एक कारखानाच बनविला. आणि बेकारीहि घालविली. पण कशी ! शस्त्रास्त्र-

कारणाने काढून. शस्त्रास्त्रे कशासाठीं ? जगांतले बाजार जिंकून घेण्यासाठीं. अखेर त्याचा पराभव झाला म्हणून हिटलरला हिणवावे असें नाहीं. पण त्याची पूर्ण रोजगारीची योजना युद्धाच्या तयारीवर आधारली होती. त्याने एक जग जिंकून फक्त जर्मनांच्या कल्याणासाठीं त्या जगावर राज्य करावे अथवा पराभूत व्हावे यावाचून त्याला मार्ग नव्हता. त्याचे धोरण भांडवलशाहीच्या चुकीच्या भूमिकेवर त्याने निकराला नेले व मोडून पडले. सोव्हिअट पद्धतींत असे होण्याचे कारण नाही. उत्पन्न होणाऱ्या मालांपैकीं भावी उत्पादनासाठीं भांडवल म्हणून राखून ठेवल्यानतर बाकीचें लोकांना खरेदी करता येईल इतकी मजूरी त्याना वाटलीच जाते व त्याच धोरणाने भावनियत्रण केले जाते.

अर्थात् भाडवलशाहीत काम करण्याची कायदेशीर सक्ती नसते ती मात्र सोव्हिअट समाजपद्धतीत खास असते. भाडवलशाहीत बेकारीची भीति हा 'अदृश्य चाबूक' काम करण्याची सक्ती करीत असतो. भाडवलशाहींतलें 'व्यक्तिस्वातंत्र्य' हे या 'अदृश्य चाबका'खालीं काम करायला लावीत असते. सोव्हिअट पद्धतींत हे काम न करण्याचें व्यक्तिस्वातंत्र्य कोणासहि मिळत नाहीं. जीवनाच्या कमींत कमी गरजा सर्वांना मिळतात. पण गुण व परिमाण यांत अधिक श्रेष्ठ काम करणारास अधिक पगार देण्यांत येतो. यामुळें विषमता उत्पन्न होते व तिचें प्रमाण कित्येकांचे बाबतींत फार मोठें असते. पण सर्वांना शिक्षण घेण्याची व उच्च उच्चतर भूमिका गांठण्याची संधि नेहमीं देण्यांत येत असल्यानें वरचावरचा दर्जा मिळविण्याची चढाओढ लागते. यामुळे व्यक्तिमात्राचा विकास होतो व राष्ट्राची संपत्ति वाढते.

राष्ट्रीय संपत्तीचा जसजसा विकास होतो तसतशी थोड्या लोकांची पुजी न वाढता सामान्य जनतेला अधिकाधिक जीवनसाधनें पुरविलीं जाऊं लागतात. यामुळे सर्वच जनतेला उत्पादन अधिकाधिक वाढविण्यांत ईर्षा वाटते. धंद्यांचें राष्ट्रीकरण हेच लोकांना अधिकाधिक परिश्रम करण्यास उत्तेजन देणारें असते असे म्हणतात ते यामुळेच. हा हुरूप लोकांचा वाढावा यासाठीं उद्योगधंद्यांचा खर्च व उत्पादन, त्यापासून लोकाचा व देशाचा होणारा उपयोग आणि लोकांकडून सरकारची अपेक्षा याविषयीं आकडेवार माहिती सरकार प्रसिद्ध करते. ती लोक वाचतात, चर्चा करतात आणि सरकारनें व लोकांनीं काय अधिक केलें पाहिजे याची लोकांत वाटाघाट चालू राहते. भांडवलशाही उत्पादन हें

खाजगी मालकीच्या पोलादी भिंतीआड चालते व ते नफ्यासाठीं चालते. यामुळे लोकांना ते काहीं कळत नाहीं, त्याबद्दल ममत्व वाटत नाहीं आणि लोक त्याचे वैरीच होतात.

कामगारसंघटनांना सोव्हिअट अर्थरचनेंत महत्त्वाचे कार्य आहे. भांडवलशाहींत कामगारसंघटना या कामगारांचे पगार वाढवून घेणें, कामाचे तास कमी करून घेणें, कामगारांची राहणी सुधारून घेणें इत्यादि कार्य करतात. उत्पादन जास्त झाले कीं कमी झाले हे पाहण्याची काळजी त्यांना करावी लागत नाहीं, त्यांनी ती काळजी करावी अशी अपेक्षाहि नसते. यामुळे समाजवादी अर्थघटनेंत सर्व कारखाने सरकारच्या मालकीचे झाल्यावर कामगार संघटनांचे स्थान कोणते राहील यासंबंधानें रशियांत क्रांति झाल्यानंतर वाद माजला. समाजवादी घटनेंत कामगारसंघटनांचें कार्य कोणते असावे यासंबंधाने पूर्वी कोणीच कांहीं विचार केलेला नव्हता. यामुळे क्रांतीनंतर कामगारसंघटना सरकारांत पूर्ण विलीन कराव्या असें मानणारा व उलट कामगार संघटना संपूर्णपणें सरकारच्या नियंत्रणाबाहेर राहाव्या म्हणणारा असे दोन पंथ क्रांतीनंतर उत्पन्न झाले. लेनिननें या दोहोंमधला मार्ग काढला. कामगारसंघटना त्याने वाढूं दिल्या. त्यांना पगार, कामाचे तास, कामगारांची राहणी वगैरे संबंधाने सामुदायिक करार करण्याची मुभा असते. पण त्याबरोबरच राष्ट्रीय उत्पादनाच्या कार्यांत कामगारांनीं उत्साहाने भाग घ्यावा अशी कामगारांची मनोवृत्ति बनविण्याचेंहि काम या कामगारसंघटनांवर सोपविलेलें असतें. यासाठीं कामगारपुढारी व कारखानामॅनेजर यांच्या संयुक्त बैठकी होत असतात. व कामगारसंघटनामार्फत कामगारांना हिताचे व उत्पादनकार्याला उपयुक्त असे नेतृत्व कामगारांना मिळते. संप वगैरे करण्याचे प्रसंगच येत नाहींत.

भांडवलशाहींत आतां कामगार, कारखानदार व सरकार यांचीं संयुक्त कौन्सिलें स्थापन झालीं आहेत. पण अशा कौन्सिलांतून फक्त आडमुठेपणा वाढतो आणि बाहेरच्या जगांत नफेबाजी, टाळेबंदी, टाळेतोड आणि संप यांनाच ऊत येत आहे.

सोव्हिअट समाजघटनेचे तात्त्विक स्वरूप कसें आहे व त्याचे अनुकरण परराष्ट्रांत कसें होत आहे याचे संक्षिप्त विवरण येथवर केलें. आमचें ज्ञान पुस्तकी आहे. पण पाश्चात्य राष्ट्रांतील कांहीं सत्यसंशोधक

विद्वानांनीं सोव्हिअट समाजघटनेबद्दल असेच मत दिलें आहे. रशियात असे सुयश काहीहि नसून लोक दरिद्री, दुःखी आहेत, श्रीमंतीगरीबी यात फार तफावत आहे असेंहि कोणी सांगतात. पण जगातले एक अत्यंत मागासलेले राष्ट्र अवघ्या पचवीस वर्षांच्या प्रयत्नाने एका बलाढ्य शत्रूशीं लढून विजयी झाले आणि युद्धात अफाट विध्वंस झाला होता, तो त्या राष्ट्रानें अवघ्या पाच वर्षात भरून काढला, तेव्हा त्याची अतःस्थिति क्रातीने बरीच जलद व पुष्कळ सुधारलेली असली पाहिजे असे मानण्यास जागा आहे असे वाटते व त्या क्रातितत्त्वाचे स्वरूप पाहता ते शक्य व सभवनीयहि आहे असे म्हणावे लागते.

## पोलंडमधील कम्युनिस्ट प्रयोग

सोव्हिअट रशियाची हीच क्रातिकारक समाजरचनेची कल्पना रशियाच्या वर्चस्वाखालीं असलेल्या पूर्व युरोपीय राष्ट्रात थोड्या फार फरकानें अमलात येत आहे. हे क्रातिकार्य तिकडे कसे चालते हें येथे तपशीलानें सांगत बसण्याची जरूरी नाहीं. पण थोडीशी कल्पना यावी यासाठीं 'यू एस्. न्यूज ॲन्ड वर्ल्ड रिपोर्ट' या अमेरिकेतल्या सामान्यतः निःपक्षपाती धोरणाच्या नियत-कालिकात पोलडमधील कोणा वरिष्ठ अधिकाऱ्याची मुलाखत दिली आहे, ती येथे भाषांतर करून देतों. पोलंड हे महायुद्धानतर रशियाच्या वर्चस्वाखालीं गेले. तेथे कम्युनिस्ट समाजघटना कशी अमलांत येत आहे हें समजून घेण्यासाठीं 'यू. एस्. न्यूज ॲन्ड वर्ल्ड रिपोर्ट'चा एक प्रादेशिक सपादक रॉबर्ट क्लीमन हा पोलंड-मध्ये जाऊन तेथील एका बड्या अधिकाऱ्याला भेटला. त्या अधिकाऱ्यानें आपलें नाव जाहीर करण्यास परवानगी न देतां फक्त मुलाखत जाहीर करण्यास परवानगी दिली व क्लीमनच्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं, तीं मि. एक्स्. या नांवावर क्लीमनने दिलीं आहेत. एक्स् हा बरीच वर्षें अमेरिकेत राहिलेला आहे. क्लीमनचे प्रश्न व एक्स्.चीं उत्तरें पुढीलप्रमाणे आहेत.

**क्लीमन्**—रशिया ज्या आर्थिक दर्जाला पोचला आहे त्या दर्जाला पोलंड केव्हा पोचेल ? तुमचें वेळापत्रक कसें आहे ?

**एक्स्**—वेळापत्रक असें कांहींच नाहीं. आम्ही समजतों कीं आमच्या षट्-वार्षिक कार्यक्रमानें समाजवादी जीवन निर्माण होणार नसून फक्त त्याचा पाया घातला जाईल. सोव्हिअट रशियालाहि आपले दोन पंचवार्षिक कार्यक्रम पूर्ण होईपर्यंत म्हणजे १९३६–३७ पर्यंत समाजवादी जीवन निर्मिता आले नाहीं.

**क्लीमन**—१९६० पर्यंत ?

**एक्स्** –तें सांगता येणार नाहीं.

**क्लीमन**—शेती पूर्ण सामुदायिक झाली व समाजवादी जीवन जगता येण्याइतका औद्योगिक उत्कर्षाचा पाया तयार झाला म्हणजे समाजवादी जीवन मिळविले असें तुम्ही मानाल काय ?

**एक्स्**—सामान्यतः असें म्हणणे बरोबर ठरेल. पण व्यापार व लहान धंदे यांत अजून असलेली खाजगी मालकी नष्ट करून भांडवलशाहीचा संपूर्ण निःपात करावा लागेल.

**क्लीमन**—या षट्‌वार्षिक कार्यक्रमांत म्हणजे १९५५ अखेर सगळा किरकोळ व्यापारहि सार्वजनिक मालकींत येईल काय ?

**एक्स्**—तसें निश्चित सांगणें कठिण आहे. पण त्या दिशेनें आम्ही प्रगति करूं खास. १९५५ पर्यंत आमचा सहकारी व्यापार हल्लींच्या दुप्पट वाढेल. सहकारी दुकानें व सरकारी दुकानें या दोघांत समाजवादी जीवनास शोभणारी अशी चढाओढ आम्ही लावणार आहों.

**क्लीमन**—राष्ट्ररक्षणावर बजेटाचा किती भाग खर्च होतो ?

**एक्स्**—आतांच माझ्या हातीं आकडे नाहीत.

**क्लीमन—बरें** तर; पण काय हो, सरकारी बजेटांत सरकार धंद्यात जे भांडवल घालतें त्याचाहि समावेश होतो का ?

**एक्स्**—होय. सोशॅलिझम् व भांडवलशाही या दोहोंत हा एक महत्त्वाचा फरक आहे. भांडवलशाहींत तुमच्यावर भांडवल उभारण्याचा प्रसंग आला म्हणजे पैसा कोठून आणावा हा तुम्हांला प्रश्न पडतो. आम्हांला इथे पैशाची चिंता करावी लागत नाहीं. एखाद्या नवीन भांडवली योजनेला साहित्य आणि मजूर किती लागतील याचा आम्ही विचार करतों. साहित्य व मजूर उपलब्ध असतील तर पैसा पुरविण्याची व्यवस्था आम्ही करतों. पैसा आमच्या सकल्पित कार्याला मर्यादा घालूं शकत नाहीं. साहित्य व मजूर या भौतिक वस्तूंमुळे आमच्या कर्तृत्वाला मर्यादा पडूं शकते. लोकांच्या जवळ खरेदीशक्ति नाहीं यामुळें आमचें अडत नाहीं. लोकांना हवा असणारा माल आम्ही जितका त्यांना पुरवूं शकूं तितक्या प्रमाणांत लोकांना खरेदीशक्ति वाटण्याची

योजना आम्ही आखीत असतों. पैसा हे समाजवादी व्यवस्थेत फक्त मोजदादीचें, खर्च किती झाला उत्पन्न काय झाले वगैरेचा हिशेब करण्याचें, एक साधन आहे.

**क्लीमन**—या षट्वार्षिक योजनेनें पोलंड हें पूर्व युरोपात सर्वांत बलिष्ठ औद्योगिक राष्ट्र होईल काय ?

**एक्स्** —तसा संभव आहे. मालाच्या एकूण उत्पादनांत आम्ही झेक राष्ट्रास मागे टाकूं. याचें कारण उघड आहे. त्यांच्या देशात फक्त एक कोटि वीस लक्ष लोकसंख्या आहे. आमच्या येथें पाच कोटि आहे. पुढील सहा वर्षांत आमचे एकूण औद्योगिक उत्पादन आजच्या दुप्पट होईल. पोलादाचे धंदे वाढविण्यावर आम्ही अधिक भर देऊं. कारण कारखान्यांची यंत्रसामुग्री, इमारती वगैरे भांडवली माल अधिक वाढवून आम्हांला कारखाने वाढवायचे आहेत.

**क्लीमन**—पूर्व युरोपांत आंतरराष्ट्रीय व्यापारातहि पोलंड १९५५ सालीं अव्वल दर्जास पोचेल काय ?

**एक्स्**—हो, मला असे वाटतें.

**क्लीमन**—नव्या रूबलगटांत पोलंडचें स्थान कोणते ?

**एक्स्**—असा एकादा गट असेल असे मला वाटत नाहीं. पूर्व युरोपीय राष्ट्रांत परस्परसहकार्य ज्या गोष्टीनें होईल ती आम्हाला महत्त्वाची वाटते. मॉस्कोकडून आम्हांला कर्ज मिळाले आहे. कांहीं वर्षेपर्यंत या कर्जखातीं माल मिळत राहणार आहे. या कराराची बजावणी सुरू झाली आहे.

**क्लीमन**—पोलंडच्या व्यापाराचा किती भाग सध्यां पूर्वेशीं व किती पश्चिमेशीं चालतो ?

**एक्स्**—माझ्याजवळ आतां आंकडे नाहींत. प्रथम पश्चिमेशींच आमचा व्यापार अधिक होता. पण आतां गेलीं दोन वर्षें पूर्वेशीं जास्त वाढला आहे. पश्चिमेशीं अधिक व्यापार करावा अशी आमची फार इच्छा आहे. पण अमेरिकेचें धोरण पक्षपाताचें आहे आणि फ्रान्ससारख्या पाश्चिमात्य राष्ट्रांना आमच्याशीं व्यापार कमी कमी करण्यास अमेरिका उत्तेजन देते अशी आमची तक्रार आहे.

**क्लीमन**—हल्लीं चालू असलेले तणातणीचें युद्ध पुढील थोड्या दिवसांत थांबेल असा संभव तुम्हाला दिसतो काय ?

**एक्स्**—हे युद्ध शक्य तितक्या लवकर थांबावें अशी आमची इच्छा आहे. माझें मत असें आहे कीं ही तणातणीच्या युद्धाची कल्पना प्रथम अमेरिकेनें काढली आणि आतां ते युद्ध थांबविणे अमेरिकेच्याच हातीं आहे. हे युद्ध थांबविण्याची तयारी सोव्हिअट रशियानें संयुक्त राष्ट्र संघटनेमार्फत दाखविली आहे. निःशस्त्रीकरण, तह वगैरेसंबंधाने सूचना करण्यांत आलेल्या आहेत. पण अमेरिका कोणतीहि सूचना मान्यच करीत नाहीं.

**क्लीमन**—अमेरिकेवर फार मोठें आर्थिक संकट येईल असें तुम्हांला वाटते कां ?

**एक्स्**—मीं अमेरिका सोडल्याला कांहीं वर्षें होऊन गेलीं. त्या प्रश्नाचा अभ्यास करायला मला वेळ मिळालेला नाहीं. मी यू. एस. न्यूज ॲन्ड वर्ल्ड रिपोर्ट पुष्कळदा वाचतो. पण इतक्या दूर अंतरावरून निर्णय देतां येईल इतकें साहित्यहि अजून मला मिळालेलें नाही.

**क्लीमन**—गेल्या वर्षांत पोलंडांत राष्ट्रीकरणाने मजल बरीच गाठली काय ?

**एक्स्**—होय, निःसंशय.

**क्लीमन**—पुढील सालीं वाढती मजल गाठाल काय ?

**एक्स्**—याच शब्दांत होय किंवा नाहीं असें उत्तर देतां येणार नाहीं. पण इतके सांगतो कीं, १९४९ सालीं आम्हांला १९४८ पेक्षा १२ टक्के औद्योगिक उत्पादन अधिक करायचे होतें. यावर्षी म्हणजे १९५० सालीं आम्हांला १९४८ पेक्षा २२ टक्के वाढ करायची आहे. औद्योगिक उत्पादनांत कोणतीहि वाढ झाली तरी तीमुळे राष्ट्रीकृत उत्पादनांतच अधिक वाढ होते. कारण आमच्या एकूण उत्पादनांत राष्ट्रीकृत व सहकारी अशा धंद्यांतच मुख्यतः वाढ होत असते. उत्पादन वाढण्यासाठीं तज्ज्ञ अधिकाधिक तयार करण्यावर आम्ही विशेष भर देतो. पोलंड हा आजवरचा मागसलेला देश आहे. धंदे जितके अधिक वाढवावे तितके चतुर कारागीर अधिक लागतात. अर्थात् त्यांना शिक्षण द्यावें लागतें. आमच्या या षट्वार्षिक योजनेमुळे तज्ज्ञांची संख्या फार मोठी होणार आहे.

तसेच एंजीनिअर्स व चतुर कारागीरहि पुष्कळ वाढणार. उदाहरणार्थ डॉक्टरांची संख्या दुप्पट होणार आहे.

**क्लीमन**—यामुळें कम्युनिस्ट पक्षांत कामगार सभासद अधिक वाढतील काय ?

**एक्स्**—ते वाढतीलच असें नाहीं.

**क्लीमन**—हल्लीं पक्षाचे किती सभासद आहेत ? १९४८ सालीं ९ लक्ष असल्याचे मीं ऐकले होते. गेल्या वर्षीं ही सख्या वाढली कीं घटली ?

**एक्स्**—हल्लीं पक्षाची सभासद सख्या १५ लक्ष असावी. अनेक कारणास्तव अनेकांनी पक्ष सोडला आहे. अनेकांना हाकालले आहे, पण पक्षाचे सभासद कोणी असोत वा नसोत समाजवादाच्या स्थापनेच्या कामी सहकार्य करण्याबाबत पक्षाच्या सभासदत्वाचा प्रश्न विचारांत घेतला जात नाहीं. पक्ष हा आघाडीवर असतो आणि लोकाना मार्गदर्शन करतो. सोशॅलिस्ट समाज उभारण्याचें कार्य करण्यात फक्त पक्ष सभासदांनींच सामील व्हावे असें नाहीं. आम्ही नवीन सभासदाबद्दल फार सावध असतो. त्यांना आम्ही मोठ्या खबरदारीनें निवडतों. संख्येपेक्षां गुणाला आम्ही जास्त महत्त्व देतों.

**क्लीमन**—हें तुम्ही कसे घडवून आणतां ?

**एक्स्**—शालेय शिक्षणाचा दर्जा वाढविण्याची खटपट आम्ही करतो. आणि लोकांना औद्योगिक, आर्थिक व राज्यकारभारविषयक जागांसाठीं शिक्षण देतों, शेतकरीकामकऱ्यांच्या मुलांना शिक्षण देण्यासाठीं हल्लीं आम्ही प्रयत्नाची शिकस्त करीत आहों.

**क्लीमन**—मार्क्सिस्ट लेनिनिझम्‌चे शिक्षण कसे देतां ? तो अभ्यासक्रमाचा भाग असतो काय ?

**एक्स्**—होय, निश्चित. शाळेतील अभ्यासक्रमांत आर्थिक व राजकीय विभाग असतातच. देशाचा पट्वार्षिक कार्यक्रम स्थूल मानानें काय आहे हे ठाऊक नसणाराला खेड्यांतील सहकारी दुकानांत हिशेबनीस होतां येणार नाहीं. राष्ट्र कशासाठीं झटत आहे हें त्याला ठाऊक असले पाहिजे.

**क्लीमन्**—शेती सामुदायिक करण्याचें कार्य कितीसें पार पाडले ?

**एक्स्**—त्या बाबतींत आम्ही हळूहळू पाऊल टाकीत आहों. त्यांत तसाच

हेतु आहे. शेतकऱ्याची मानसिक तयारी करावी लागते. सक्ती करायची नाहीं. आता प्रयोगावस्था संपली असून यापुढे आम्ही जलद पाऊल टाकणार आहो.

**क्लीमन** — हल्लीं सामुदायिक शेते किती आहेत ?

**एक्स्** — आतांपावेतो आठशे सामुदायिक शेतें तयार केली आहेत पण देशांतील पिकाखालच्या जमिनीपैकीं १ टक्का जमीनहि सामुदायिक शेतांत अजून आली नाहीं. ही शेतें आदर्श म्हणून सरकार मजूर लावून व आधुनिक उपकरणें वापरून तयार करतें.

**क्लीमन्**—अमेरिका सोशॅलिस्ट होईल ?

**एक्स्**—ते मला माहीत नाही. होईलहि, पण केव्हां, हा प्रश्न महत्त्वाचा असून त्याचे उत्तर देण्याचा प्रयत्न हा निराधार तर्कटासारखा ठरेल.

या मुलाखतीतील कांहीं मुद्दे फार महत्त्वाचे आहेत. लोकसंख्या जेवढी मोठी तेवढे उत्पादन मोठें ही गोष्ट फक्त समाजवादांतच शक्य आहे. भारतांत लोकसंख्या हे संकट झाले आहे. मजूर व साहित्य उपलब्ध असले म्हणजे राष्ट्रीय धंद्यांना पैसारूपी भांडवल कोठून आणावें ही फिकीर नसते. साध्या हिशेबनीसालाहि सर्व राष्ट्राची पंचवार्षिक योजना शिकून घ्यावी लागते इतकें शिक्षणाचें महत्त्व समाजवादी घटनेंतच शक्य असून मागासलेलें राष्ट्र पुढारलेलें होण्यासाठीं सर्वच्या सर्व वेगानें झटू लागणें हेंहि समाजवादांतच शक्य होतें.

## रशियापासून धोका कितीसा ?

पण रशियाच्या व पूर्व युरोपीय राष्ट्रांच्या अंतर्गत परिस्थितीसंबंधानें व समाज तत्त्वासंबंधानें इतकें सर्व चांगले बोलूनहि रशियाचें परराष्ट्रीय धोरण भयानक वाटतें हे निस्संशय खरें आहे. रूसोजर्मन करार, पोलंड व फिन्लंड यांवरील रशियाच्या स्वाऱ्या, आणि त्यापेक्षाहि जागतिक कम्युनिस्ट चळवळीचें सर्वच देशांत दिसून येणारें पंचमदळी वर्तन ही लक्षांत घेतां रशियाचें परराष्ट्रीय धोरण बेभरवशाचें व भयानक आहे यांत शंका नाहीं. त्यापासून दोन धोके शक्य होतात. पहिला धोका आंतरराष्ट्रीय युद्ध रशिया जगावर आणील हा आणि दुसरा धोका पंचमदळी कम्युनिस्टांमार्फत परदेशांत अंतर्गत उलथापालथ घडवून आणील हा. हे धोके कितीसे संभवनीय आहेत ? तसेंच हे दोन धोके टाळण्यासाठीं अमेरिकेनें रशियाशीं युद्ध करण्याचा उपयोग कितीसा आहे ? कीं त्यापासून जगावर आणखी एकादें संकट येईल ?

वरील प्रश्नापैकीं आंतरराष्ट्रीय युद्ध रशिया जगावर आणील काय याचा विचार प्रथम करूं. रशियाला युद्ध नको आहे, निदान तें सध्यां नको आहे यांवर जवळ जवळ रशियाच्या शत्रुमित्रांत एकमत आहे. त्याचीं कारणें कांहीशीं उघड आहेत. युद्धे ही राजाच्या अथवा पराक्रमी पुरुषांच्या लहरीने अथवा चक्रवर्ती म्हणून घेण्याच्या ईर्षेने आता होत नाहीत. सर्व राष्ट्राची भौतिक शक्ति, इच्छा-शक्ति व दीर्घकालीन पूर्वतयारी याचा युद्धासाठी मेळ बसावा लागतो. जर्मनींत सत्ताधारी भांडवलदारवर्गाला युद्ध हवे झाले होते. कारण जर्मनीचे कारखानदारी सामर्थ्य अफाट वाढले आणि त्याला कच्चा माल व पक्का माल यासाठी हक्काचा बाजार हवा झाला. हा भांडवलदारांच्या नफ्याचा प्रश्न होता, त्यास त्यानी राष्ट्रीय हिताचे स्वरूप दिलें. कारण जनतेलाहि उद्योगधंदे वाढणे हे बेकारीनिवारणाचे दृष्टीने अवश्य वाटलें. यात मग राष्ट्रीय स्वाभिमान व साम्राज्यलोभ यांची भर पडली व जर्मन लोक युद्धाला तयार झाले. अमेरिकेन व खुद्द जर्मनीत जे शस्त्रास्त्रकारखानदार आहेत त्यानीं आपला धंदा वाढावा म्हणून जर्मनीला प्रक्षुब्ध करून शस्त्रास्त्रवाढ करण्यास उत्तेजन दिले. जगांतील भांडवलवादी, साम्राज्यवादी राष्ट्रानी साम्राज्यवादाचा शत्रु असा जो रशिया त्याला ठार करण्यासाठी जर्मनीला युद्धाचे कामीं भर घातली. या सर्व कारणानी जर्मनी युद्धास प्रवृत्त झाला. हीच सर्व कारणे जपान व इटाली यानाहि युद्धास प्रवृत्त करण्यास कारण झालीं. ॲंग्लो-फ्रेंचानीं गेल्या कित्येक शतकांत जी युद्धे केलीं तींहि आर्थिक स्पर्धेनेच केली.

रशियाचे बाबतींत यांतले एकहि कारण अस्तित्वांत नाहीं. स्वतः रशियाजवळ कच्चा माल भरपूर आहे. जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड ही राष्ट्रे स्वतः उद्योगप्रधान असल्यानें रशियाला ती जिंकणे फार महाग पडेल आणि जिंकल्यावर तेथेच कच्चा माल नसल्याने तीं आपल्या कह्यांत टिकविता येणार नाहीत व फायदेशीर करता येणार नाहीत. मध्य आशियांतील जंगले साफ करणें हे रशियास अधिक फायदेशीर पडेल. रशियांत शस्त्रास्त्रकारखाने व इतर सर्व कारखाने सरकारी मालकीत असून परराष्ट्रीय व्यापार सरकारच्या सर्वस्वी हाती असल्यानें कारखानदार आपल्या स्वार्थासाठीं युद्ध लढविील अशी परिस्थिति मुळींच नाहीं.

परराष्ट्रीय राजकारणांत सोव्हियट रशिया जो आक्रमक दिसतो त्याची

तीन महत्त्वाचीं कारणे आहेत. पहिले कारण स्वता रशियाला परचक्राची वाटणारी भीति हें होय. पहिल्या महायुद्धाच्या अखेरीपासून गेल्या तीसहि वर्षांत इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, इटाली, जर्मनी, जपान या सर्व राष्ट्रांनीं एकेकट्यानें व इतरांच्या साहाय्याने कोणत्या एका राष्ट्रांवर परचक्र आणण्याचा सतत प्रयत्न केला असेल तर तो रशियावरच केला. या पुस्तकांतील पहिल्या विभागात याच इतिहासाचा संक्षिप्त गोषवारा दिला असून त्याचा तपशीलवार इतिहास लिहिला तर तो पर्वतप्राय होईल. हा धोका टाळण्यासाठीं रशियानें जीं धोरणे अवलबिलीं तीं फिनलंड वगैरे कांहीं राष्ट्रांबाबत राक्षसी ठरली हे खरेच. पण दुसरे महायुद्ध संपल्यानंतर पूर्वयुरोपीय राष्ट्रांसंबंधानें रशियानें अवलंबिलेली धोरणे राक्षसी अथवा आक्रमक मुळींच नव्हतीं.

पूर्व युरोपातलीं हीं सर्व राष्ट्रे शतकानुशतकें सरजामशाहीकडून पिळलीं गेलेलीं आणि गेलीं शंभर वर्षें पाश्चात्य भांडवलदाराची आर्थिक गुलाम झालेलीं होतीं. त्यांची एकी न करता अथवा होऊं न देता पाश्चात्य भांडवलदारांनीं त्या त्या देशांतील सरजामदार वर्गाला आपल्या हातचे खेळणें बनवून त्या राष्ट्रांना आपसात व आपापल्या देशांत झुजत ठेवले व त्यांची आर्थिक लूट केली. अगदीं दुसरे महायुद्ध झाल्यावर दान्यूब खोऱ्यांत परकी भांडवलदारांना मुक्तद्वार असावें अशी मागणी सोशॅलिस्ट ब्रिटननेंहि केली होती. रशियानें या संकटापासून पूर्व युरोपीय राष्ट्रांना वाचविले, तेथल्या शेतकरी कामकऱ्यांना आर्थिक व राजकीय सत्ता मिळवून दिली आणि सोव्हिअट आर्थिक विकासाचीं तत्त्वे परिस्थितीप्रमाणें आपल्या आपल्या देशात अमलात आणून हीं राष्ट्रें आपला विकास करून घेत आहेत. हीं राष्ट्रे गुप्ततेच्या पोलादी तटबंदीमागे आहेत हे मान्य करून सुद्धां लंडन ' टाइम्स ' सारख्या पत्रांनीं त्या राष्ट्रांत जनतेच्या कर्तृत्वानें आर्थिक प्रगति झाल्याची कबूली दिली आहेच.

त्या राष्ट्रांत लोकशाही नाहीं म्हणजे पाश्चात्य राष्ट्रांत आहे अशी लोकशाही नाहीं इतकेच आणि हाहि रशियाचा अपराध नव्हे. तेथे अँग्लो-फ्रेंच वर्चस्व होतें त्यावेळीं लोकशाहीचें जें विडंबन होते व बहुसंख्य जनता नुसती दडपली जात होती त्या ऐवजीं आता तेथें सामान्य जनतेस लोकशाही आहे. तेथें नुसती राजकीय सागाड्याची लोकशाही नाहीं तर आर्थिक व सामाजिक अशी सर्वांगीण आहे. झेकोस्लोव्हाकियांत पाश्चात्य पद्धतीची लोकशाही होती ती नष्ट

झाली, त्याला कारणें घडली. पोलंड व ग्रीस या दोन ठिकाणीं खुल्या निवडणुकाचा जो अनुभव आला त्यावरून आणि म्युनिच करारावेळीं परक्यांचीं कारस्थानें केवढीं झालीं याची स्मृति बुझली नसल्यानें झेक कम्युनिस्टांनीं विरोधी पक्षाना निवडणुकाना बंदी केली. झेकांवर त्यावेळीं रशियाचें दडपण आले असे ट्रूमननें पुन्हा पुन्हा म्हटल्यानें ती गोष्ट खरी म्हणून सिद्ध होत नाहीं. उलट निवडणुकी होऊन दगली माजल्या असत्या तर रशियाचा हस्तक्षेप नक्की आला असता व मग पूर्वेकडूनच 'म्यूनिच' आले असते अथवा झेकोस्लोव्हिाकियावर युद्ध कोसळले असते. यामुळेंच झेक कम्युनिस्टांनीं विरोधकांविरुद्ध झटकन फास आवळला व त्यांच्या हालचाली खुटविल्या. त्याचे वर्तन दांडगाईचें झाले हें खरेंच, पण त्यानीं टाळलेले संकट फारच फार भयंकर होतें व त्यांनीं अवलबिलेल्या उपायाहून अधिक सौम्य उपाय झेकांना खास उपलब्ध नव्हता.

दार्दानेल्स, अझर बैजान वगैरे सर्व प्रकरणीं रशियाचें वर्तन निदान युद्ध टाळण्याचें दृष्टीनें योग्य असेच घडले आहे यांत शंका नाहीं. चीनबाबत अमेरिकेनें जे धोरण अवलबिले आहे व कम्युनिस्ट चीन हा रशियाचा गुलाम आहे वगैरे जो प्रचार अमेरिका करीत आहे त्यावरून अमेरिकेलाच युद्ध हवें आहे हें उघड होतें.

रशिया आक्रमक आहे अशी परराष्ट्रांना भीति वाटते याचें अधिक महत्त्वाचें कारण म्हणजे जे जे राष्ट्र कम्युनिस्ट होते त्याची कार्यक्षमता अचाट वाढते, त्याचें उत्पादनसामर्थ्य अफाट वाढते आणि त्याचें रणशौर्यहि अचाट वाढते हें होय. यामुळें साम्राज्यवादी राष्ट्रांना या कम्युनिस्ट राष्ट्रांची भीति वाटते व इतर राष्ट्रांतील वरिष्ठवर्गाना आपल्या देशांत असाच कम्युनिझम् माजला तर आपली धडगत नाहीं असा धाक वाटू लागतो. म्हणून युद्धासारखा कांहीं प्रकार घडून रशियाचाच मोड होईल, निदान परराष्ट्रांत कम्युनिस्टांना उत्तेजन देण्याचें रशियाचें धोरण तरी बंद पडेल अशी या वरिष्ठ वर्गांना आशा वाटत असते. म्हणून रशियाला व कम्युनिस्टांना शिव्या देऊन हे वर्ग अमेरिकेचा धावा करतात. अमेरिका ज्या राष्ट्रांत पाऊल टाकते तेथे तेथें वरिष्ठ व प्रतिगामी वर्गांना आश्रय देते याबद्दल आतां सर्वांची खात्री झाली आहे. कोरियांतील युद्धाबाबत हल्लीं जी घबराट सर्वत्र दिसते ती उत्तर कोरियानें युनोचा आज्ञाभंग केला

म्हणून नव्हे. इझराइलनें युनोचा आज्ञाभंग केला आणि काश्मीर व कोरिया या प्रकरणीं युनो ही अमेरिकेची बटीक आहे हे सिद्ध झालें आहे. पण घबराटीचे कारण कम्युनिस्टांची कार्यक्षमता हें होय. “ कम्युनिझम्‌चे हें अमृत अथवा ही दारू पिऊन दुर्बल मानवांचे शूर दानव बनतात तर येथे कम्युनिझम् आल्यावर आमचे कसे होईल ? ” ही सर्व देशांतल्या वरिष्ठ वर्गांना धडकी भरली आहे.

## रशियन धोरणांतील राक्षसीपणा

रशियाच्या आक्रमणाची भीति वाटण्याचें तिसरे कारण म्हणजे रशियन व इतर कम्युनिस्टांचें विरोधकावर राक्षसी दडपशाही करण्याचें धोरण व जागतिक कम्युनिस्टाचें पंचमदळी, दहशतवादी विध्वसक धोरण हें होय. हे कारण मात्र खरें व महत्त्वाचें आहे. त्यामुळें रशियन वर्चस्वांत जाण्याची पाळी येऊ नये व पंचमदळी विध्वंसक कम्युनिस्टांना यश येऊं नये हे इष्ट आहे. त्यासाठीं मुख्यत: भारतासारख्या प्रचंड पण मागसलेल्या राष्ट्रांनीं निकराचा प्रयत्न केला पाहिजे. पण हा प्रयत्न म्हणजे अमेरिकेचा धावा नव्हे. अमेरिका परराष्ट्रीय धोरणांत अत्यंत प्रतिगामी असून अमेरिकेच्या वर्चस्वाखालीं जाणाऱ्या राष्ट्रांत वरिष्ठवर्गांची सत्ता संभाळणें आणि कोणत्याहि सामाजिक बदलाला कम्युनिझम् म्हणून ठोकून काढणें हें जें अमेरिकेचें नवे परराष्ट्रीय धोरण आहे त्यामुळें अमेरिकेच्या वर्चस्वाखालीं जाणाऱ्या राष्ट्राची सामाजिक प्रगति थांबेल व त्यामुळेंच दलित जनतेच्या संतापांतून अत्याचारी कम्युनिझम् रशियाच्या मदतीनें उद्भवेल अशी भीति आहे.

याचा अर्थ सरळ असा आहे कीं अमेरिका अथवा रशिया यांपैकीं कोणाचेहि वर्चस्व स्वीकारणाऱ्या राष्ट्राला यापुढें आपल्या भूमीवर यादवी आणि रूसो-अमेरिकन युद्ध ओढवून घ्यावें लागेल. कोरियाच्या इतिहासानें जर कोणता बोध दिला असेल तर तो हा दिला असून इतर राष्ट्रांनीं आतां रशिया अथवा अमेरिका यांच्या वर्चस्वापासून अलग राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्यासाठीं आपापल्या देशांतले सामाजिक व आर्थिक प्रश्न शांततेच्या व सलोख्याच्या मार्गानें तांतडीनें सोडविले पाहिजेत. त्यास दिरंगाई केली अथवा त्यांत अत्याचार माजविले तर दलित जनतेच्या प्रक्षोभांतून यादवी निर्माण होईल आणि तेथेच

रूसोअमेरिकन युद्धाचे रणागण थाटेल. भारतानें हें संकट कसे टाळावे याचा विचार एका स्वतंत्र प्रकरणांत करायचा आहे. त्यापूर्वी अमेरिकेचें स्वरूप आणखी थोडें समजून घेऊ.

---

## : १० : अमेरिका कशी आहे

अमेरिकन राष्ट्राची (यू. एस्. ए.) लोकसंख्या जेमतेम १४ कोटींच्या आंत आहे. म्हणजे चीन, भारत व रशिया या तीन राष्ट्रांच्या एकेकट्या लोकसंख्येपेक्षाहि अमेरिकेची लोकसख्या पुष्कळ कमी आहे. पण अमेरिकन राष्ट्राचा मुलूख भारताच्या दुपटीपेक्षा मोठा असून तो अपार निसर्गसंपत्तीनें भरला आहे आणि आज अमेरिकन राष्ट्र जगातील कोणत्याहि राष्ट्रांपेक्षां अधिक धनाढ्य झाले आहे.

अमेरिकेची भूमि कोलंबसानें शोधून काढल्याला फक्त साडेचारशें वर्षेंच झालीं. तेथील मुळची वस्ती विरळ व अडाणी होती. तेथें प्रथम युरोपीयांची वसाहत लवकर लवकर झाली नाहीं. पण पुढें युरोपांतून हजारों लोक दरसाल सोन्याच्या शोधार्थ अमेरिका खंडांत जाऊं लागले. इंग्लंडांतील प्यूरिटन्स धार्मिक छळास कंटाळून अमेरिकेत वसाहतीस गेले व त्यांच्या मागोमाग युरोपांतील माणसें भराभर वसाहतीस जाऊं लागलीं. उत्तर अमेरिकेच्या मध्य भागांत इंग्रजांनीं वसाहत सुरू केली. प्रथम निरनिराळ्या वसाहती या निरनिराळीं राज्यें होतीं व त्यावर इंग्लंडचा अंमल होता. पण अठराव्या शतकाच्या शेवटीं या अमेरिकनांनीं इंग्लंडची सत्ता नष्ट करून आपलें स्वातंत्र्य मिळविलें व आपली पृथक पृथक राज्यें एकत्र करून 'युनाइटेड स्टेट्स् ऑफ् अमेरिका' (यू. एस्. ए.) हें राज्य स्थापन केलें. मराठींत यास 'अमेरिका' असें उल्लेखण्याची रूढि असून सबंध उत्तर व दक्षिण अमेरिकेचा उल्लेख करतांना अमेरिका खंड असा उल्लेख करण्यांत येतो.

अमेरिकेंत वसाहतीस गेलेले लोक एकजात धाडशी व कर्तबगार असून हा मुलूख निसर्गसंपत्तीनें अत्यंत समृद्ध होता. यामुळें अमेरिकनांनीं त्याचा विकास फार जलद केला. युरोपांतील अनेक राष्ट्रांचे लोक या अमेरिकेंत गेले तरी इंग्रजांची संख्या प्रथम तेथें मोठी असून इग्लंडची सत्ता तेथें होती यामुळें इंग्रजी भाषा हीच तेथें राष्ट्रभाषा म्हणून सर्वांनीं पत्करली आणि युरोपातील अनेकभाषी लोक तेथे गेले तरी एकाच इंग्रजी भाषेच्या आश्रयानें त्यांच्यात एकोपाहि निर्माण झाला व एक पराक्रमी राष्ट्र तेथें तयार झाले.

प्रथम पूर्व किनाऱ्याजवळ अवघीं १३ संस्थानें एकत्र झाली होतीं. त्यांची संख्या व प्रदेश वाढता वाढता आता अठ्ठेचाळीस संस्थानें झालीं असून पश्चि-मेस कॅलिफोर्नियाच्या किनाऱ्यापर्यंत अमेरिकन राष्ट्राचा प्रदेश पसरला आहे. अमेरिकेंतील निसर्गसंपत्ति अतिशय विपुल असून प्रथमपासूनच मजूर कमी पडत म्हणून मजूरीचे दर फार असत. संपत्तिहि खूप निर्माण होई. यामुळें एकंदर जनता जगांतील कोणत्याहि राष्ट्रांपेक्षां तेथे अधिक सधन आहे.

बाकीच्या जगापासून फार दूर आणि संपत्तीनें समृद्ध यामुळें अमेरिकन लोक बाहेरच्या जगासंबधानें बेफिकीर असत. अमेरिका खंडांतून ब्रिटनचें उच्चाटन झाल्यावर स्पेन वगैरे राष्ट्रांचेंहि तेथून उच्चाटन झाले. अमेरिकेचा एक अध्यक्ष मन्रो यानें अमेरिकेच्या उत्तर व दक्षिण खंडाकडे युरोपानें पाहू नये आणि अमेरिकन राष्ट्र आपल्या दोन खंडाबाहेरच्या युरोपीय जगाकडे पाहणार नाहीं असें धोरण जाहीर केलें. हें धोरण 'मन्रोडॉक्टरीन्' म्हणून प्रसिद्ध आहे. त्याप्रमाणें अमेरिकन राष्ट्रानें युरोपकडे चालू शतकाच्या आरंभापर्यंत लक्ष दिलें नाहीं. पण पासिफिकमधील अनेक बेटे व्यापून चीनच्या बाजारांत पाऊल टाकले. पहिल्या महायुद्धांत अमेरिकेनें ॲंग्लोफ्रेंचांच्या बाजूनें उडी घेतली. पण युद्ध संपून विजय मिळाल्यावर तहाच्या वाटाघाटींतून अमेरिकेनें अंग काढून घेतलें. त्यानंतर बावीस वर्षांनीं दुसऱ्या महायुद्धांत अमेरिका खेचली जाईपर्यंत अमेरिकेनें राजकीय दृष्टया युरोपकडे पाठच फिरविली होती.

## अमेरिकेचें अवस्थांतर

पण पहिल्या महायुद्धानें अमेरिकेच्या आर्थिक जीवनांत क्रांति होऊन युरो-पांत अमेरिकेचे आर्थिक हितसंबंध पुष्कळच निर्माण झाले. पहिल्या महायुद्धा-पूर्वी अमेरिकेंत परराष्ट्रांचं भांडवल खूप गुंतले होतें. परदेशांतून अनेक प्रकारचा

मालहि अमेरिका नेत असे. या दृष्टीनें अमेरिका हें पहिल्या महायुद्धापूर्वी ऋणको राष्ट्र होतें. पण त्या महायुद्धानें अमेरिकेचें हे स्वरूप बदललें. युरोपीयन राष्ट्रांना अमेरिकेनें युद्धासाठीं कर्ज दिलीं. युरोपला लागणारा विविध मालहि तयार करून आतां अमेरिका युरोप व इतर देश यांना पाठवू लागली आणि परदेशांतून माल खरेदी करण्याचे कमी कमी करण्यासाठीं अमेरिकेनें जकातीच्या भिंती उभारल्या. पहिल्या महायुद्धानंतर अमेरिकेच्या कर्जाची फेड करण्याचा जेव्हां प्रश्न उद्भवला तेव्हां अमेरिका मालाच्या रूपात कर्जफेड घेईना. यामुळे अमेरिकेला युरोपीय राष्ट्रांनीं अगदीं निरुपयोगी व्हावें इतकें सोनें देऊन टाकले. हे सगळे सोनें अमेरिकेनें एका तळघरांत ठेवून टाकले आहे. पहिल्या महायुद्धातलीं अनेक कर्जे अनेक राष्ट्रांनीं अमेरिकेचीं परतहि केलीं नाहींत. तरी पण अमेरिकेचें उत्पादनसामर्थ्य एवढें प्रचंड प्रमाणांत वाढत वाढले कीं युरोपला पुनर्घटनेसाठीं भरमसाट कर्जे देण्याचा सपाटा अमेरिकेनें चालविला. जर्मनीनें पहिल्या महायुद्धा-नंतर जी नुकसानभरपाई द्यायची होती ती जर्मनीनें अपूर्णच दिली व तीहि अमेरिकन कर्जांतून दिली.

१९२९ सालीं अमेरिकेन अनेक कंपन्या अकस्मात बुडाल्या व अमेरिकेवर आर्थिक संकट कोसळलें. अनेक कारखान्यांना टाळीं पडलीं, लक्षावधि लोक बेकार झाले. १९३३ सालीं रूझवेल्ट अधिकारावर आल्यावर त्यानें धनिकावर करवाढ करून मजूरांना पगारवाढ दिली, समाजसुधारणेचे अनेक कायदे केले व भांडवलशाही उत्पादनावर नियंत्रण घातलें. पण धनिक भांडवलदार वर्गानें रूझवेल्टच्या धोरणास ( न्यू डील धोरण ) निकरानें विरोध केला. धंद्यांत नवीन भांडवल येईनासें झालें. पुढें युरोपांत फॅसिस्ट राष्ट्रांच्या धोरणामुळें शस्त्रास्त्रवाढ होऊ लागली. यामुळें अमेरिकेचे शस्त्रास्त्रकारखाने सावरूं लागले. धंद्यांत भांडवल येऊं लागलें, मजूरांना रोजगारी मिळू लागली. दुसरें महायुद्ध हें अमेरिकेला वैभवगंगेसारखेंच झालें. प्रथम अमेरिकेनें रोखीनेंच युरोपीयाना माल विकला. यामुळें जगांतलें सोनें तर अमेरिकेकडे गेलेच, पण इंग्लंडसारख्या राष्ट्रांचीं सारीं वैभवें अमेरिकेकडे वाहून गेलीं. खरोखर हिटलरनें विध्वंसानें इंग्लंडचें नुकसान केलें त्यापेक्षा अमेरिकेनें रोख विक्रीनें इंग्लंडला अधिक निपटून घेतलें असून आतां अमेरिकन कर्जाच्या सागरात इग्लंडादि राष्ट्रें गळ्यापर्यंत बुडालीं आहेत. युद्धकाळांत रोखीनें माल

खरीदणें युरोपीय राष्ट्रांना अशक्य झाल्यावर अमेरिकेनें उधार-उसनवार पद्धतीने युरोपला माल पुरवला. पुढे युद्ध संपल्यानतर मागे उल्लेखिलेल्या मार्शल योजनेअन्वये अमेरिका युरोपला आता कर्ज देत आहे.

पण पहिल्या महायुद्धानंतर अमेरिकेनें युरोपीय राजकारणातून अंग काढून घेतलें तसें मात्र यावेळीं केले नाहीं. आतां युरोपीय राष्ट्रांना कर्जाच्या जाळयांत बांधून घेऊन अमेरिकेने युरोपीय राष्ट्रांच्या परराष्ट्रीय राजकारणाचीं सूत्रे आपल्या हातांत घेतलीं इतकेंच नव्हे; तर त्याच्या अंतर्गत राजकारणांत हस्तक्षेप करून मंत्रिमंडळांची घडामोड करण्याइतकी शक्तिहि अमेरिका युरोपीय व इतर राष्ट्रांवर चालवीत आहे. रशियाची अंतर्गत समाजघटना आर्थिक दृष्ट्या पुष्कळ चांगली असली तरी रशियाची व रशियाच्या वर्चस्वाखालील राष्ट्रांची राजवट दडपशाहीवर आधारलेली असते, तसेंच रशियाचें परराष्ट्रधोरण चढाईखोर, पुष्कळदां तत्त्वशून्य आणि उग्र असते असें आपण पाहिले आहे. पण अमेरिकेचे परराष्ट्र धोरण कसे असते हेंहि आतांपर्यंत अनेक उदाहरणांनीं आपण पाहिले आहे. हें धोरण असें कां आहे हें समजून घेण्यासाठीं आपण अमेरिकेच्या अंतर्गत परिस्थितीची येथे थोडी माहिती करून घेऊ.

## अंतर्गत अमेरिका

अमेरिकेंत निसर्गसंपत्ति विपुल व त्या मानानें मजूरांचाच तुटवडा यामुळे मजूर वर्गास तेथे मजूरी भरपूर मिळाली व एकंदर संपत्ति देशांत खूप वाढल्यामुळे त्या संपत्तींतला मोठा वाटा मजूरांना मिळत गेला. यामुळे कामगारांना आपल्या हक्कासाठीं संघटना करण्याची कधीं जरूरच वाटली नाहीं. इतकेंच नव्हे तर भांडवलशाही समाजघटनेंतले दोष त्यांना कधींच दिसले नाहींत व ही समाजघटना नैसर्गिक असावी असेंच बहुसंख्य कामगारवर्गाचे धोरण राहिले आहे. अमेरिकेंत ' अमेरिकन फेडरेशन ऑफ् लेबर ' आणि ' कॉंग्रेस ऑफ् इंडस्ट्रिअल ऑर्गनायझेशन्स ' अशा दोन प्रचंड कामगारसंघटना आहेत. त्यांतील फेडरेशन तर इतकें प्रतिगामी आहे कीं रूझवेल्टच्या ' न्यूडील 'लाहि त्याचा विरोध होता. कॉंग्रेस ऑफ् इंडस्ट्रिअल ऑर्गनायझेशन ही संस्था कामगारहिताचे बाबतींत थोडा जहालपणा दाखविते, पण भांडवलशाहीला विरोध हें तत्त्व तिलाहि मान्य नाहीं. खाणकामगाराचा पुढारी लेविस हा तर कोणत्याहि पुरोगामी धोरणाविरुद्ध असून फक्त भांडवलदारांच्या भांडणांचा फायदा घेऊन

आपलें कामगारांतलें प्रभुत्व टिकवितो. कामगारवर्ग आपले काम, आपला पगार, प्रपंच, खेळ, आरोग्य, मजा यापलीकडे राष्ट्रीय राजकारण, अर्थकारण यांकडे मुळींच पहात नाहीं आणि अर्थात देशाच्या परराष्ट्रधोरणाबद्दल तर तो बेफिकीरच आहे.

इंग्लंडच्या राजकारणांत मजूरपक्ष निर्माण झाला व त्यानें सोशॅलिस्ट ध्येय अंगिकारले आहे, तर अमेरिकन मजूर राजकीय अथवा आर्थिक ध्येयाबाबत संपूर्ण गाफीलच आहे. अमेरिकेंत डेमोक्रॅट व रिपब्लिकन असे दोन राजकीय पक्ष आहेत. त्यांच्याहि ध्येयनिष्ठेत काहीं फरक नाहीं. भांडवलशाही ही नैसर्गिक समाजव्यवस्था आहे अशाच धोरणाने ते चालतात. रूझवेल्टनें श्रीमंतावर कर-वाढ करून समाजसुधारणेचे कायदे केले व धद्यावर नियत्रणें घातलीं, पण भांडवलशाहीच नष्ट केली पाहिजे हे ब्रिटिश मजूरपक्षाचे जे ध्येय आहे ते रूझवेल्टच्या ध्येयनिष्ठेत कधींच आलेले नाहीं. महायुद्ध संपताच भांडवलदारांनी धद्यावरील सर्व नियंत्रणें अशक्य करून टाकलीं आहेत. रिपब्लिकन व डेमोक्रॅट या दोनहि पक्षांत पुरोगामी व प्रतिगामी विचाराचे लोक आहेतच. जी डी. एच् कोल सांगतो,

"एकंदरीनें विल्सन आणि रूझवेल्ट यांच्या अंगचे थोर सद्गुण आणि त्यांनीं हाताळलेली बिकट परिस्थिति यामुळे अलीकडील काळात त्याचा जो डेमोक्रॅटिक पक्ष तो पुरोगामी आहे असें मानले जाते. तसेच एकंदरीनें रिपब्लिकन पक्ष हा बड्या भांडवलदारांचा पक्षपाती व अनियंत्रित आर्थिक धोरणाचा पुरस्कर्ता असें मानलें जातें. पण या रिपब्लिकन पक्षाच्या पोटांत एक मोठा पुरोगामी गट आहे व उलट डेमोक्रॅटिक पक्षांत एक मोठा प्रतिगामी ( सदर्न डेमोक्रॅट ) गटहि आहे. आणि आपले अनुयायी विरुद्ध पक्षास जातील या भीतीनें, पक्षपुढाऱ्यांना आपल्या अनुयायांच्या मतांचा विचार न करता त्यांना आर्जवानें वागविल्यावांचून मार्ग नसतो."

या सर्व गोष्टी लक्षांत घेतां अमेरिकन राष्ट्र हे सधन, कर्तबगार पण तत्त्वशून्य धनिकांचें राष्ट्र आहे हे लक्षांत येते. जोंवर तें राष्ट्र युरोपकडे पाठ फिरवून राही तोंवर त्याची फारशी फिकीर कोणीं केली नाहीं, पण आतां युरोपकडे त्यानें तोंड फिरविले व त्यानें युरोपला आपल्या पकडींतच बसविलें आहे. म्हणून त्याच्या अंतर्गत राजकारणाकडे युरोपीयांना व जगाला निरखून

पहावें लागत आहे. अमेरिकेला परराष्ट्रीय राजकारणाचा दीर्घ अनुभव कांहींही नाहीं; परराष्ट्रराजकारणांतलीं संकटें अमेरिकेला कधींच कळलीं नाहींत. अमेरिका परराष्ट्रराजकारणांत पडली ती एकदम शिरजोरच झाली. अमेरिकन मुत्सद्यांना तत्त्वनिष्ठा कांहींहि नाहीं आणि तेथील सामान्य जनता स्वदेशाच्या व परदेशाच्या राजकारणाबद्दल बेफिकीर असते. यामुळें राजकारण माहितहि नसणाऱ्या मूठभर बड्या धनिकांच्या हातीं अमेरिकेचें सारें राजकारण असते. या धनिकांना सारे जग पैसा गुंतविण्याला अपुरें वाटते, भांडवलशाहीला होणारा कोणताहि विरोध हा त्यांना शत्रुवत् वाटतो आणि सोशॅलिझम्‌चा सौम्य प्रकार व तीव्र प्रकार असा फरक न करतां भांडवलशाहीचे सर्व विरोधक सोव्हिएटपक्षपाती आहेत, सोव्हिएट तत्त्वज्ञान व सोव्हिअट अर्थशास्त्र हें अमानुष आहे आणि सोव्हिअट रशियाला जेथें तेथें अडवून मागें हटविलें ठोकले, तरच आपली व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारलेली समाजव्यवस्था टिकेल व तीच जगांत पसरण्यायोग्य आहे असें अमेरिकेस वाटतें. खुद्द इंग्लंडांतील सोशॅलिझम् अमेरिकेला कम्युनिझम् इतकाच वावडा आहे.

उलट सोव्हिअट रशियाचा भांडवलशाहीस व साम्राज्यशाहीस तितकाच निकराचा विरोध आहे. या दोनहि राष्ट्रांत प्रचंड उत्पादनपद्धतीचें वेड असून राहणीच्या तत्त्वज्ञानांत मात्र तीव्र शत्रुत्व आहे. एकमेकांची राहणी जगभर उध्वस्त करण्याची यानीं कंबर बांधली असून या दोन एडक्यांच्या टक्करींत जग सापडलें आहे. रशिया आणि अमेरिका यांच्या या साम्यविरोधाचे जी. डी. एच्. कोलने फार सुंदरपणें पुढील शब्दांत वर्णन केले आहे. कोल लिहितो,

“या मुद्यावर थोडा अधिक विचार करणें इष्ट आहे आर्थिक दृष्टीने पाहतां सोव्हिअट रशियावरहि ‘अमेरिक्यानिझम्’चे वर्चस्व असल्याचें आढळून येईल. कारण अमेरिकन अर्थसंघटनेचीं अनेक लक्षणें रशियन अर्थसंघटनेंत दिसून येतात. भव्य आणि दणकेबाज जे असेल त्यावर श्रद्धा, भौतिक उत्कर्षावर श्रद्धा, बडी बढाईखोर भाषा, या गोष्टी रशिया व अमेरिका यांना सामान्य आहेत. मला एका अमेरिकन हॉटेलची एक जाहिरात मिळाली. तींत लिहिलें होतें कीं ‘जगांतील कोणत्याहि हॉटेलापेक्षा आम्ही अधिक साबण खर्च करतों.’ रशियांत साबण भरपूर होऊं लागला म्हणजे तेथें बरोबर अशीच हॉटेलाची जाहिरात केली

जाईल अशी माझी कल्पना वाहते. पण आर्थिक बाबतींत हे साम्य जसें स्पष्ट आहे तसाच राजकीय बाबतींतला या दोन राष्ट्रांतला विरोधहि जाणवल्यावाचून राहात नाहीं. राजकारणाबाबत दोघांत एकच साम्य आहे ते हें कीं, दोघेहि आपल्या तात्त्विक विरोधकांविरुद्ध ( नॉनकन्फॉर्मिस्ट ) धिक्कार धिक्कार ओरडतील आणि कांहीं विशिष्ट परिस्थितींत त्याचे खून पाडण्यासहि कमी करणार नाहींत. पण अमेरिकन राजकीय जीवन तेथील पुढाऱ्यांनीं लोकमतास तात्त्विक वळण लावण्यावर आधारलेले नसून लोकमताबरोबर पुढाऱ्यांनीं वाहावत जावें यावर ते आधारले आहे. उलट सोव्हिअट रशियाची राजकीय संघटना कम्युनिस्ट पक्षाच्या शिस्तबद्ध नेतृत्वावर आधारलेली असून आपल्या नियंत्रणाखालीं जी मते बनलेलीं नाहीत अथवा ज्या मतांना आपली संमति नाहीं त्या मताकडे मुळींच लक्ष न देणे हे रशियन समाजघटनेचें वैशिष्ट्य आहे. अर्थात ज्या अमेरिकन लोकमताबरोबर पुढारी वाहावत जातात ते अमेरिकन लोकमत स्वतत्र अथवा अनियंत्रित असते असें मात्र नव्हे. कारखान्यांत जसा माल बनविला जातो तसेंच हें लोकमतहि ‘ बनविलेले ’ असते. आणि हें बनविण्यांत पैशाचा भाग फार मोठा असतो. पण रशियात ज्याप्रमाणे स्वतां सत्ताधारी पक्षानें हे लोकमत बनविलेले असते. तसे अमेरिकेत बनविले न जाता सरकारहून भिन्न अशा अर्थशक्तींनीं हे लोकमत बनविलेले असते. म्हणून ते मत ‘ स्वतंत्र ’ आहे असें दिसते. हें लोकमत अमेरिकेचा पुढारी आदर्श मानतो आणि सामान्य जनतेच्या जीवनांत सरकारनें थोडाहि हस्तक्षेप केल्यास तो त्याला आक्षेपार्ह आणि सशयास्पद वाटतो. ”

या अमेरिकन जीवनपद्धतीवर अमेरिकनांची नितांत निष्ठा असून परक्याकडे ते कांहींशा तुच्छतेने व परकीपणाने पाहतात. कोल पुढें लिहितो,

“ या अमेरिकन जीवनावर अमेरिकनांची श्रद्धा असल्यामुळें त्याच चष्म्यांतून परराष्ट्रें व परकी लोक यांकडे ते पाहतात. ज्याना आयुष्यांत यश आलें आहे त्यांना आपणास यश देणारी जीवनपद्धति हीच श्रेष्ठ असें वाटतें. यशस्वी राष्ट्रांनीं असेच वागावे हें स्वाभाविकच आहे. १९३० सालीं अमेरिकन आर्थिक संघटनेस मोठा धक्का बसला आणि तींतील अस्थिरता फार खोलवर गेली; तरीपण अमेरिकनांना धनसंपादनाच्या कलेंत अतोनात यश आलें आहे. आणि एकुणिसाव्या शतकांतील इंग्रजाला ‘ आमच्यासारखे तुम्ही वागत नाहीं

हे तुमचें वर्तन अगदीं गैर आहे' असे परक्यांना बजावण्याची खोड होती तशीच खोड आज अमेरिकनांना लागलेली आहे. सगळेच इंग्रज पूर्वी येथें असे नव्हते व सगळेच अमेरिकन आज असे नाहींत हे खरे. पण. अमेरिकन सरकारच्या घोषणा आणि अमेरिकन सरकारचे इतगशी वागणें यांत हा अहंकाराचा दर्प दिसून येतो खास. विशेषतः व्यापाराची धोरणें व राज्यपद्धति याच्या चर्चा चालतात तेथे अमेरिकन्स असेच वागतात. व्यापारीसंबंधाविषयीं चर्चा सुरू असल्या म्हणजे 'जकाती या योग्यच आहेत' असा सिद्धांत अमेरिकन माडतात. कारण त्यांच्या देशांत जकाती आहेत. पण इतर राष्ट्रांनीं आंतरराष्ट्रीय व्यापाराची योजना जर आंखली तर मात्र 'पक्षपात' 'पक्षपात' 'आर्थिक नियमांचा निर्बुद्ध भंग' अशी हेटाळणी ते करतात. अमेरिकनांजवळ इतके सोने आहे कीं त्याचे काय करावे हे त्यांना कळतच नाहीं. आणि यामुळें चलनाचे सुवर्णमान हेंच श्रेष्ठ होय असे त्याचे मत असून याबद्दल शंका घेणारा गुन्हेगार होय असें ते मानतात. जशा अमेरिकेन पक्षसघटना आहेत तशाच इतर जगांत असल्या पाहिजेत असें अमेरिकनांचे ठाम मत असते आणि आपल्या पद्धतीहून भिन्न असणारी कोणतीहि पद्धति ही 'लोकशाहीविरोधी' आहे असा सिद्धान ते ठोकून देतात. आपलें वर्तन ते पुण्य व इतरांचे तें पातक असें मानण्याची पद्धति इतर राष्ट्रांतहि आहे हें मी मान्य करतों. पण माझ्या मतें अमेरिकनांच्या अंगीं हा दोप दृढपणें शिरला आहे. शिवाय त्याचे प्रचंड सामर्थ्य आम्हांला जाणवतें म्हणून त्याबरोबरच त्यांचा हा दोषहि आम्हांला जाणवतो. एरवी अमेरिकन सरकार कसें वागते व काय करते याची आम्हीं परवा केली नसती. अर्थात रशियनापेक्षा अमेरिकनाची आत्मप्रौढी अधिक आहे असें मी म्हणत नाहीं. कारण अमेरिकनांपेक्षांहि अधिक दृढतेनें रशियनाचें असें मत आहे कीं प्रत्येकाने आपले नेतृत्वच स्वीकारले पाहिजे आणि जो कोणीं असें न करील तो आपल्याविरुद्ध कट करतो आहे असेंच ते समजतात. पण माझे म्हणणें एवढेंच कीं कम्युनिस्टांची प्रौढी एका ध्येयनिष्ठेवर व धोरणावर आधारलेली असून ज्यांची ही ध्येयनिष्ठा असते त्यांना जगावर हीच ध्येयनिष्ठा राज्य करील अशी खात्री तरी वाटत असते. अमेरिकेची प्रौढी नेमकी कशावर आधारलेली आहे हे कळतच नाहीं. 'अमेरिकन जीवना'चा आधार 'भांडवलदारांच्या साहजवाजीवर श्रद्धा' एवढाच नसेल तर त्यांचे ध्येय अथवा धोरण तत्त्वस्वरू-

पात कोठेंच मांडलेले नाहीं. आणि आम्ही बिगरअमेरिकन असे जे जगांतले पापी, अभागी लोक त्यांनीं आपले जीवन कसे सुधारावे याचा आदेश अमेरिकनांकडून काहींहि मिळत नाहीं. अमेरिकन राजकीय धोरण हे फारसें कार्यक्रमात्मक नसून तो नाक फुगऊन केलेला नुसता भव्य फुसफुसाट असतो."

अशी ही अमेरिका आज कशी वागत आहे ? दार्दानेल्समध्यें रशियाला अडविते पण दान्यूबखोऱ्यांत भांडवलशाहीला वाव नाहीं हे तिला रशियाचें पाप वाटते, ग्रीसमध्ये प्रतिगामी राजाला गादीवर बसवून अमेरिका लोकशाहीचा खून करते, इटाली व फ्रान्स यांवर मंत्रिमंडळें बनविण्यासाठी हुकुमशाही चालविते, आणि पूर्व युरोपांत रशियाच्या मदतीने शेतकरीकामकरी अधिकारावर आले तर अमेरिकेला ती हुकुमशाही वाटते, इसराईलने युनोचा आदेश झुगारून अरबांच्या घरांतून अरबांना हुसकून लावले, त्यांच्या कत्तली केल्या तर अमेरिकेला शांतताभंग झालासें वाटत नाहीं, पण उत्तर कोरियनांनीं आपल्या देशाची कृत्रिम फाळणी रद्द करून घेण्यासाठीं शस्त्र उचलले तर अमेरिका निरपराध नागरिकांच्या घरादारावर हजारो टन बॉंब टाकते आणि कोट्यवधि चिनी लोकांना आपत्तीत टाकणारे व त्यांना नको असणारे सरकार त्यांच्यावर शस्त्रबलानें लादूं पहाते. रशिया व अमेरिका या दोघांपुढेहि जगाचें कांही चालत नाहीं. अमेरिका व रशिया यांच्या परराष्ट्रीय राजकारणाचीं जीं धोरणें दिसून येत आहेत त्यांमध्यें सांपडून चेंगरून जाणे एवढाच भोगवटा जगापुढें आहे. मग जगाने काय करावें ? कोल म्हणतो, "या दोघांनाही, 'आम्हांला तुमच्या भांडणांत पडायचे नाही. आणि आम्ही स्वावलंबनानें आमचें जीवन आम्ही कंठू इच्छितों व कटू शकतों' हें बजावून सागणें हा येथे उपाय आहे." भारतानें ही गोष्ट कशी करावी याचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

---

## : ११ : भारतानें कसें वागावें

आंतरराष्ट्रीय राजकारणाचा विचार करण्याची जी जुनी पद्धति आहे तीप्रमाणें पाहता या पुस्तकांतील विषय संपल्यासारखा आहे. राष्ट्राराष्ट्रांचीं सरकारें

एकमेकांसंबंधानें कोणतें धोरण ठेवतात, युद्धें, आक्रमणें, तह, कसे, कां, केव्हां करतात वगैरे सांगावें, त्या लिखाणास चविष्टपणा येण्यासाठीं गुप्त हेरांच्या हाल-चाली, शस्त्रास्त्रांचीं वर्णनें आणि मुत्सद्यांच्या जीवनांतली खाजगी कुलंगडीं सांगून 'असें हें जग आहे' असा शेरा मारावा व वाचकास टाळ्या पिटण्यास सुचवावें म्हणजे तीच परराष्ट्रीय राजकारणाची चर्चा असें मानण्याचा सनातन प्रघात आहे. या पुस्तकांतला दृष्टिकोन या प्रघाताहून मूलतः भिन्न आहे. राष्ट्रा-राष्ट्रांच्या सरकारांचे जे संबंध असतात ते केवळ तीं सरकारें व त्या राष्ट्रांच्या सीमा येथें संपत नसून एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राशीं संबंध ठेवतांना त्या दुसऱ्या राष्ट्राच्या अंतर्गत समाजजीवनासंबंधानें विशिष्ट अपेक्षा ठेवतें व घडामोड करतें हा दृष्टिकोन ही या पुस्तकांतील चर्चेची मध्यवर्ती भूमिका आहे.

## परराष्ट्र धोरणांचें वैशिष्ट्य

इंग्लंड व अमेरिका यांना दार्दानेल्स व पूर्वभूमध्य समुद्र यांत रशियानें शिरणें हें धोक्याचें वाटतें. पण त्यासाठीं पूर्व भूमध्य समुद्रांत अमेरिकेनें फक्त आपलीं युद्धदळें आणून ठेवण्यानें अमेरिकेचें व ब्रिटनचें समाधान होत नाहीं. तर पूर्व भूमध्य समुद्राच्या दृष्टीनें नाक्याचा असा जो ग्रीस देश त्याचीं राजकीय धोरणें आपणांस अनुकूल असलीं पाहिजेत अशी काळजी अमेरिका घेते. ग्रीसचीं हीं राजकीय धोरणें अमेरिकेस अनुकूल केव्हां असूं शकतील? ग्रीसमध्यें अमेरिकेच्या वर्चस्वास अनुकूल अशा वर्गाचें सरकार असेल तरच ग्रीसचें धोरण अमेरिकेस अनुकूल असेल. ग्रीसमध्यें शेतकरी-कामकरी व सामान्य जनता यांची लोकशाही असेल तर ती भांडवलदार व सरजाम-दार यांच्या वर्चस्वास वाव देणार नाहीं आणि ती लोकशाही ग्रीक कम्युनिस्टांच्या व कम्युनिस्ट रशियाच्या वर्चस्वास वाव देणारी असेल. निदान ती अमेरिकन भांडवलशाहीच्या वर्चस्वास अनुकूल असणें असंभवनीय असल्यानें अमेरिके-विरुद्ध रशियाची मदत मागण्याची प्रवृत्ति तीमध्यें राहील. ही ग्रीक लोकशाही कांहीं वर्षें तरी दुर्बल राहणार असल्यानें तिला जर अमेरिकन वर्चस्वाखालीं जायचें नसेल तर ती रशियन वर्चस्वाखालीं जाणारच, इत्यादि कयास बांधून अमेरिका ग्रीसच्या अंतर्गत राजकारणांत हस्तक्षेप करते व तेथें लोकशाही प्रवृत्तींना दडपून टाकून प्रतिगामी प्रवृत्तींना अधिकारावर बसवितें. अमेरिकेचें इटाली, फ्रान्स, चीन वगैरे सर्व परराष्ट्रांशीं जें धोरण आहे त्यांत त्या त्या

परराष्ट्रांच्या अंतर्गत समाजघटनेत हस्तक्षेप करून तेथे तेथे आपणांस अनुकूल अशी समाजघटना निर्मिण्याची ही प्रवृत्ति दिसून येते.

उलट रशिया परराष्ट्राशीं जे संबध ठेवतो तेथेंहि अंतर्गत समाजघटनेंत हस्तक्षेप करून आपणास अनुकूल अशी अंतर्गत समाजघटना तेथे निर्माण करण्याचा प्रयत्न करतोच. अमेरिकेचें अंतर्गत जीवन आपण पाहिले. त्यांत बहुसंख्य जनता राष्ट्रीय राजकारणाबद्दल व अर्थकारणाबद्दल बेफिकीर असून साम्राज्यलोभी भांडवलदारांच्या हातीं सत्ता राहू देण्यास राजी आहे. हे साम्राज्यलोभी भांडवलदार आपले वाढते भांडवल परराष्ट्रांत सुरक्षितपणे गुतलें जाऊन वेगाने वाढीस लागावे अशी तरतूद करूं चाहतात. त्यासाठीं ग्रीसमध्ये राजा, सरजामी वर्ग व भांडवलदार आपणास अनुकुल आहेत असे पाहून त्या वर्गास सत्ताधारी करतात, इटालींत व फ्रान्समध्यें भांडवलदार वर्गास सत्तारूढ करतात, इग्लडांतहि मजूर पक्ष अधिकारावर राहू नये तर चर्चिल पक्ष अधिकारावर यावा अशी खटपट अमेरिकन सरकार करते.

ब्रिटिश मजूर पक्षास, तो सोशॅलिस्ट असल्यानें ग्रीसमध्यें राजा व व सरजामदार याचे प्राबल्य माजावे हें मनापासून आवडत नाहीं. पण इग्लं-डांत मजूर पक्ष अधिकारावर असला व तो सोशॅलिस्टहि असला तरी त्याला आपल्या देशाचे जिणें परराष्ट्रीय व्यापारावर चालवावें लागतें. इंग्लंडात अन्न पुरेसें नाहीं, धंद्यास कच्चा माल पुरेसा नाहीं. या वस्तु परदेशांतून खात्रीने मिळवायच्या तर अमेरिका अथवा रशियांसारख्या परदेशांशीं संबंध ठेवला पाहिजे. आणि हीं परराष्ट्रे बलवान असल्यामुळे त्यांच्या वर्चस्वाखालींहि थोडें फार गेले पाहिजे. मग कोणाच्या वर्चस्वाखाली ब्रिटनने जावें असा विचार करतां अमेरिकन वर्चस्व स्वीकारणे हेच ब्रिटनला व्यवहार्य वाटते, कारण इग्लंडांत मजूरपक्ष अधिकारावर असला तरी भांडवलदार वर्ग प्रबळ असून राजकारण उभयपक्षांच्या तडजोडीने चालते. अर्थात् भांडवलदारांना दुखवून रशियाला अनुकूल असें वागण्याचे धारिष्ट ब्रिटिश मजूर पक्षास होत नाहीं. इंग्लंड आणि रशियाचा वर्चस्वप्रदेश असलेला पूर्वयुरोप यामध्ये भाडवलशाही राष्ट्रें असून तीं अमेरिकन वर्चस्वाखालीं असल्याने रशियाशीं प्रत्यक्ष सहकार्य व स्नेहसंबंध ब्रिटिश मजूर सरकार ठेवूं शकत नाहीं. आणि जगाच्या सर्व व्यापारमार्गावर अमेरिकेचेंच प्रभुत्व असल्यानें ब्रिटिश मजूरपक्षास अमेरिकेच्याच तंत्रानें आपलें परराष्ट्रीय धोरण चालवावें लागतें. म्हणून ग्रीसबाबतचें धोरण अमेरिकेच्या हातीं

सोपविताना ब्रिटिश मजूरपक्षाने अमेरिकन वर्चस्वाला अनुकूल अशा प्रतिगामी पक्षाचे हातीं सत्ता सोपवून तेथून पाय काढला.

भारत हे ब्रिटिश मजूरपक्षाला व्यापारासाठी अवश्य होतें. पण ब्रिटनमधील भांडवल परदेशात गुतवून इग्लडचे उद्योगधदे उपाशी मारावे आणि तेथे बेकारी माजवून ब्रिटिश भाडवलदारानी परदेशात गुतविलेल्या भाडवलाच्या ननरख्यावर मजा माराव्या हे ब्रिटिश साम्राज्यवाद्याचे धोरण ब्रिटिश मजूर-पक्षास पसत नव्हते. म्हणून ब्रिटिश मजूरपक्षाने हळुहळू साम्राज्यत्याग करण्याचें धोरण अवलबून भारतास स्वातत्र्य दिले व आपला माल भारतात खपवून चहा वगैरे भारतीय पदार्थ आपणास मिळावें यासाठी भारताशी बरोबरीच्या नात्याचा स्नेह ठेवला. याप्रमाणे ब्रिटिश मजूरपक्षाचे भारतविषयक धोरण भारतावरील साम्राज्य नष्ट करून एकप्रकारें इग्लडात अंतर्गत राजकीय क्रांति करणारेंच झाले असे म्हणावें लागते.

सागण्याचा मुद्दा असा कीं राष्ट्राराष्ट्राच्या सरकाराचे जे सबध असतात ते केवळ त्या त्या राष्ट्राच्या सरहद्दीबाहेर भिडणारेच नसतात तर त्या त्या राष्ट्राच्या अंतर्गत सामाजिक व राजकीय परिस्थितीवर त्याचा क्रातिकारक परिणाम घडत असतो व तशी अपेक्षाहि असते. याच दृष्टीने मुख्यतः रशिया व अमेरिका याच्या परराष्ट्रीय धोरणाचें सिंहावलोकन या पुस्तकात केलें आहे. त्यावरून दिसून येतें की या दोन राष्ट्रापैकी प्रत्येकाची इच्छा परराष्ट्रावर पकड ठेऊन आपल्याला अनुकूल अशी समाजघटना तेथे निर्माण करणें ही आहे, आणिं एकमेकास जगात मागें हटविण्याच्या याच्या ईर्षेत साऱ्या जगाला युद्धाच्या धोक्यांत घालणें हें या दोघाच्याहि परराष्ट्रीय धोरणाचें लक्षण दिसत आहे. अमेरिका परराष्ट्रात निर्माण करते ती समाजघटना प्रतिगामीच असते. पण रशिया जी समाजघटना निर्माण करतो ती पुरोगामी असली तरी रशिया व रशियाच्या वर्चस्वानें निर्माण होणारी सरकारे कठोर, सक्तीची व जुलमी धोरणें अमलात आणतात. रशियाच्या स्वार्थास योग्य वाटलें तर तो पुरोगामी सरकाराचा आश्रय काढून घेऊन त्यांना तोंडघशींहि पाडतो. फिन्लंडसाठीं एक कम्युनिस्ट सरकार रशियाने तयार केलें, त्याची जाहिरात खूप केली पण पुढें त्याचें नावहि कोठे ऐकू आलें नाहीं. अझरबैजानमधील कम्युनिस्टाना प्रथम पाठिंबा देऊन नंतर त्याने असेंच सोडून दिले आणि इराणातल्या जुलमी

गजवटीला त्याचे बलिदान झाले. हिंदुस्तान, मल[illegible] कम्युनिस्टानीं कत्तली, जाळपोळी आणि अत्याचार याचें धोरण अवलबिले असून जगातले सर्व कम्युनिस्ट आतरराष्ट्रीय आणीबाणीच्या प्रसगी आपापल्या देशात, रशियाच्या हितासाठी, देशद्रोही भूमिका घेतात. म्हणून रशियाने काही परदेशात आपल्या वर्चस्वाखाली पुरोगामी राजवटी स्थापल्या असल्या तरी रशियाचें एकदरीनें घरात आणि परदेशात दिसून येणारे धोरण जुलमी, दडपशाहीचें व उग्र असते आणि आपल्या स्वार्थासाठी परराष्ट्राचें कोणतेहि अहित करण्याची त्याची प्रवृत्ति असते असा अनुभव येतो.

रशिया व अमेरिका या दोन्ही राष्ट्रान्या परराष्ट्रीय धोरणांतील या प्रवृत्ति पाहिल्या म्हणजे त्या दोहोपासून अलग व स्वतत्र राहण्याचें धोरणच भारता-सारख्या राष्ट्रानें अवलबावे हे योग्य ठरते. पण असे स्वतंत्र परराष्ट्रधोरण अवलबण्यासाठींहि आपली अतर्गत समाजघटना कशी असावी आणि हल्लीची घटना बदलताना कोणते मार्ग अवलबावे याचा विचार अवश्य करावा लागतो. उदाहरणार्थ भाडवलदार, जमिनदार याच्या वर्चस्वाची समाजघटना येथें राहील तर जनतेच्या आपत्ति वाढतील, जनता प्रतिकार करून अस्व-स्थता निर्माण करील आणि मग वरिष्ठ वर्ग अमेरिकेला मदतीला बोलावतील व त्यामुळें कम्युनिस्टाच्या बोलावण्यानें अथवा स्वताच्या ईर्षेनें रशिया येथें हस्तक्षेप करील. त्याचा परिणाम या देशात यादवी आणि आतरराष्ट्रीय महा-युद्ध माजण्यात होईल. उलट कम्युनिस्टाचीं विध्वंसक धोरणें कम्युनिस्टानीं अथवा इतर पक्षानी अवलबिलीं तरी वरील सर्व दुष्परिणाम घडून येतील. म्हणून या देशात शेतकरी, कामकरी व मध्यमवर्ग याची समाजवादी सत्ता स्थापन होणें हे आवश्यक असून ही क्राति घडवून आणण्याचे आपले मार्ग शाततेचे व अंतर्गत सलोख्याचे असणें अवश्य आहे. तरच अमेरिका व रशिया या दोघानाहि येथल्या परिस्थितींत हस्तक्षेप करण्यास अवसर न मिळता स्वतत्रपणें भारत बलवान व प्रगतिपर होण्यास संधि मिळेल.

ही विचारसरणी समजून घेण्यास तयार व अमलात आणण्यास काहींसे पात्र असे वर्ग, गट येथे कोणते आहेत ? एका टोकास बडे भाडवलदार आहेत, ते मदतीसाठी अमेरिकेकडेच पाहणार आणि त्याना शक्य झाले तर अमेरिकेचा हस्तक्षेप ते येथे बोलावणार हें उघड आहे. दुसऱ्या टोकाला कम्युनिस्टपक्ष आहे.

तो रशियन परराष्ट्रधोरणाचा बंदा गुलाम आहे. त्याचें धोरण रशियाच्या परराष्ट्र-धोरणापासून स्वतंत्र असण्याचा मुळींच संभव नसून कम्युनिस्ट पक्ष भारताला यादवींत व महायुद्धांतच खेचील. या दोन टोकाच्या दरम्यान काँग्रेस पक्ष व सोशॅलिस्ट पक्ष हे दोन पक्ष असून सर्वसामान्य जनता याच्या भोवती घोटाळत आहे पक्ष या नात्याने सोशॅलिस्ट पक्ष हा अजून बराच लहान आहे व काँग्रेसशी त्याची तुलनाच होऊ शकत नाही असें कोणी म्हणेल. वरवर पाहता तें खरेंहि वाटते. पण येथे जरा सूक्ष्म पाहिले पाहिजे. काँग्रेसपक्ष हा सत्ताधारी असल्यामुळे काँग्रेसच्या मूळ क्रांतिकारक धोरणास विरोधी व अड-विणारा फार मोठा वर्ग काँग्रेसमध्ये घुसला असून काँग्रेसला त्यामुळे अवास्तव फुगवट आली आहे. हा काँग्रेसमध्ये घुसलेला प्रचंड प्रतिगामी गट जर वगळला तर तळमळीच्या काँग्रेसजनाचे गट देशभर पसरले आहेत, पण ते एकदरीनें आज दिसणाऱ्या फुगलेल्या काँग्रेसमध्ये फार लहान प्रमाणातच आहेत. उलट सोशॅलिस्ट पक्ष आज जरी लहान असला तरी देशात सोशॅलिस्ट प्रवृत्ति वाढत असून तीमुळे एक तर काँग्रेसच वेगाने सोशॅलिझमकडे जाईल अथवा ते न घडलें तर सोशॅलिस्ट पक्षाचे बळ वाढेल. या दोन पक्षांत मतभेद कितीहि तीव्र असले तरी शांततेच्या व शक्य तो सलोख्याच्या मार्गाने प्रगति करावी ही या दोन पक्षाची समान भूमिका आहे असें त्याच्या त्याच्या काही धोरणावरून आणि त्यातील प्रमुख पुढाऱ्यांच्या बोलण्यावरून तरी वाटते. तें खोटें ठरल्यास काँग्रेस ही भांडवलशाहीची बटीक होईल आणि सोशॅलिस्ट हे कम्युनिस्ट होऊन येथे यादवी व महायुद्ध कोसळेल.

पण ज्याना ही परिणति नको असेल त्यानीं शांततेच्या व सलोख्याच्या मार्गाने येथील राजकारणाची प्रगति करण्याचा प्रयत्न करावा हेच योग्य. या बाबतींत आज पूर्ण निराशा आहे असे काँग्रेस पक्षाच्या धोरणाकडे पाहून मानणारा फार मोठा वर्ग देशात आहे. काँग्रेस पक्ष हाच येथे सत्ताधारी असून आणखी कांहीं वर्षें तरी दुसरा पक्ष सत्ताधारी होण्याचा संभव नसल्यानें काँग्रेस पक्षाबद्दल निराशा वाटली तर येथें शांतता व सलोखा हे प्रगतीचे मार्ग नव्हेत हें कांहीं काँग्रेसविरोधकांचें व कांहीं काँग्रेसवाल्याचें म्हणणें खरें ठरेल. ' देशाची आर्थिक परिस्थिति वाईट आहे, पण निराशाजनक नाहीं ' हें श्री. चिंतामण देशमुख यांनीं केलेलें सद्यःस्थितीचें वर्णन विशिष्ट अर्थानें खरें आहे. येथे

आर्थिक परिस्थिति व मानवी संघटना या दोन गोष्टींचा प्रामुख्यानें विचार करावा लागतो. राजकीय पक्षांनी योग्य धोरणें अवलंबिलीं तर आजच्या बिकट परिस्थितीतूनहि मार्ग निघू शकेल. पण राजकीय पक्ष जर चुकीच्या रस्त्यानें जातील तर अत्याचारी स्फोट होण्यासारखी आर्थिक दुःस्थिति आज खास आहे पैकीं राजकीय पक्षाच्या धोरणाचा विचार करण्यापूर्वी आज आपण कोणत्या आर्थिक परिस्थितीत आहों हे येथें प्रथम पाहूं.

## भारताची आर्थिक परिस्थिति

हिंदुस्तान स्वतंत्र झाल्यापासून फाळणी, दंगल, लक्षावधि लोकांचें स्थलांतर विध्वंस, अत्याचार, काश्मिर हैदराबाद यासारखे आंतरराष्ट्रीय महत्त्वाचे बिकट प्रश्न, इत्यादि राजकीय घडामोडींनीं वातावरण प्रक्षुब्ध होऊन गेलें आहे. एक राजकीय प्रश्न सोडविण्यास हात घालावा तों दहा राजकीय प्रश्न उभे राहतात आणि चिखलांतून एक पाय काढतांना दुसरा अधिकच खोलांत रुततो तसा प्रकार येथें होत आहे. पण खरोखर या राजकीय प्रश्नापेक्षां आर्थिक प्रश्न हे अधिक महत्त्वाचे आहेत. राजकीय प्रश्न हे तांतडीनें सोडविण्याचेच प्रश्न आहेत आणि आर्थिक प्रश्न तांतडीनें सोडविता येण्याजोगे नाहींतच हें खरें. म्हणून राजकीय प्रश्नाकडे सरकारनें प्रथम लक्ष घालावें हेहि स्वाभाविकच होय. पण जोंवर आर्थिक प्रश्न आजपासूनच सुटण्याच्या मार्गास लागणार नाहींत तोंवर राजकीय प्रश्न कायमचे सुटण्याची आशाच व्यर्थ आहे.

सरकारलाहि हे दिसत नाहीं असें नाहीं. राजकीय प्रश्न तांतडीनें सोडवितांना आर्थिक प्रश्नहि सरकार तितक्याच तांतडीनें सोडविण्यासाठीं झटत आहे. धान्य-वाटप, निरनिराळ्या मालाचीं नियंत्रणें, भावनियंत्रण, आयातनिर्यातनियंत्रण, पगारवाढ महागाईभत्ते बोनस वगैरेसंबंधीचे कायदे व हुकुम, संप औद्योगिक तह यासंबंधीचे करारमदार, कायदे हे सर्व खटाटोप सरकार आर्थिक परिस्थिति सुधारण्यासाठींच करीत आहे. पण आर्थिक दुखणें हें बऱ्याच अंशीं मूलग्राही आहे. ज्याप्रमाणें राजकीय स्वातंत्र्याचा मूलग्राही प्रश्न सुटला नव्हता तोंवर इतर राजकीय व आर्थिक प्रश्न सुटले नव्हते, सोडविता येणेंच शक्य नव्हतें त्याप्रमाणें आजच्या आर्थिक प्रश्नाचें मूलगामी स्वरूप समजून घेऊन तें सोडविण्याचा मूलगामी प्रयत्न केल्यावाचून हे आर्थिक प्रश्न सुटण्याची आशा नाहीं. पण आज राजकीय प्रश्नाचा आवाजच एवढा मोठा होत आहे कीं

आर्थिक प्रश्नाचें मूलग्राही स्वरूप समजून घेतले पाहिजे या गोष्टीकडे कोणाचे फारसें लक्षच जात नाहीं.

मालाचें उत्पादन अधिक वाढले पाहिजे, देश सर्व बाजूनीं मागासलेला आहे त्याच्या उत्पादनपद्धति सुधारल्यावाचून त्याची सर्वांगीण प्रगति होणार नाही, हें सर्वांना कळले आहे. तसेंच उत्पन्न धनाची वाटणी नेहमी न्याय्य प्रमाणात होत राहिल्याशिवाय उत्पादनाच्या कामी शेतकरी. कामकरी, मध्यमवर्ग याचे साहाय्य मिळणार नाहीं हेंहि पुढाऱ्याना ठाऊक आहे. म्हणून उत्पादन वाढविण्यासाठीं कामगारकारखानदार याचे कलह न होता सहकार्य व्हावें म्हणून सरकार दोन्ही पक्षाना जवळ आणण्याचा प्रयत्न करीत आहे. संप व अडथळे याना बंदी घालीत आहे त्याचबरोबर कामगाराना अधिक वेतन, महागाईभत्ता, नफ्यातील भागी वगैरे कारखानदाराकडून कामगाराना सक्तीनें देवबीत आहे. मालकमजूर तंटे झटपट निकालात निघण्यासाठीं औद्योगिक कोर्टें सरकारनें स्थापन केलीं आहेत. याप्रमाणें कामगार व कारखानदार याचे पूर्ण व सतत सहकार्य घडवून आणावे यासाठीं दोघानाहि खूष करण्याचा प्रयत्न सुरु आहे.

शेतीच्या क्षेत्रांत उत्पादनाची वाढ आणि उत्पन्न धनाची अधिक समान वाटणी करण्याचे प्रयत्न सुरू आहेत. मुंबई राज्यात शेतकऱ्यांना जमीनवहिवाटीचे हक्क देऊन मालकी हक्कामुळें जमीनीबद्दल वाटणारे ममत्व शेतकऱ्याच्या ठिकाणी निर्माण व्हावे असे प्रयत्न करण्यात येत आहेत. यामुळे शेतकरी जमीनीवर अधिक मेहनत करतील अशी सरकारला अपेक्षा आहे. शेतकऱ्यांचीं कर्जें कमी करून त्याना सावकाराच्या पाशांतून मुक्त करणें, बींबियाण्यासाठीं, जमीन सुधारण्यासाठीं शेतकऱ्याला मदत करणें त्याला धान्याचा भाव यावा यासाठीं बाजाराचें नियंत्रण करणें, कुळालाच मालकानें जमिनी विकाव्या असा नियम करणें आणि शेवटीं शेतकऱ्यांना जमिनदाराच्या जमिनी विकत मिळण्याची सोय करणें इत्यादि सर्व मार्ग सरकार अवलंबीत आहे.

देशातील सर्व खेड्यांत व शहरात हाती सोडगा घेऊन पचाहत्तर टक्के व्याजाची सावकारी करणारा सावकार साफ नष्ट झाला, इतर सावकाराना लगाम बसला, कूळकायद्यानें जमीनींच्या किमतीं उतरून कोर्टांतले जमीनीचे दावे १० टक्केहि उरले नाहींत व वकील बेकार झाले हीं सर्व सरकारच्या धोरणाचींच मधुर फळें आहेत.

वरील प्रयत्नामुळें हळुहळू का होईना पण उत्पादनाची वाढ होत आहे. स्वातंत्र्य मिळाल्यापासूनच्या थोड्या काळात राजकर्त्यांनीं हे सर्व प्रयत्न बऱ्याच निकराने केले. गेल्या दीडशे वर्षांच्या परकी अमदानींत लोकहिताचीं कामे इतपत तत्परतेने व तातडीनें कधीच झाली नाहींत. पण लोकांचें याने समाधान झालेले नाहीं, लोक इंग्रजाना शिव्या देत नसत इतक्या कॉंग्रेस सरकाराना देतात. सर्वकडे लाचलुचपत, अव्यवस्था अतीशय वाढली आहे, हें खरे. पण कॉंग्रेसपुढाऱ्यानी आपणाकडून प्रयत्नाची शिकस्त केली नाहीं असा याचा अर्थ नव्हे. आजच्या जगाकडे नजर टाकली असता साऱ्या जगांतल्या बहुतेक राष्ट्रांतले राज्यकर्ते असे फसताना दिसत आहेत. सर्वकडे जनतेंत असतोष आहेच. जगाच्या एकंदर प्रकृतीत काही मूलग्राही खळबळ निर्माण झाली आहे. पण प्रचलित राज्यकर्त्याना रूढ उपाययोजनाहून मूलग्राही असे उपाय माहीत नसतात, त्यांचा त्याविषयींचा अभ्यास अथवा विचार झालेला नसतो. प्रचलित समाजव्यवस्थेत त्याचे वैयक्तिक व सामुदायिक हितसंबंध गुंतलेले असतात. ती समाजव्यवस्था मोडली तर आपला व समाजाचा सर्वस्वी नाश होईल अशी त्यास भीति वाटत असते. म्हणून रूढ जुजबी उपाय अमलात आणताना प्रचलित राज्यकर्ते कळकळीने कामे करीत असले तरी क्रातिकारक उपायाकडे दुर्लक्ष करतात व त्याचा प्रतिकारहि करतात. पण राष्ट्राच्या जीवनात मूलग्राही बिघाड झालेला असल्याने जुजबी दुरुस्ती करण्यात राज्यकर्त्यांना जुजबी उपायानीं यश येत नाहीं. तेथें मूलग्राही विचारच व्हावा लागतो. ते अडलेले प्रश्न क्रातीनेच सुटतात. हिंदुस्तान या अवस्थेतून सध्यां जात आहे.

आजच्या जुजबी उपायानीं थोडीशी उत्पादनवाढ आणि संपत्तीची थोडी अधिक समान वाटणी झाली तरी ही प्रगति लवकरच खुंटणें अपरिहार्य आहे. दुसऱ्या महायुद्धानतरच्या आर्थिक परिस्थितीचें थोडेसें अवलोकन केले असता ही गोष्ट सहज लक्षात येते. येथे प्रचड कारखानदारीचें उत्पादन आहे तें भांडवलशाही पद्धतीचें आहे. म्हणजे येथले प्रचड कारखाने खाजगी भांडवलवाल्या मालकाच्या हाती आहेत. त्याना नफा मिळत गेला तरच ते कारखाने उत्साहाने चालवितील व त्यामुळेंच कामगाराना रोजगार मिळेल, देशाला मालाचा पुरवठा होईल व एकंदरीने देशाचा आर्थिक उत्कर्ष होत राहील. कारखानदारांना कारखाने चालविण्यास उत्साह राहील तरच हें सर्व

घडेल. म्हणून कारखानदाराविरुद्ध संप करणें अथवा त्यांच्या कारखानदारीस कोणतेंहि अडथळे आणणें हे सरकारला पसंत नाहीं. ही खाजगी भांडवलशाही रद्द करून समाजसत्ता स्थापन करू पाहणारे जे पंथ आहेत ते भांडवलदारांना अडवून, त्यांच्या नफेबाजीत विघ्न आणून भांडवलशाही हाणून पाडण्याचे प्रयत्न करतात. या क्रमात उत्पादन घटतें, मालमत्तेची नासाडी होते आणि कामगार व कारखानदार यांचे दरम्यान नेहमीं वर्गकलहाची परिस्थिति राहते. पण यानें समाजसत्ता पुढें कधीं स्थापन होवो अथवा न होवो, नजिकच्या काळात उत्पादन घटतें, आर्थिक प्रगति खुटते आणि राष्ट्र अंतः-कलहानें दुर्बल होतें, म्हणून वर्गकलहानें समाजव्यवहार न चालविता वर्ग-समन्वयानें म्हणजे सर्व लोकांच्या व वर्गांच्या हितास व उत्कर्षास कारण होईल अशा प्रकारें प्रगति करावी असें कॉंग्रेस पुढाऱ्याचें म्हणजेच आजच्या राज्यकर्त्यांचें मत आहे. वर्गविग्रहानें आज प्रगति होईल की नाही हा प्रश्न तूर्त बाजूस ठेवू. पण वर्गसमन्वयाने तरी आज प्रगति होईल का ? हा प्रश्न विचारात घेतला पाहिजे.

कामगार व कारखानदार या दोन्ही वर्गांचा उत्कर्ष कारखानदारी चालू राहिली तरच होणार. कारखानदाराच्या मालकी हक्कास धक्का न लावता त्याची नफेबाजी चालू राहिली तरच तो कारखाने चालविणार. नफा हा फक्त एका विशिष्ट परिस्थितींतच मिळत राहतो. ती परिस्थिति कोणती ? भांडवलदारवर्ग यंत्रें खरेदी करतो. कच्चा माल खरेदी करून मजूर कामावर नेमतो. या सर्वांसाठीं भांडवलदार जो पैसा वाटत असतो त्याच पैशानीं भांडवल-दारानें उत्पन्न केलेला माल ते ते लोक खरेदी करतात. या सर्व पैशाच्या किंमतीइतकाच माल हे लोक खरेदी करतात. पण भांडवल-दारानें आणखी अधिक माल तयार केलेला असतो. तो विकण्यास त्याला परदेशचे बाजार शोधावे लागतात. अशा बाजारांत माल खपून जो नवा पैसा उभा राहतो तो भांडवलदाराचा नफा. इंग्लंड, अमेरिका यांसारख्या राष्ट्रांनीं बाकीच्या मागसलेल्या जगांचे बाजार पूर्वी काबीज केले व आपल्या भांडवलशाही उत्पादनाची भरभराट केली. पण हिंदुस्तानसारख्या स्वतांच मागसलेल्या राष्ट्रांतील भांडवलदारांना आतां पुढारलेल्या राष्ट्रांच्या टापेखालून नवे बाजार मिळणें कठिण झालें आहे. युद्धकाळांत उत्पादन खूप करण्यांत

आले, त्यामुळे यंत्रसामुग्री झिजली, जागोजाग नादुरुस्त झाली. पण युरोप-अमेरिकेकडून नवी यंत्रसामुग्री मिळत नाहीं अथवा दुरुस्तीचीं साधनें पुरविलीं जात नाहींत, अशा परिस्थितींत अधिक माल उत्पन्न करण्यास भाडवलदाराना उत्साह नाहीं आणि कारखानदारींत आमूलाग्र सुधारणा करणेंहि सध्या शक्य नाहीं. यामुळें कामगारानीं संप अथवा अडथळे निर्माण न करता अगदीं कसोशीनें काम करायचें ठरविले तरी कारखानदार अधिक माल उत्पन्न करण्यास अनुकूल परिस्थिति कारखान्यात निर्माण करूच शकत नाहींत.

शिवाय, उत्पादन कमी करणें हेच सद्यस्थितींत त्याच्या फायद्याचें व्हावे असें एक नवे अर्थशास्त्र त्याना दिसू लागले आहे. महायुद्धानें कारखानदाराना एकत्र यावे लागले. मालाला मागणी अफाट आल्यामुळें त्याची आपसातील चढाओढ थांबली व त्याचें परस्पर संघटन व सहकार्य सुरू झालें. यामुळें चढाओढीऐवजीं सहकार्य हे फायदेशीर आहे हे त्यास सध्या पटले आहे. आता ते चढाओढीनें माल निर्माण न करता सर्वजण मिळून बाजाराच्या गरजेपेक्षा कमी माल निर्माण करतात. समजा, हिंदी बाजाराला आठशें कोटि वार कापड हवें असलें व कापडगिरण्यानी दहाशें कोटि वार कापड काढले तर गिरण्यागिरण्यात चढाओढ लागून कापडाचे भाव उतरतील व कारखानदाराना नफा उरणारच नाहीं. उलट नुकसान येऊन काहीं गिरण्याचा धंदाहि बुडेल. पण आठशें वारा ऐवजीं सर्व गिरण्यानीं मिळून सहाशें वारच कापड काढलें तर ? तर मग गिऱ्हाइकाना पुरेसें कापड न मिळाल्यामुळे गिऱ्हाइकागिऱ्हाइकात चढाओढ लागून कापडाचे भाव चढतील व सहाशें कोटि वार कापडाला बाराशें कोटि वाराची किंमत येऊन कापडगिरण्याना शंभर टक्के फायदा होईल. म्हणजे नवे विदेशी बाजार मिळत नाहींत व नवीन यंत्रसामुग्री मिळत नाहीं अशा आजच्या काळीं धंदेवाल्यानीं एकजुटीनें वागून बाजाराच्या गरजेपेक्षा कमी उत्पादन करण्यातच भांडवलदाराना नफा मिळणें शक्य आहे. हेच ते नवें टंचाईचें अर्थशास्त्र होय.

अशा परिस्थितींत कापडधंद्यांतील खाजगी भांडवलदार सरकारनें व कामगारानीं कितीहि खटाटोप केले व सहकार्य दिलें तरी अधिक उत्पादन करणारच नाहींत. याच्यावर अधिक उत्पादनाची सक्ती होण्यासारखी परिस्थिति,

याना येथल्याच बाजारात जेव्हा विदेशी मालाशी चढाओढ करण्याची पाळी येईल तेव्हाच उत्पन्न होईल. म्हणून हिंदुस्तानातील भांडवलदाराना वठणीवर आणण्यासाठी आपण परदेशी भांडवलदाराना येथें बोलावले पाहिजे. पेशव्यांचे राज्य त्रासदायक झाले म्हणून ज्याप्रमाणे इंग्रजाचे राज्य हिंदी लोकानीं पत्करले त्याप्रमाणें देशी भांडवलदाराच्या नफेबाजींतून सुटण्यासाठीं हिंदी लोकानीं विदेशी भांडवलदाराची गुलामगिरी पत्करली पाहिजे. असा विपरीत प्रसंग येथे आहे. सारांश सध्या अथवा पुढेंहि खाजगी कारखानदारी-मार्फत येथे उत्पादनाची वाढ होणें अशक्य आहे हे यावरून लक्षात येते.

शेतीच्या क्षेत्रात याहून अधिक उत्साहजनक परिस्थिति मुळींच नाही. महायुद्धाने स्वदेशी कारखानदारीस जसा अफाट फायदा झाला तसाच शेतीसहि झाला. महायुद्धापूर्वीच्या आठ वर्षांत धान्याचे भाव उतरून शेतकरी कर्ज-बाजारी झाले होते, कित्येकाच्या जमिनी गहाण पडल्या, कैकानी विकून टाकल्या, सोनें विकून टाकले, घरेदारे विकलीं अथवा गहाण टाकलीं. पण महायुद्धाने हा सारा प्रवाह उलटा झाला. शेतकऱ्याना सोनें पुन्हा खरेदी करता आले नाहीं तथापि त्यानीं गहाण पडलेलीं घरेदारे, जमिनी सोडवून घेतल्या. जमीन नसणाऱ्यानीं जमिनी खरेदीहि केल्या. पण शेतकऱ्याना आलेली ही सुबत्ता टिकाऊ ठरणारी नव्हे. कारण त्याने शेतीची कायमची सुधारणा होण्याचा संभव नाहीं. शेतीच्या मालाला युद्धकाळात बरकत आली, पण त्यामुळेंच शेतींतून पिके काढकाढून तिचा पिकाऊपणा साफ पिळून काढण्यात आला आहे. लांब मुदतीची टिकाऊ दुरुस्ती आता शेतीची होईल तरच तिचा पिकाऊपणा वाढेल. लाकडाला अफाट भाव आल्यामुळें झाडें खूप तोडलीं गेली, त्याजागी नवीं झाडें लावलीं गेलीं नाहींत. त्यामुळें जमीनींची माती वाहून जाते, झाड-पाल्याचें खत जमिनीस मिळत नाहीं. जमिनींचीं पातळी झाडे काढल्यामुळे बदलते, त्यामुळें पाणी व माती वाहून जाऊन पुन्हा पुन्हा पातळी बदलते व जमिनी नापीक होतात. अलीकडे झाडे लावण्याचे 'दिन' पाळले जातात. पण दुसऱ्या 'दिना' वेळीं पहिल्या 'दिना' चीं झाडे फार थोडीं जिवंत असतात. विहिरींचा उपसा खूप झाला, पण त्यांची दुरुस्ती होणें जरूर आहे. जमिनींना उंची खतें घातलीं पाहिजेत. नांगर, इतर अवजारें, बैल वगैरे शेतकऱ्याजवळ मुबलक असले पाहिजे.

खरोखर युद्धानें शेतकऱ्यास जो पैसा दिला त्याचा शेतीसाठीं भांडवल म्हणून उपयोग करून वरील सर्व तरतुदी करणें सहज शक्य होईल. पण यांतील फारसें कांहीं होत नाहीं, होणार नाहीं असा अनुभव येत आहे आणि याचें कारण अगदी स्वाभाविक आहे. आज शेतीची दुरुस्ती करावयाची म्हटलें तर कांहीं वर्षे तरी सालोसाल भांडवल घालावें लागेल. पण अशा प्रकारें शेतीत भांडवल गुंतवून पीक वाढविलें तर भविष्यकाळी पिकाला आजच्यासारखा भाव येईल अशी मुळीच खात्री नाही. सरकारच्या नियंत्रणाबाबतच्या धोरणात गेल्या तीन वर्षांत इतकी चचलता दिसून आली आहे व हें धोरण व्यापाऱ्यांच्या इतकें आहारी गेलें आहे की लोकांना सरकारच्या धोरणाबद्दल दीर्घकालीन विश्वास वाटत नाही. अमेरिका, ऑस्ट्रेलिया, कॅनडा व अर्जेंटायना हे जगातले फार मोठे गहूंप्रदेश असून त्याचें पीक एकसारखें वाढत आहे. त्यांचा गहूं हिंदुस्तानांत मोठ्या प्रमाणात येऊं शकेल तर येथल्या धान्याचे भाव भराभर उतरतील ही भीति दूरकाळची पण खास खरी आहे. दुसऱ्या महायुद्धापूर्वीं पंजाबच्या गव्हासंबधानें बसलेल्या एका कमिटीनें "ऑस्ट्रेलियाचा गहूं येथें इतका स्वस्त मिळतो आहे की आता येथल्या गव्हावर अधिक भांडवल खर्चून त्याचें पीक वाढविण्याची गरज नाही" अशा आशयाचें मत दिलें होतें. विदेशी धान्याचे भाव भरमसाट उतरले तर येथें ते धान्य येऊन आमच्या धान्याशी चढाओढ करणार नाही कशावरून ? यामुळें शेतीत पैसा गुंतविण्यास कोणास उत्साह वाटत नाही.

सरकारनें लोकहिताचे म्हणून जे कायदे केले त्यांनींहि शेतीस प्रथम अपायच केला आहे. शेतकऱ्यानीं मध्यम वर्गाची कर्जें परत केलीं. यामुळें मध्यम वर्गाच्या हातींहि पैसा आला. पण हा पैसा परत शेतींत गुंतविण्यास हा सावकार वर्ग तयार नाहीं. कूळ कायदा, सावकारी नियंत्रण कायदा, कर्जनिवारण कायदा वगैरेमुळे शेतकऱ्यास कर्जें देणें अथवा जमीन खरेदी करून तींत भांडवल गुंतविणें हें मध्यम वर्गाला आज भरवशाचें वाटत नाहीं. म्हणून मध्यम वर्ग बिगरशेतीव्यवसायात पैसा गुंतवूं पहात आहे. शेतमालाला बाजारभाव आल्यामुळें शेतकऱ्याच्या हातीं पैसा खूप आला. पण चाळणींत घातलेल्या पाण्याप्रमाणें सहस्र वाटांनीं त्यांचा पैसा वाहून गेला व जात आहे. शेतकरी अडाणी आहे. परंपरागत शेती करण्याहून अधिक सुधारणा करण्याबाबत त्याला संघटित मार्ग-

दर्शन व साहाय्य इतकेंच नव्हे तर सक्तीहि केल्यावाचून तो अधिक सुधारलेली शेती करू शकणार नाहीं व त्यासाठीं भांडवल कसें वापरावे हे त्यास कळणार नाहीं. अशा स्थितीत शेतकऱ्याजवळचा पैसा इतर सर्व महाग वस्तु खरीदण्यासाठी खर्चला जातो आहे आणि हातीं पैसा आहे तोवर वस्तु कितीहि महाग असली तरी शेतकरी खरेदी थांबवीत नाही. तो जीवनावश्यक वस्तु तर घेतोच, चैनीच्याहि घेतो आणि उरला सुरला पैसा व्यसनात उडवून टाकतो. तंबाखू व बागाईत जमीन यापासून शेतकऱ्याना दमपट पैसा मिळाला, पण हे सारे शेतकरी पुन्हा कफल्लकचे कफल्लक आहेत. त्याच्याजवळ पैसा शिल्लक नाहीं आणि शेतीच्या सुधारणेचा विचार कोणीच करीत नाहीं.

त्यातल्या त्यात बागाईत शेतीचे मालक हे सुधारलेले, विचारी, दूरदर्शी, संघटितपणें शेती करणारे असतात. ते बागाईत शेतीत पैसा घालीत आहेत. त्यांच्याहि मालाचे भाव उद्या उतरतील ही भीति त्याना आहेच. पण मुंबई राज्य घेतलें तर बागाईत शेती जेमतेम पाचसहा टक्के आहे, बाकीची जोंधळा, बाजरी वगैरे पिकांची जमीन सुधारण्याचे प्रयत्न त्या जमिनीचे मालक जे अडाणी शेतकरी ते मुळींच करणार नाहीत. यामुळे शेतीव्यवसायाच्या आजच्या स्थितीत उत्पादनाची वाढ ही जवळजवळ अशक्य आहे.

या मूलग्राही परिस्थितीचा विचार न करता कॉंग्रेस पुढारी ‘उत्पादन वाढवा’ ‘उत्पादन वाढवा’ अशा घोषणा शेतकरीकामकऱ्यांपुढें करीत आहेत. कारखाने हे कारखानदाराच्या मालकींत असले तरच ते चांगल्या प्रकारें चालवितील आणि कामगारानीं मनापासून काम केले तर उत्पादन खास वाढेल असें मत पुढारी मांडीत आहेत. कामगार विरुद्ध कारखानदार, जमीनमालक विरुद्ध शेतकरी असा वर्गकलह उत्पादनवाढीस घातक असून त्यामुळें सामाजिक अनर्थ ओढवेल म्हणून सर्वांचा उत्कर्ष ऊर्फ सर्वोदय या तत्त्वाचा पुरस्कार हे पुढारी करीत आहेत. पण त्याना वर्गकलह मुळींच टाळता आलेला नाही. कुळकायदा झाल्यामुळें मालक व कुळें यात कलह माजला आहेच. श्रीमंत लोक शेतकऱ्याना आता कर्ज देत नाहींत यामुळें श्रीमंताच्या संपत्तीचा द्वेष गरीब लोक अधिकच करूं लागले आहेत. कामगाराची पगारवाढ, भत्तावाढ वगैरेंची कारखानदारावर सक्ती होऊ लागल्यामुळें कारखानदारवर्ग चिडला असून कामगाराना चिडविण्यासाठीं तो रोज नव्या

नव्या क्लृप्त्या योजतो आहे. तो कामगाराच्या जिवावर जास्तींत जास्त नफा मिळविण्यासाठी कामगाराना राबविण्याच्या नव्या नव्या युक्त्या काढतो, त्यामुळे कामगार बेजार होतो आणि कामगार-कारखानदार कलहाचे वातावरण भडकत जातें. अशा परिस्थितींत सरकारच्या अधिकाऱ्याचे लागेबांधे धनिक कारखान-दाराशीं असल्यानें एकंदरीनं सरकार कारखानदाराची बाजू घेते व मग सरकार व भांडवलदार या दोघाची कामगाराविरुद्ध गट्टी झाली आहे असा कामगाराचा साहजिकच समज होतो. त्यामुळे वर्गकलहाचे वातावरण अधिकच तप्त होतं. त्यामुळे कामकरी वर्ग अशा वर्गलढ्याकडे झुकत आहे ही सबब पुढें करून कारखानदार 'उत्पादन कमी होण्यास हा वर्गकलह हे कारण आहे, कामगाराना आवरा' असें सरकारला दटावून सागतो व सरकार आणि पुढारी कारखानदाराचे म्हणणें हेच खरे मानून कामगारांना दटावतात. याचा परिणाम असा झाला आहे की सध्याच समाजस्वरूप न बिघडविता कामगाराना जेवढें झुकतं माप देता येईल तेवढं सरकार देत असूनसुद्धा सरकारच्या वर्गसमन्वयवादी धोरणावर कामगार चिडतात व वर्गकलह अधिकच भडकत जातो.

बाजारव्यवहारात तर सरकारला सपूर्ण अपयश आलं असून व्यापारी वर्गाने सरकारचा सपशेल पराभव केला आहे. धान्य व कापड यांची टचाई युद्धामुळे निर्माण झाली हे तर खरेच, पण ही आता सध्याच्या समाजव्यवस्थेत अपरिहार्य ठरलेली जी टचाई ती जुजबी उपायानीं दूर करण्याचे प्रयत्न सर-कारने केले. धान्य व कापड याचे वाटप हे त्या प्रयत्नाचे मुख्य स्वरूप असून इतर अनेक वस्तूचें भावनियत्रण, पुरवठानियत्रण सरकार करीत आहे. पण व्यापारी नेहमी सरकारच्या पुढेंच धावून विक्रीमाल जेथे कोठे असेल तेथे त्यावर आधी झडप घालतो, त्याची कोंडी करतो, अधिकाऱ्याना लाच देतो आणि काळाबाजार माजवितो. यामुळें चागला माल सर्वसामान्य लोकाना मिळूच शकत नाहीं व वाईट माल महाग आणि अपुरा मिळून टंचाई आणि महागाई वाढत जाते. यामुळें महागाईभत्ते वाढले तरी महागाई त्या भत्त्यापुढेच जाते, त्यामुळें कामगार व शेतकरी पुन्हा असतुष्ट होतात; कामगाराना आणखी महागाईभत्ता द्यावा लागला कीं कारखानदार चिडतात, शेतकऱ्याला बाजारात सर्व वस्तु अधिकाधिक महाग मिळूं लागतात व तो चिडतो. व्यापारी शेतकऱ्यांकडून

खुल्या अथवा काळ्या बाजारात चढ्या भावाने धान्य खरेदी करतो म्हणून शेतकरी सारे धान्य विकून टाकतो, नतर आलेले पैसे त्याला सर्व वस्तूंच्या वाढत्या महागाईत अपुरे पडतात. प्रचड सख्येच्या मजूर शेतकऱ्याला तर काहीच सरक्षण नाहीं. त्याला आता रोजगारीत धान्य मिळत नाहीं रोजच्या खाण्यासाठी त्याला धान्य आता अधिक महागाईने विकत घ्यावें लागते व तो धनिकावर आणि व्यापाऱ्यावर चिडतो. यामुळे वर्गकलहाचें वातावरण शेतकरी कामकरी मध्यमवर्ग यात आणखी बळावत जाते.

नियत्रणें, त्याची विफलता, त्यापासून उत्पन्न होणारा असतोष व वर्गकलह आणि तो शमविण्यासाठीं व दडपण्यासाठी वापरावी लागणारी नियत्रणें व करावी लागणारी दडपशाही यामुळें परपरागत लोकशाहीच्या कल्पनाना सपूर्णपणें मूठमाती मिळाली आहे. फॅसिस्ट अथवा सोव्हिअट पद्धतीत हुकूमशाही आणि हिंसा असते, उलट आपल्याकडील वर्गसमन्वय ऊर्फ सर्वोदय पद्धतींत लोकशाही आणि अहिसा आहे असे सागण्यात येते. पण कॉंग्रेस मंत्र्याच्या राज्यकारभाराचे व एकदर समाजव्यवहाराचे वरीलप्रमाणे अवलोकन केल्यास लोकशाही व अहिंसा याचे बलिदान प्रत्येक क्षणी व प्रत्येक स्थळीं होत असल्याचें दिसून येते. हिंदुस्तानात अहिसात्मक लोकशाही आम्हास स्थापावयाची आहे असे जेव्हां मोठे पुढारी बोलतात तेव्हा शब्दात सत्य अर्थ कांहींहि नसतो, याचा विचार हे पुढारी करीतच नाहीत. गाधीच्या हयातीत अहिंसा व लोकशाही कॉंग्रेसमध्यें कितीहि असो, त्यांच्या मृत्यूनतर अहिसेचा मागमूसहि राहिलेला नाही आणि लोकशाही अभावाच्या दिशेनेच वाढत आहे. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर फाळणी, लोकसख्याची अदलाबदल, सस्थानविषयक प्रश्न वगैरेबाबत पुढाऱ्यानीं जी धोरणे आखली त्यावर प्रतिकूल टीकेचा अकारण भडिमार झाला. खरोखर या राजकीय बाबतीत कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं जास्तींत जास्त शहाणपणानें व धाडसानें वर्तन केलें. त्यात त्याना जरूर ते यशहि आलें आहे. पण पुढाऱ्यांना खरें अपयश वर सागितल्याप्रमाणें आर्थिक बाबतींत आलें असून जोवर या आर्थिक अनर्थावर मूलग्राही उपाय चिंतिले जात नाहींत, अमलात आणले जात नाहींत तोवर आजचा आर्थिक अनर्थ अधिकच भडकत जाणार असा सभव आहे.

## कम्युनिझम्, चीन व भारत

ही सर्व आर्थिक परिस्थिति निश्चित वाईट आहे. तीवरूनच ‘ येथे चीन

होईल' असे भाकित अनेक लोक करितात. या भाकिताचा अर्थ खरोखरी काय असतो? येथे चीनसारखा कम्युनिस्ट पक्ष अधिकारावर येईल असा असेल तर पुष्कळांना त्यात वाईट वाटणार नसून बरेच वाटेल. कारण धनिक वर्ग नाराज झाला तरी प्रचंड बहुसंख्य वर्गास कालांतरानें का होईना नवीन व प्रगतिपर समाजघटना उभारण्यास सवड मिळेल, पण कम्युनिस्ट पक्ष अथवा त्यासारखा दुसरा कोणताहि पक्ष अधिकारावर येऊ शकेल असा नजिकच्या काळचा संभव निदान आज तरी दिसत नाही.

१९२० साली जेव्हा कम्युनिस्टपक्ष चीनमध्ये स्थापन झाला त्यावेळीं कम्युनिस्टपक्ष हे एक जगाला कोडें होतें व त्याच्याशी लढावे कसें हे जगाला ठाऊक नव्हतें. युरोपीय राष्ट्रांतील भांडवलदार तेथल्या कम्युनिझमशी झगडण्यात बेजार झाले होते. अमेरिकेनें जगाकडे पाठच फिरविली होती आणि चीनमध्ये नक्की काय होईल अथवा तेथे काय करावें याचा बाहेरच्या कोणाला उमजच पडेना. त्यावेळी चीनमध्यें कम्युनिस्टपक्ष स्थापन होताच त्याचे प्रस्थ एवढे वाढलें कीं पुढील चार वर्षांत कम्युनिस्टाशीं सहकार्य करावे अशी चीनचा राष्ट्रवादी पुढारी डॉ. सन्यत्सेन याची खात्री झाली. पुढें चँगकैशेकनें कम्युनिस्टांचा निःपात केला तरी त्यांचे शेकडों हजारों तत्त्वनिष्ठ व कणखर कार्यकर्ते शाबूत राहिले, ते संघटितहि राहिले, आणि चँगकैशेकच्या आटोक्याबाहेर जाऊन आपला क्रांतिमार्ग आक्रमूं शकले. चीनचा विस्तार अफाट लक्षावधि चौरस मैलांच्या मध्य आणि पश्चिम भागात वाहतूक आणि दळणवळण कमी, शेतकऱ्यांची पिळणूक भयंकर झालेली, पण भांडवलदारी उत्पादन व सामर्थ्य मुळींच निर्माण न झालेलें, अशा या विस्तीर्ण प्रदेशात कम्युनिस्टांना आपली संघटना स्वस्थपणें सजविता व पसरविता आली. त्यांच्या पाठीशी सोव्हिअट रशिया भौगोलिक क्षेत्रानें व सहानुभूतीनें उभा होता.

चँगकैशेकला जपानची चढाई व कम्युनिस्ट या दोघानाहि तोंड द्यावें लागत होतें. त्यानें जपानशीं तडजोडहि केली असती. पण चँगचे सगळे सल्लागार व मदतगार इंग्रज व अमेरिकन्स असल्यानें त्यानीं चँगला जपानशीं पूर्ण समेट करूं दिला नाहीं. कारण त्यांना स्वतांला चीन हवा होता.

प्रथम रशिया अंतर्गत असंतोषानें मरेल अशी आशा पाश्चात्य राष्ट्रांना वाटली आणि नंतर नात्सी जर्मनीच्या आक्रमणानें मरेल आणि मग चिनी

कम्युनिस्ट निराधार होऊन आपोआप मरतील अशी पाश्चात्य भाडवलदाराना आशा वाटली. दुसऱ्या महायुद्धात चीनचा आर्थिक सागाडा उरलासुरलाहि चक्काचूर झाला. अमेरिकेनें जगातील राजकारणात उडी घेतली तरी पूर्व युरोप, जर्मनी वगैरे प्रदेशात युद्धाचा धाक कायम ठेवून रशियाने अमेरिकनाना युरोपात डाबून ठेवलें. स्टालिननें युद्ध संपतांच चँगकैशेकशी सख्ख्याचा तह करून जणू चिनी कम्युनिस्टाना रशिया तोडघशी पाडणार असा देखावा स्टालिननें निर्माण केला. अमेरिकेला चिनी कम्युनिस्टाची कार्यक्षमता पसत पडली. चँगकैशेकच्या मोडकळीस आलेल्या राजवटीला कम्युनिस्टाच्या कार्यक्षमतेचा आधार देऊन वर अमेरिकेची ' लोकशाहीप्रधान ' भाडवलशाही उभारता येईल अशी आशा अमेरिकेला वाटली. इकडे युरोपात युगोस्लाव्हियाच्या टिटोशी स्टालिन व पूर्व युरोपीयन राष्ट्रे याचे झगडे सुरू झाले. त्यामुळें स्टालिनचे चिनी कम्युनिस्टाशीं असेंच भांडण जुपेल अशी आशा भाडवलशाही राष्ट्राना वाटू लागली व चिनी कम्युनिस्टाकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें.

ही सर्व संधि साधून १९४९ सालीं चिनी कम्युनिस्टानीं एकदम घोडदौडीनें चढाईस आरंभ केला व चीनमध्ये हे काय घडत आहे ते अमेरिकेच्या लक्षात पूर्णपणें येण्यापूर्वीं चीनमधून चँग कैशेकची हाकलपट्टी झाली. चीनमधील कम्युनिस्टांना यश येण्यास वरील प्रकारची दीर्घकाल सलग अनुकूल परिस्थिति मिळाली यामुळें तो पक्ष वाढला, त्याला चुका करूनहि सावरता आल्या व अखेर निदान आजवर बरेच यश आलें आहे. आता तेथील जुन्या धनिक वर्गास दुःख वाटलें तरी सामान्य जनतेची स्थिति सुधारत जाण्याचा संभव खास आहे.

पण भारतांत वर सागितल्याप्रमाणें आज आर्थिक परिस्थिति वाईट असली तरी कम्युनिस्टाना अथवा त्याच्यासारख्या पक्षाला यश येण्याचीं लक्षणें आज तरी दिसत नाहींत. याचा अर्थ येथला कम्युनिस्ट पक्ष चीनमधील कम्युनिस्टापेक्षा अधिक नालायक आहे असा नव्हे. अनुकूल परिस्थिति असल्यास कम्युनिस्ट शिकवणीचें बळ असें आहे कीं दुबळी व नादान माणसे असतील त्यातूनहि पुरेसे कर्तबगार पुढारी पुढें येऊ शकतात व आज येथल्या कम्युनिस्ट पक्षाचा चुरा, भुगा झालेला दिसत असतांहि आपलें आसन

सावरण्याचें त्याचें धाडस कौतुकास्पद वाटत आहे. इतकेंच नव्हे तर 'कम्युनिस्ट' नावाचा आजचा पक्ष मेला तरी 'कम्युनिस्ट' कार्य-पद्धतीचा पगडा सोशॅलिस्टावर बसत असल्याची लक्षणें आजच स्पष्ट दिसत आहेत. हा मजकूर लिहिताना (१४ ऑगस्टपासूनचा) जो संप चालू आहे त्याची कारणपरंपरा काहींहि असो सोशॅलिस्ट हे कम्युनिस्ट तंत्रात वाकबगार होत आहेत व त्या तंत्राने मिळणाऱ्या भडक व त्वरित यशाची धुंदी त्यांच्या डोळ्यावर चढू लागली आहे अशी लक्षणें मला दिसतात. याच मार्गानें थोड्या काळात चीनसारखी क्रांति त्याना येथे करता येईल तर त्यांचीं हीं साधनें 'कम्युनिस्ट' आहेत म्हणून कोणी तक्रारहि करणार नाहीं.

पण मला येथें या कम्युनिस्ट कार्यपद्धतीला फारसे यश येईल अशी बिलकूल आशा वाटत नाहीं. कॉंग्रेसनें फाळणीचा निर्णय तडकाफडकीं घेतला नसता व पुढें अपरिहार्यपणें ब्रिटिश सत्ता ढिली पडली असती तर अमेरिकेला येथील सत्ता चटकन घेणें उरकलें नसतें, जिनांना पंजाब, बंगाल, मुंबई, संयुक्तप्रांत, आसाम इतक्या ठिकाणीं तरी जातीय यादवी भडकविण्यात यश आलें असतें, हिंदु, शीख व मुसलमान सैन्यें तिरंगी युद्ध लढलीं असतीं, निझामनें दक्षिण भारता-वर फार मोठी चढाई केली असती, त्यावेळीं सारा देश मुस्लिम लीगच्या हातीं गेला असता आणि मग येथे भयानक यादवी सर्व देशभर माजली असती. त्या परिस्थितींत कम्युनिस्ट स्वताच मुस्लिम पक्षपाती बनले असते अथवा चीनमध्यें घडलें त्याप्रकारें अथवा दुसऱ्या काहीं प्रकारे येथे कम्युनिस्ट क्रांति झाली असती अथवा येथें अमेरिकेचें साम्राज्य काही काळच्या यादवीनंतर मुसलमानांच्या आमंत्रणाने आलें असते.

पण कॉंग्रेसपुढाऱ्यानीं, हें सर्व भयानक भवितव्य डोळ्यांपुढें दिसल्यानें, तांतडीनें फाळणी पत्करली व त्या जखमेंतून मर्यादित प्रदेशांत बराच काळ यादवी वाहात राहिली तरी बाकीच्या प्रचंड देशाला यादवीपासून शाबूत ठेवतां आलें आणि त्याच काळांत आश्चर्यकारक तातडी करून भावि यादवीचीं संकटस्थानें अशीं जीं संस्थानें तीं पुढाऱ्यांनी वितळून राष्ट्राच्या जीवनांत मिसळून टाकलीं. या सर्व परिस्थितींतूनहि आतां नवीं संकटे उद्भवलीं आहेत. फाळणीचीं संकटें या ना त्या प्रकारें अजून धुमसताहेत निर्वासिताची सोय लावणें इतकें कठिण झालें आहे कीं आर्थिक परिस्थिति अधिक बिघडल्यास

निर्वासितांच्या प्रश्नाच्या शेवटच्या धक्क्यानें येथील राजकारभाराचें कंबरडें मोडेल. संस्थाने आजवर दीडशे वर्षे विजातीयपणें वाढलीं व मागासलेलीं राहिलीं त्यामुळें स्वतंत्र भारतात ती एकजीव करून घेतांना अनेक स्फोट होत आहेत. पण हें सर्व खरें असले तरी येथे देशभर इंग्रजांनीं शाबूत व कांहींशी कार्यक्षम नोकरशाही कायम ठेवली आहे, देशात वाहतुकीचीं साधनें व सडका यांचें जाळे चांगलें विणलेले असून खाजगी व सरकारी वाहतूक बरीच कार्यक्षम आहे. भांडवलदारी धंदे, मोठ्या व्यापारी पेढ्या, लहान व्यापारी यांचे मूळ सर्वत्र खोल गेलेलें आहे, सामान्य जनतेला अराजकाची संवय अथवा खोड कमी असून गांधींच्या तीस वर्षांच्या शिकवणीने हिंसक मार्ग त्याज्य मानले गेले आहेत. सोशॅलिस्ट व भांडवलदारांचे काँग्रेसमधील पाठीराखे आपलीं कोणतीहि धोरणें अवलंबताना ढोंगानें का होईना गांधीचें नाव घेतात व मग साहजिकच त्यांच्या वाईट धोरणालाहि त्याना आळा घालण्याची बुद्धि होते. अत्या-चाराकडे सहज प्रवृत्तीनें झुकणाऱ्या जनतेवरहि गांधींच्या मताचा पगडा आहे ही गोष्ट गांधीवधानंतर महाराष्ट्रात झालेल्या हलकल्लोळातहि दिसून आली. साऱ्या दक्षिण महाराष्ट्रभर कोट्यवधि रुपयांची संपत्ति लोकांनीं पिसाटपणें जाळली, पण अगदी तुरळक असे चार अपवाद वगळले तर माणसांची हत्या झाली नाही इतकेंच नव्हे तर जाळपोळ करीत असताहि माणसाना वाचविण्याचे प्रयत्न जाळपोळ करणाऱ्यानीं स्वताच केले.

ही सर्व परिस्थिति संकलितपणें ध्यानांत घेतल्यास कम्युनिस्टांना व त्यांच्या मार्गांना सत्ता जिंकण्याएवढें यश येण्यास जी दीर्घकालीन भयंकर विपत्तीची, अराजकाची अनुकूलता हवी असते ती त्याना अल्पकालहि मिळण्याची आशा नाहीं. हल्लींची आर्थिक परिस्थिति आणखी बिघडत जाईल व ती तशीच बराच काल बिघडत राहीलहि. पण शेतकऱ्याच्या धान्याला सरकार बराच चागला भाव देण्याची हमी देत आहे व मजूराना मोठे पगार व महागाईभत्ते देत आहे तोंवर, नेहमीं आजारी असणारा माणूसहि दीर्घकाल जगूं शकतो त्याप्रमाणें, येथील समाजसंघटना व अर्थसंघटना कोणत्याही प्रकारच्या विध्वंसक क्रांतीस बळी न पडता कण्हत कुढत पण शाबूत राहीलच. नेहरूंनीं हें ओळखलें असल्यानें शेतकऱ्याच्या मालाला मोठ्या किंमतीची हमी व कामगाराचे पगार न उतरविण्याची हमी त्यानीं घेतली आहे. तिला सर्व

काँग्रेसचाहि ठाम पाठिंबा आहे. निर्वासिताचा प्रश्न बिकट खरा. त्यांच्या असतोषानें देशात अस्वस्थताहि माजेल. पण निर्वासित हे आपली व इतराची कुचबणा करू शकले तरी क्राति करू शकणार नाहीत. हिंदुस्तानात आलेले बहुतेक निर्वासित भाडवलशाही व मालकशाहीचे पुरस्कर्ते आहेत अथवा निमूटपणें कोणत्याहि परिस्थितीपुढें मान तुकविणारे आहेत. शेतकरी व कामकरी समाजास जोवर सरकारनें आजच्यासारखी मिळकतीची हमी दिली आहे तोवर आजची राज्यसघटना व समाजसघटना चीनप्रमाणे खास कोसळून पडत नाहीं.

चीनमध्येहि ' आधुनिक समाजसंघटना ' कोसळली असे घडलं नाही. तेथे आधुनिक समाजघटना फारशी नव्हतीच. किनाऱ्यावर काहीं बंदरे वाढली. त्यामुळें व्यापारी भाडवलशाहीचें शोषण हजारो मैल आत गेले. पण भाडवलशाही कारखाने किनाऱ्यापासून आत खोलवर गेलेच नाहीत. यामुळे कम्युनिस्टाना अंतर्गत प्रदेशांत सघटित प्रतिकार असा थोडाच होता. भारतात भाडवलशाही, व्यापारी वर्ग, कामकरी शेतकरी वर्ग साऱ्या देशांत आधुनिक आर्थिक सघटनेत बाधलेला आहे आणि शेतकरीकामकऱ्याना सरकारी हमीनें पैसा मिळत आहे तोंवर अत्याचाराने समाज उध्वस्त करण्याच्या प्रयत्नास या जनतेचा पाठिंबा मिळणार नाहीं. आजवर कम्युनिस्ट पक्षाला याच कारणामुळें अपयश आलें आणि ते दहशतवादी झाले. त्यामुळें कम्युनिस्टाचे संप वर्गीय अडवणुकी हे मार्ग थाबले आहेत असे मात्र नव्हे. ते आतां सोशॅलिस्ट अवलबीत आहेत. कारण शेतकरीकामकऱ्याच्या सोशॅलिस्ट पुढाऱ्यांचा वर्गयुद्ध व वर्गीय अडवणुकी यांखेरीज विधायक कार्यावर फारसा विश्वास आहे असें दिसत नाहीं. कॉंग्रेसमध्यें जे भाडवलशाहीचे पक्षपाती मुळचे आहेत व जे नवीन घुसले आहेत ते काँग्रेसचें राज्ययंत्र, संघटना व इतर पसारा स्वताच्या व भाडवलदाराच्या हितासाठी बेगुमानपणें वापरू पाहात आहेत. शहरातील व खेड्यातील वकील, सावकार व इतर मध्यमवर्ग बेकारी व महागाई यामुळें चिडला आहे आणि वर्गयुद्ध व वर्गीय अडवणुकी यांसारख्या सनातन कम्युनिस्ट तंत्राला फोफावण्यास चागली संधि निर्माण झाली आहे. कम्युनिस्ट हें आपलें पराभूत झालेले दहशतवादी धोरण सोडून कामकरी-शेतकऱ्याचें पुढारीपण पुन्हा हातीं घेऊं पाहात आहेत. ते या

कामात कुशलहि आहेत, आणि त्यांनीं उचल खाऊन शेतकरीकामकऱ्यात पुन्हा आपलें स्थान मिळवूं नये म्हणून सोशॅलिस्ट हे कम्युनिस्टांच्या संपादि सनातन तंत्राचा जलदीनें अंमल करून आपणच 'नवे कम्युनिस्ट' होत आहेत.

यामुळे राजकारणांत नवीन आकर्षक रंग भरूं लागला आहे व त्यामुळें सर्व वर्गांना एक प्रकारचा उन्माद आला आहे. कोणत्याहि प्रकारच्या युद्धाच्या बातम्या गोड असतात व युद्धाच्या वातावरणात थोडाफार उन्माद हा राहतोच, तसा तो आज दिसत आहे. काँग्रेस व सोशॅलिस्ट या दोनहि पक्षात या परिस्थितीनें उदास होणारीं माणसें आहेत. गांधीच्या नेतृत्वाखालीं याची वाढ दीर्घकाल झाली असल्यानें त्याना हे कलहाकडे चाललेलें राजकारण आवडत नाहीं. पण पुढील साली सार्वत्रिक निवडणुकी होणार, त्या जिकायच्या तर असले दंगलयुक्त पण जवळचे मार्ग अवलंबिण्याखेरीज त्याना अन्य उपाय दिसत नाहीं. यात काँग्रेसची चुकी किती आणि सोशॅलिस्टाची चुकी किती हे सागणें कठिण आहे. पण भाडवलदार वर्ग,—कारखानदार व व्यापारी—कोणत्याहि शिस्तीस मान तुकवीत नाहीं व कॉंग्रेसमधील सत्ताधारी वर्ग (फक्त काहीं व्यक्ति वगळल्यास) भाडवलदाराची तब्बेत सांभाळून राहणेंच योग्य असें मानतो. प्रांतिक वरिष्ठ काँग्रेस सघटनाचे काही बडे पदाधिकारी भांडवलदारांच्या हातमोजात हात घालून बसले असल्याचे जनता उघडणें बोलते, आणि कांहीं दुर्वत्त अधिकारी यांच्या संगनमतांत असून त्याना आपलें पारिपत्य होईल अशी भीति वाटत नाही. काँग्रेसमन्त्र्यावर मत्री या नात्यानें अनीतिकारक वर्तने केल्याचे आरोप आव्हानपूर्वक केले जात असूनहि न्यायालयामार्फत त्याची उघड चौकशी करण्याचें धैर्य कॉंग्रेस वरिष्ठ दाखवू शकत नाहींत. धदेवाले, व्यापारी, मध्यम वर्ग व सामान्य जनता सगळेच काळ्या बाजारात जातात व उलट काळ्या बाजारासाठीं सरकारला शिव्या देतात. कोरियांत युद्ध सुरू झाल्याचें निमित्त मिळतांच व्यापाऱ्यानीं भाववाढ करून जनतेचें रक्तशोषण वाढविलें. गिरणीकामगारांच्या सपाने समाजावर जेवढे सकट ओढवलें त्यापेक्षा या भाववाढीनें आलेलें संकट फारच फार मोठे आहे. पण संपाने सरकार व कॉंग्रेस याना जेवढी चीड आली तेवढी या भाववाढीने त्याना आली नाहीं.

या भाववाढीविरुद्ध मध्य सरकारच्या कायद्याच्या योजना जाहीर झाल्या आहेत. घटक सरकारानीं कोणते प्रयत्न केल्यावर त्यांचा नाइलाज झाल्यानें

हे मध्यसरकारचे कायदे आले ? आज घटक सरकाराचे कागदी कायदे व निष्क्रिय अधिकारी आहेत त्यात आता मध्यसरकाराचे कागदी कायदे व निष्क्रिय अधिकारी याची भर पडणार आहे. मध्यसरकारला आत्मविश्वास व स्वाभिमान असता तर मध्य सरकारानें घटक सरकाराना हाकलून लावल्या-वाचून हे कायदे करण्याचें नाकारलें असते. या देशात फेडरल राज्यघटना असून घटक सरकाराच्या प्राथमिक जबाबदाऱ्या पार पाडल्या जात नाहींत याची कोणासहि शरम वाटत नाहीं आणि कोणीहि अधीर होत नाहीं. मग शेतकरी-कामकऱ्याचे पुढारी—मग ते सोशॅलिस्ट, कम्युनिस्ट अथवा शेतकरीकामकरी पक्षाचे असे कोणी असोत—ते कम्युनिस्टानीं एक पिढीहून अधिक काळ रुळविलेल्या वर्गविग्रही मार्गानेंच जातात व त्याना जनतेचा स्वाभाविकच पाठिंबा मिळतो. निवडणुकी जसजशा जवळ येत जातील तसतसे उभयपक्षीं हे प्रकार वाढतच जातील. पूर्वी स्वातन्त्र्यलढा चालू असल्यानें कम्युनिस्टाच्या वर्गविग्रही मार्गाकडे जनता गेली नाहीं. आतां परकीय शत्रु येथें कोणीच नसल्यानें जनता वर्गविग्रहाकडे स्वाभाविकच ओढ घेईल आणि शेतकरी-कामकऱ्यांचे पक्ष जनतेने आपल्या आपल्या पक्षाकडे यावे म्हणून चढाओढीनें वर्गविग्रही राजकारण माजवीत राहतील. हा रस्ता यादवीकडे जाणारा आहे.

निवडणुकांचे लाल गाजर या चळवळींचा वेग वाढवीलच. आणि निवडणुकी लांबणीवर पडल्यास ते पुनः आगींत तेल ओतल्यासारखेच होईल. यातच महायुद्ध ओढवलें तर ? राष्ट्रीय एकजूट होईल काय ? मला तसें वाटत नाहीं. नोकरशाहीचे दुर्वर्तन, भांडवलदार वर्गाची लोभी वृत्ति आणि कॉंग्रेस राज्यें व कॉंग्रेससघटना यांची नोकरशाही व भांडवलदार याना लगाम घालण्याची असमर्थता, याबद्दल लोकाना आणि विरोधी पक्षांना इतकी खात्री झाली आहे कीं युद्धकाळीं सुद्धा सरकारला लोकाचें एकजुटीचें सहकार्य मिळणार नाहीं, विरोधी पक्षाना हल्लींचीं येथलीं सरकारें विश्वासात घेणार नाहींत आणि युद्ध याना यशस्वितेनें चालविता येणार नाहीं. युद्धात भारत खेचला गेलाच तर अमेरिकेला येथलें सरकार हातीं घ्यावें लागेल आणि मग दुसऱ्या बाजूनें रशिया येथे येऊन यादवी व महायुद्ध माजवील. पं. नेहरूंचें परराष्ट्रीय धोरण हें जागतिक महायुद्ध लांबणीवर टाकणारें आणि भारताला युद्धापासून दूर राखणारें आहे. पण युद्ध भडकलेंच तर भारत सरकार नटस्थ राहिलें तरी

त्यावर असह्य ताण पडेल आणि अखेर तें युद्धात खेचलें तरी जाईल अथवा स्वतंत्रपणेंच येथे परिस्थिति भडकत जाऊन यादवी माजेल.

## गांधीमार्गाचा अवलंब

युद्ध नच झाले तरी आजची कॉंग्रेस व सोशॅलिस्ट याचीं धोरणें हीं यादवी-च्याच दिशेनें चालली आहेत. अमेरिका व रशिया या दोहोंपासून अलग राहून शांततेने व सलोख्यानें प्रगतिमार्गावर जाण्याचा मार्ग हा नव्हे. नजिकच्या काळात शांततेच्या व सलोख्याच्या मार्गाचा अवलंब मोठ्या प्रमाणावर कोणी करील अशी मला आज आशाही वाटत नाहीं. पण जगाचा जर सहारच व्हावयाचा नसेल व महायुद्ध बराच काळ टळेल तर शांततेचे व सलोख्याचे मार्गच जगाला अवलंबावे लागतील. आणि येथे गाधींची स्मृति व त्यांच्या शिकवणीची ऐतिहासिक पार्श्वभूमि असल्यानें आज ना उद्या कॉंग्रेस व सोशॅ-लिस्ट या पक्षातले काहीं पापभीरु, निष्ठावंत व विधायक संघटनेवर प्रेम करणारे लोक सलोख्याच्या व शांततेच्या मार्गानें जातील. त्यातूनच गांधीवादाचा विशुद्ध पुनर्जन्म होईल असें मला वाटत असते.

माझी ही केवळ एक दैवी श्रद्धा नव्हे. मी स्पष्ट आधिभौतिक दृष्टीचा लेखक असून त्याच दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहतो आहे. गाधींची विधायक श्रद्धा अंगीं बाणलेले काहीं सामान्य बुद्धीचे कार्यकर्ते आजहि शांततेचे पायाशुद्ध विधायक कार्य करीत आहेत. ते असामान्य बुद्धीचे नसल्यानें लक्षावधि लोकांना ते आपल्यासारखे करू शकत नाहींत हें जितके खरें तितकेच ते सामान्य बुद्धीचे आहेत हाच गाधींचें कार्य सामान्य जनतेच्या हृदयापर्यंत भिडलें असल्याचा पुरावा असून गांधींसारखा कोणी असामान्य पुरुष गाधींचें कार्य व्यापक-पणें चालविण्यासाठी जेव्हा पुढें येईल त्यावेळीं त्याचें कार्य पुष्कळ सोपें होईल असें मला वाटतें. आजच्या सामान्य कार्यकर्त्यांना कोणी तरी विधायक कार्य-प्रचार करणारा असामान्य महात्मा या देशांत पुन्हा व्हावा असें वाटत असेल तर त्यांनीं त्यासाठीं वातावरण तयार केलें पाहिजे. स्वातंत्र्यलढ्याचें वातावरण देशांत जमूं लागलें तसें तसे त्यांत टिळक, गांधी वगैरे महापुरुष निर्माण झाले व त्यांनीं आपले संप्रदाय वाढवून स्वातंत्र्यलढ्याचें वातावरण आणखी वाढविलें व लक्षावधि लहानमोठ्यांना त्यांत खेचलें. अलौकिक थोर माणसें सर्वसामान्य जनांना नवीन प्रकाश, नवीन मार्ग, नवीन साधनें, नवीन ध्येयें

दाखवितात त्याचप्रमाणे अलौकिक थोर पुरुषाची पूर्वभूमिका सामान्य लोकांच्या वर्तनातून, विचारातून, संघटनेतून तयार होत आलेली असते. नदींतून वाहात येणाऱ्या कणकण सुपीक मातीने सुपीक मळी रान तयार होते आणि डोंगरावरील किरगळीएवढ्या ओहोळांनी नद्या भरून वाहतात. महात्मा गांधींसारखा शांततावादी विधायक कार्यकर्ता जर यापुढे त्यांचे कार्य चालविण्यास पुनः पुढें येणार असेल तर विधायक कार्याची श्रद्धा अंतःकरणात असलेल्या तरुणांनीं त्या महापुरुषाच्या आगमनाची पूर्वतयारी केली पाहिजे.

ही पूर्वतयारी कोणती ? त्यासाठी भौतिक दृष्टिकोनाची गरज पहिली आहे. कम्युनिस्ट जेथे यशस्वी होतात तेथे ते का यशस्वी होतात याचा विचार करणें फार महत्त्वाचें आहे. कम्युनिस्टांचे एक भौतिक तत्त्वज्ञान आहे. तो कम्यु-निझम्‌चा प्राण आहे. पण प्राण हा शरीरावाचून वावरू शकत नाही. कम्युनिझम्‌चें हें शरीर म्हणजे त्याची शिस्तबद्ध संघटना आणि परिस्थितिप्राप्त असा कार्यक्रम हेच होय. कम्युनिस्ट पक्षसंघटना ही जगात एक अगदीं नवीन वस्तु आहे. लष्करी शिस्तीची संघटना असे कम्युनिस्ट संघटनेचें वर्णन केले जाते आणि कम्युनिस्ट हे क्रूर व विध्वंसक वृत्तीचे असतात म्हणून ते वर्णन त्यांच्यावर बसतेहि. पण कम्युनिस्ट संघटना ही मूळ जीवनविध्वंसाची संघटना नसून जीवनरचनेची संघटना आहे. विध्वंस हा अपरिहार्य म्हणून ते स्वीकारतात व शेवटी तेवढाच मुख्यतः त्यांच्या बोकांडीं बसतो असे दिसते. पण रशियात विध्वंस व दडपशाही जी झाली ती वगळल्यास विधायक स्वरूपाचे कार्य तेथल्या कम्युनिस्टांनी जगड्व्याळ केले आहे असें दिसून येतें. जगात हिंसा व अत्याचार ही चालत आली आहेत. ती तशीं पूर्वी असणें हें अपरि-हार्यहि असेल. आज आपल्या देशात याच हिंसात्मक मार्गांचा अवलंब होत असून यादवीत व महायुद्धात देश सापडण्याची भीति उद्भवली आहे. ती निवारण्यासाठीं विध्वंस टाळून विधायक रचना करणारा कम्युनिस्टांसारखा दृढ निर्धाराचा व शास्त्रोक्त विचाराचा पक्ष स्थापन होणें जरूर आहे. हिंसा ही बहुंशीं त्याज्यच असल्याने हिंसेवर आधारलेल्या कम्युनिस्ट शिस्तीची याला आवश्यकता नाहीं. विशिष्ट कार्यक्रमास आयुष्य वाहून घेणारीं व पहिलीं कांहीं वर्षे तरी निवडणुकीच्या राजकारणांत न पडणारीं माणसें या विधायक कार्या-साठीं एकत्र आली पाहिजेत. आजच्या मंत्रिमंडळाच्या अंगीं कांहींहि दोष

असोत, अशा विधायक कार्यकर्त्यांचा संघ जर समाजांत काम करूं लागला तर त्यास साहाय्यभूत होण्याचा प्रयत्न हे मंत्री करतील खास. वर देशाची जी एकंदर परिस्थिति वर्णिली आहे तीवरून त्वरित यश येण्याची अपेक्षा या कार्यकर्त्यांनीं न करता आपल्या उद्दिष्टासाठी स्वताचें खत करण्याची त्यांनीं तयारी ठेवली पाहिजे. जिल्ह्यागणिक नव्हे तर तालुक्यागणिक अशीं माणसें गटागटानें कामास लागलीं पाहिजेत. पुरेसे कार्यकर्ते जर एकच जिल्ह्यात अथवा तालुक्यांत जमूं शकतील तर प्रयोगासाठीं असें क्षेत्र घेऊन पुरेशा माणसांनी काम सुरू करणें चांगले. या दृष्टीनें सर्वोदयकेंद्राची कल्पना चांगली आहे एवढें मी येथे तूर्त नमूद करून ठेवतो.

आपण या संकल्पित संघटनेस, तींतील अभिप्रेत असा शांततावादाचा आग्रह व्यक्त होण्यासाठीं, गांधीसंघटना असें म्हणूं. या गांधीसंघटनेनें समाजजीवनाचें नीट पृथक्करण करून कार्यक्रम आखला तर आजच्या सरकारचे अनेक कायदे त्यास उपयुक्त वाटतील. शेतकऱ्याला उत्पादनाचा खर्च भागून नफा उरेल इतकी किंमत देण्याची सरकार हमी घेते हा खरोखर नवसमाजनिर्मितीचा पाया आहे दीडशे वर्षांच्या ब्रिटिश अमदानीत शेतकऱ्याला व्यापाऱ्याच्या कोंडींत सापडून पडत्या भावात धान्य विकावें लागे व त्याची उपासमार होई हा पिळणुकीचा मूळ पाया होता. जोवर सरकार आतां शेतकऱ्याची ही पिळणूक होऊं देत नाहीं व शेतकऱ्याला चढा भाव हमीपूर्वक देते तोंवर शेतकऱ्याला संघटितपणें आपलें नवजीवन उभारण्याला मार्गदर्शन करणें हें या गांधीसंघटनेचें काम आहे. शेतकऱ्यानें शेतींत अधिक मेहनत केल्यानें पीक अधिक येईल व सरकार किंमतीची हमी घेत असल्यानें शेतकऱ्याचा नफा वाढत जाईल.

येथें सहकारी शेती वाढविणें हा फार महत्त्वाचा मार्ग आहे. उद्योगधंद्यात भांडवलशाही ही इश्री संकट आणतें हे लक्षांत घेतल्यास शेतीचीं साधनें मोठीं करताकरताच शेती सहकारीपद्धतीची करणें हें अपरिहार्यच आहे. शेतकऱ्याच्या धान्याला सरकार चांगला भाव देते, पण इतर वस्तूंचे बाजारभाव उतरल्यावाचून व स्थिर झाल्यावांचून शेतकऱ्याला सरकारनें चांगला भाव दिल्याचा उपयोग नाहीं हें निःसंशय खरें आहे. पण त्यावर उपाय शेतकऱ्याच्या सहकारी खरेदीविक्री संस्था काढणें हा आहे. समाजवादी समाजांत व्यापारी

हा राहणारच नाहीं हें मार्क्सचे अनुमान फार मार्मिक आहे. ज्या प्रमाणांत शेतकऱ्यांच्या सहकारी संस्था शेतकऱ्याला लागणारे पदार्थ सहकारीपद्धतीनें खास उत्पादकांकडून खरेदी करतील त्या प्रमाणात सरकार भावनियंत्रणात यशस्वी होऊन इतर मालाच्या उत्पादकांचेंहि सहकारी संघ होतील. अखेरीस शेतकऱ्यास लागणारे नांगर, बैल वगैरे साहित्य सामुदायिक पद्धतीनें खरेदी केलें तर शेतकऱ्याची पिळणूक थांबेल व भावनियंत्रण पूर्ण यशस्वी होईल.

शेतकऱ्याने अशाप्रकारे आपलें जीवन आपल्या लगामीं खेचल्यास समाजातला काळा बाजार नष्ट होऊन खरी शांतता व सुव्यवस्था निर्माण होईल व उत्पादनाची वाढ होत राहील. मग आज कूळकायद्याप्रमाणें जमीनमालकांना द्यावा लागणारा खंड 'कसेल त्याची जमीन' या तत्त्वानुसार कायदेमंडळामार्फत. अजीबात बंद केला अथवा थोडथोडा कमी केला तर तें इष्ट व व्यवहार्य ठरेल असे मला वाटते. राष्ट्रीय जीवनास अवश्य अशी वस्तु सुद्धा केवढीहि मोठी भरपाई देऊनच खरेदी केली पाहिजे हें तत्त्व आजच्या जगात फार वाईट आहे. बहार व उत्तरप्रदेश यांतील जमीनदाराच्या जमीनी खरेदी करून शेतकऱ्यांना देणें ही गोष्ट अशक्य कोटींतली व अव्यवहार्य आहे. मुंबई राज्यांतला कूळकायदा हा खरोखर त्या दृष्टीनें शांततेची क्रांति करीत आहे. शेतकऱ्याला त्याने वहिवाटीची शाश्वती दिली आणि सरकारने धान्याच्या भावाची हमी घेतली. यापुढें शांततेच्या व सहकारी संघटनेच्या मार्गानें शेतकरी उत्पादनव्यवहार वाढवून खरेदीविक्री व्यवहार व्यापाऱ्यावाचून करील तर एकदर वातावरणांत एवढा सलोखा व विश्वास निर्माण होईल की कायदेमंडळामार्फत श्रम न करणाऱ्यांची जमीनमालकी अत्यल्प मोबदल्यानें अथवा बिन मोबदल्यानें रद्द करणेंहि सोपें होईल. आजच कूळकायद्यांतील जमीनखरेदीविक्रीच्या योजनेमुळें जमीनीच्या किंमती उतरल्या असून सावकारीनियंत्रणामुळे पठाणी व्याजे बंद झालीं आहेत. कर्जाचे व जमीनींचे दावे जिल्हा तालुका कोर्टांतून फारच घटले आहेत व वकील बेकार होत आहेत ही फार महत्त्वाची प्रगति आहे. मुंबई राज्यातले हेच कायदे परप्रांतात लागू झाले तर जमीनदारी आज विकत न घेता पुढील दहा वर्षांत ती मोफतच खरीदणें शक्य होईल असें मला वाटतें.

शेतकऱ्यानीं काटकसर करून सहकारितेनें भांडवल उभारण्याची चळवळ करावी असें सरकार म्हणतें. पण आज राजकीय पक्षबाजींत ही चळवळ कोणीच

करीत नाही. गाधीसंघटनेचें हें काम आहे. कामकरीशेतकऱ्यांना अधिक मिळकती व्हाव्या म्हणून संप, दगली माजविणारे लोक या बचत चळवळीस कसून विरोध करतात. पण लोकाना पैसे अधिक मिळवू द्यायचे व त्यांतून बचत करायला त्याना शिकवायचें नाहीं यातून व्यसनें, ददात, असंतोष, दगली याच निर्माण होणार. पक्षबाजीचा रस्ता हाच असतो. म्हणून बचत चळवळ ही गाधीसघटनेनेंच केली पाहिजे. बचत करण्याची चळवळ ही उच्च संस्कृतीची चळवळ असून माणसातली लाचारी त्यानें नष्ट होते. ही बचत सामुदायिकपणे केल्यास राष्ट्रचें राष्ट्र वर येऊ शकते. कारण दरिद्री राष्ट्रालाहि भाडवल कमी पडत नाही ही सांस्कृतिक उत्कर्षाची चळवळ आहे. पण सरकारने या बाबतींत सक्ती केली कीं आज ओरड होते. सरकारनें गरीबावरच सक्ती का करावी श्रीमतावर का करू नये, असा एक आक्षेप बोनसबॉड्सची कामगाराना सक्ती करण्यात आली तेव्हा घेण्यात आला होता. पण याचें साधे उत्तर असें आहे कीं गरीबांना अडीअडचणीला पैसा मिळणे इष्ट असेल तर गरीबानीच बचत केली पाहिजे आणि बचत करण्याची संस्कृति ज्या गरीबाना नाहीं त्याना सक्ती केली पाहिजे. सामुदायिक बचत हा शाततेच्या क्रातीचा मार्ग आहे. पण ओठांत गाधींचें नाव असणाऱ्याच्या पोटात गाधीच्या शातिमार्गावर निष्ठा कोठे आहे ?

शहरी कामगाराचें जीवनहि या शांततेच्या व विधायक मार्गानें सुधारता येईल. कामगाराच्या सहकारी संस्था हा तर श्रेष्ठ इलाज आहेच. पण कारखान्यासंबंधानेंहि कामगारांचें शांततामय धोरण कोणतें याचा विचार झाला पाहिजे. संप, हळूकाम, घातपात हे मार्ग हिंसेचे व रानटी आहेत. इमानानें व चातुर्यानें काम करणें ही कामगारांची—आजच्या भाडवलशाहींतहि—संस्कृति मानली गेली पाहिजे. जोंवर मालकशाहीच्या लगामावांचून उत्पादन होणार नाहीं असा शेकडों हजारों लोकाचा ठाम समज आहे, स्वता कामगाराचा व त्यांच्या पुढाऱ्यांचाहि ठाम समज आहे आणि तो खरा आहे तोंवर कारखान्यांच्या राष्ट्रीकरणाच्या गोष्टी व्यर्थ आहेत. आजच्या स्थितींत हिंसेखेरीज राष्ट्रीकरण होणार नाहीं. पण कामगार इमानानें व चातुर्यानें देखरेखीवाचून काम करतात असें जर सिद्ध झालें तर गिरण्या व कारखाने राष्ट्रीय मालकीचे करणें हें प्रौढ मताधिकारावर आधारलेल्या कायदेमंडळात केवढयाहि मोठ्या बहुमतानें केव्हांहि

घडून येऊ शकेल. कामगाराना कारखाने मालकशाहीवाचून चालविता आले म्हणजे ते मालकाच्या हातातून गेल्यासारखेच असतात. उत्पादनव्यवहारास धक्का न लावता कारखानदारास दरवाजाबाहेर घालविण्याचा शांततेचा उपाय हाच आहे.

इतकी शांततेची शिस्त लोकाना लागणेच अशक्य असून फक्त क्रांतिमार्गाकडून दृष्टि मागे वळविण्याची ही एक युक्ति आहे असा आक्षेप येथे खास येईल. पण याहून अन्य उपाय हिंसायुक्त कम्युनिस्ट क्रांति हाच असून त्यात आज यादवी, महायुद्ध हीं भयंकर संकटे आहेत. उत्तर कोरियनानी तो मार्ग पत्करला. या उत्तर कोरियनाना एकेका नागरिकाची केवढी प्रचंड तयारी करावी लागली असेल हे रणांगणावर आज केवढें कर्तृत्व उत्तर कोरियन माणूस गाजवितो आहे त्यावरून कल्पिता येण्यासारखे आहे. एवढ्या प्रयत्नांनंहि यादवी आणि महायुद्ध या वणव्यातच तो प्रवेश करतो आहे. तो त्यातून कसा बाहेर पडणार व जगाचें काय होणार हे आज कोणीहि सांगू शकणार नाही. वर सांगितलेला विधायक संघटनेचा मार्ग याहून अधिक अवघड आहे असे मानणे हे चूक ठरेल. हिंसात्मक चळवळीत जी गोड गुंगी असते तीहि शांतिमय व विधायक संघटनेत थोड्या तपस्येने आल्यावाचून राहणार नाही. बागायत शेतकऱ्याला त्याच्या शेतीत जो काव्यानंद दिसतो तो त्यातील विधायकतेचा असतो. शेतकऱ्याच्या मिळकती घसरल्या म्हणून ते काव्य नष्ट झालें. आता वर सांगितल्या प्रकारें सर्व जीवन संघटित केले तर इमानाने व चातुर्याने धनोत्पादन करणें यांत संप आणि दंगलो यापेक्षा अधिक काव्य आहे असें खास अनुभवास येईल.

हें सर्व विधायक कार्य कम्युनिस्ट संघटनेसारखी दृढ व शिस्तबद्ध अशी गांधीनिष्ठांची संघटना झाल्यावाचून मात्र अशक्य आहे. शांततेच्या, सलोख्याच्या व विधायक मार्गांवर श्रद्धा असणाऱ्या व भौतिक दृष्टीने आपले कार्यक्रम आखणाऱ्या संघटनेवाचून वरीलपैकी काहींहि होणार नाहीं, हे येथे पुन्हा सांगितलें पाहिजे. मी गांधीवाद आणि मार्क्सवाद यांचा हा समन्वय मांडतो आहे असे मला वाटतें. आज हें मत कोणास पटविणे हे मात्र कठिण आहे.

तपशीलात अधिक न शिरता आणखी एक मूलग्राही सूचना येथें मी करूं इच्छितो. वरील योजनेप्रमाणें कार्य चालू झालें तरच ती सूचना अमलात येण्या

साक्षी आहे. प्रौढ मताधिकारावर निवडलेलीं कायदेमंडळें आणि बहुमतास जबा-बदार अशीं मंत्रिमंडळें मिळाल्यानंतर यापुढें निदान सार्वजनिक स्वरूपाचे संप, कायदेभग, सत्याग्रह हेहि वर्ज केले पाहिजेत. याबाबत नुसते शाब्दिक वितण्डवाद व्यर्थ आहेत. वर दिलेल्या पद्धतीनें समाजसंघटना करण्याचा निकराचा प्रयत्न केल्यास प्रौढ मताधिकारावर निवडून येणारीं माणसे त्यास लोकहित साधणारीं असतील असा विश्वास राजकीय पक्षानीं बाळगला पाहिजे. नाहींतर एकीकडून प्रौढ मताधिकाराची मागणी व दुसरीकडून संप आणि कायदेभग म्हणजे आपण एका हातानें चित्र काढावें व दुसऱ्या हाताने त्यावर चिखलफेक करावी असें म्हणण्यासारखें आहे. मात्र पार्लमेंटांत मतदानाचें पूर्ण स्वातंत्र्य असावें व पक्षशिस्तीची मुस्कटदाबी नसावी. ब्रिटनमध्यें मजूरपक्षानें हें स्वातंत्र्य ठेवले आहे. यामुळें कोणत्याहि मुद्यावर जे बहुमत होईल ते खरेंखुरें राष्ट्राचें मत ठरतें, देशांत पक्षापक्षामधील वातावरण सलोख्याचें राहतें व परराष्ट्रास बोट शिरकविण्यास वाव राहात नाहीं. अमेरिका अथवा रशिया याना भारतात बोट शिरकविता येऊं नये यासाठीं येथे यादवी व हिंसा टाळणें हाच उपाय आहे. आजची समाजघटना बदलून ती समाजवादी करणें हें यादवी टाळण्यासाठींच अवश्य आहे. सलोख्यानें, शांततेनें व विधायक मार्गानें समाजक्रांति येथे कशी करावी त्याचें त्रोटक दिग्दर्शन येथे केलें आहे. अखेर यादवी व महायुद्ध याच्या वणव्यातून जावेंच लागलें तरी मागून शिल्लक राहणाऱ्या सर्वच मानवजातीस गांधींचें स्मरण करून वर सुचविल्या प्रकारचा मार्गच अवलंबावा लागेल. म्हणून ज्यांच्या ठिकाणीं विधायक व शांततेच्या मार्गाबद्दल निष्ठा आहे त्यानीं यादवीकडे धावणाऱ्या पक्षबाज वीराच्या राजकारणाकडे दुर्लक्ष करूनहि या कार्यास हात घालावा. हिंसेंतून जगाचे प्रश्न सुटत नाहींत हें सिद्ध करण्याचें कार्य इतिहास हिंसकांच्या हातूनच परभारें उरकीत आहे.

---

## : १२ : उपसंहार

पण जगातील अथवा भारतातीलहि फार थोड्या लोकाना या शांततेच्या व सलोख्याच्या समाजसंघटनेचें महत्त्व वाटते. यामुळे तसा प्रयत्न लवकरच कोणी करील असा संभव नसून कोरियन प्रश्नानेच आशियाचें, भारताचें व जगाचें नजिकचें भवितव्य घडविले जाणार आहे म्हणून त्याकडे जगाचें व भारताचेहि डोळे लागून राहिले आहेत.

कोरिअन युद्धातून काय निष्पन्न होणार हे, ज्या अमेरिकेनें हे युद्ध आपणावर ओढवून घेतले त्या अमेरिकेलाहि माहीत नाही. ज्याचें शस्त्र बली ठरेल तोच विजयी ठरेल व नैतिक दृष्ट्या तोच श्रेष्ठ ठरेल असे जग मानते व दुर्बलानी निदान मौन धरावे असा सल्ला शहाणे लोक दुर्बलाना देत असतात. म्हणून नेहरूंनीं जेव्हा 'कम्युनिस्ट चीनला सुरक्षामंडळात घ्या' अशी मागणी स्वताच्या वैयक्तिक जबाबदारीवर केली तेव्हा त्यानी मोठेसे शहाणपणाचें कृत्य केलें असें कोणास वाटले नाहीं. पण नेहरूनी या मागणीचा पिच्छाच पुरविला असून जगावर नेहरूंच्या या मागणीचा बराच चांगला व बलवान परिणाम झालेला दिसतो. रशियाने नेहरूंच्या मागणीचें स्वागत केलें हें स्वाभाविकच झाले पण नेहरूंच्या मागणीने "आशियातील आमची नैतिक भूमिका दुर्बल झाली" अशी कबूली अमेरिकन पत्रे देऊ लागली आहेत हें विशेष होय. "हें कोरियन युद्ध 'कम्युनिझम् विरुद्ध लोकशाही' या स्वरूपाचें असून अमेरिका जें वर्तन करील तेंच लोकशाहीचें वर्तन" अशा आवेशात जो अमेरिकन प्रचार फुगू लागला होता त्याला नेहरूनी टाचणी लावली आहे. नेहरूनीं उत्पन्न केलेले प्रश्न अगदीं मूलग्राही आहेत. टॉम ड्रिबर्गला दिलेल्या मुलाखतींत नेहरू विचारतात,

" कोरियावर अमेरिकेची प्रतिचढाई होईल तेव्हां विस्तीर्ण प्रदेशावर जोरदार बाँबवर्षाव करावा लागेल. यामुळें स्वताला कोरियाचे मोक्षदाते म्हणविणारे अमेरिकन्स कोरियनांना अधिक आवडतील काय? आणि ही प्रतिचढाई यशस्वी झाली तरी तें फक्त पहिलें पाऊलच होय. तुम्ही उत्तर कोरियनाना ( समजा )

मागें हटविलें, त्याचा तुम्ही पराभव केला, आणि मग ? तुम्ही मग काय करणार ? तुम्ही काहीं तेथे कायमचे राहू शकत नाही. केव्हा तरी तुम्हाला तो मुलूख सोडून गेलेच पाहिजे. आणि मग पुन्हा कोरिअनांच्याच हातीं त्यांचा मुलूख देणार ना ? हा सर्व हास्यास्पद प्रकार आहे."

हा हास्यास्पद प्रकार टाळण्यासाठीं "उत्तर कोरियनानीं माघार घेतल्यास युनोमार्फत घटनासमिति भरविण्यात येईल" असें आश्वासन देण्यात यावें असें नेहरूंनीं मागे एकदा या प्रकरणी सूचित केलें होतें. पण घटनासमिति भरल्यास व युनोचे अधिकारी आणि सैन्य घटनासमितीसाठीं तेथे आल्यास रशियाचें सैन्य व अधिकारीहि अमेरिकनाबरोबरीनें त्यात असतील. यामुळें अमेरिकन्स अथवा रशियन्स याना कोणाविरुद्धहि पक्षपात करता येणार नाहीं. आणि कम्युनिस्टांची कार्यक्षमता व वजन अधिक असल्यामुळें घटनासमितींत त्यांनाच विजय येईल हें उघड आहे. सिंगमन ऱ्ही हा जो दक्षिण कोरियाचा अध्यक्ष त्याला गेल्या मे मध्ये झालेल्या निवडणुकींत बहुमताचा पाठिंबा मिळाला नाहीं तरी त्यानें राजीनामा न देता तो अध्यक्ष राहिला आहे आणि त्याच्या विरुद्ध बाजूस असलेले बहुमताचे लोक कम्युनिस्टाना मदत करीत आहेत. 'मँचेस्टर गार्डिअन'चा बातमीदार सांगतो कीं संयुक्त राष्ट्रांच्या सैन्यास दक्षिण कोरियन जनतेची मदत मुळींच होत नसून फक्त सयुक्त राष्ट्रानाच लढावें लागत आहे. अशा स्थितींत दक्षिण कोरियनाची मुक्तता हे जें अमेरिकेचें ध्येय तें खोटें ठरणार असून अमेरिकेचा रणात विजय झाला तरी नैतिक पराभवच होणार आहे. अर्थात् अशा नैतिक पराभवाची पर्वा अमेरिका आज करणार नसून ज इसेनॉरनें सुचविल्याप्रमाणे उत्तर कोरियावर चढाई करून जर्मनी ज्याप्रमाणें सयुक्तांनीं व्यापला त्याप्रमाणें अमेरिका उत्तर कोरिया व्यापील व तेथील कम्युनिझमला ठेचून काढण्याची शिकस्त करील. मॅकार्थरला जपान-बरोबरच कोरियाची सत्ता मिळेल.

पण एवढ्यानें कम्युनिझमचा नाश कोठे कोठे आणि कितीसा होणार ? अमेरिकेला यावेळीं मोठे युद्ध हवें आहे. पण चीननें जर फोर्मोसावर चढाई केली नाहीं तर अमेरिकेला चीनशीं व म्हणून रशियाशीं युद्ध करण्याची संधि मिळत नाहीं. व्हीएत्नामध्ये फ्रेंच सैन्याला पाठिंबा देऊन तेथें चीनच्या भूमी-वरहि जरूर तर उतरण्याचा अमेरिकेचा मानस आहे. पण फ्रेंचांचा हस्तक जो

बाओदाय राजा त्याला व्हीएत्नाममध्ये पाठिंबा नाही. म्हणजे अमेरिका व्हीएत्-नाममध्ये उतरली तरी तेथेहि तिला लोकमतास दडपूनच राज्य करावे लागेल. पण इतके करूनहि रशिया व चीन एवढी प्रचंड लोकसंख्या व अवाढव्य मुलूख कम्युनिस्टच राहणार व त्याची शक्ति —आर्थिक व इतर सर्वांगीण—वाढतच जाणार आहे.

दरम्यान अमेरिकेचें काय होईल ? अमेरिका साऱ्या जगाला कर्जे देत आहे, शस्त्रास्त्रे वाढवीत आहे. अमेरिका हे भांडवलशाही राष्ट्र असल्यानें तेथें शस्त्रास्त्र-कारखाने खाजगी आहेत, परदेशात कर्जादाखल जाणारा माल खाजगी कार-खानदाराचा आहे, त्याना त्याचें मोल दिले पाहिजे. पण परदेशांकडून अमेरिका मालाला उलट माल घेत नाही. सोनें बाहेर कोणाजवळ उरलेलें नाही. अशा परिस्थितीत स्वदेशातील धंदेवाल्याना पैसे देण्यासाठी अमेरिकेला चलन फुगवावे लागेल आणि अखेर परदेशाचा माल अमेरिकेनें न घेतला तर अमे-रिकेची निर्यातच थांबेल व आर्थिक संकट अमेरिकेवर गुदरेल. इंग्लंडादि युरोपीय राष्ट्रेंहि शस्त्रास्त्राच्या भाराखाली चिरडली जाणार आहेत.

रशियानें युद्ध पुकारलें तर पुढें जगाचें काय होईल हा प्रश्न आहे. पण रशियाला हिटलरप्रमाणें युद्धावाचून सुटका नाही अशी परिस्थिति मुळीच नाही. रशिया अथवा चीन यावर अमेरिका स्वतः चढाई करणार नाही तोवर पूर्व युरोपीय राष्ट्रे, रशिया व चीन हा मुलूख आतल्याआत आपली प्रगति करीत राहील व अमेरिकेला बाहेरच्या जगातील आपल्या सार्वत्रिक सत्तेस त्या त्या राष्ट्रातील पुरोगामी गटाकडून व पक्षाकडून विरोध पत्करीत राहावे लागेल.

नेहरूंनीं चीनचा खरोखर मूलग्राही प्रश्न सुरक्षा समितीपुढें ठेवला आहे. ज्या देशातील प्रचंड बहुसंख्य जनतेनें एकादी राज्यसत्ता मान्य केली ती अधिकृत राज्यसत्ता नव्हे असें अमेरिका केवळ आपल्या शस्त्रास्त्रबळावर विसंबून बोलणार काय व अमेरिकेच्या कर्जावर जगणाऱ्या राष्ट्रांनी केवळ सावकाराची गुलामगिरी पत्करून त्याच्या 'हो'स 'हो' द्यावी काय ? असा हा रोखठोक सवाल आहे. या सवालाचा ब्रिटन व अमेरिका येथील लोकमतावर अनुकूल परिणाम होत असून अमेरिकेत व ब्रिटनमध्यें ट्रूमनच्या मताचे जे विरोधक आहेत त्याचा हा विरोध नेहरूंच्या भूमिकेमुळें वाढत

जाईल. त्यामुळें ट्रूमनला आज रशियाविरुद्ध युद्ध पुकारावेंसें वाटतें ते त्याला अशक्य होईल हा नेहरूंच्या भूमिकेचा नजिकचा मोठा फायदा आहे.

दरम्यान ब्रिटन व अमेरिका यामधील अंतर्विरोधहि वाढत जाणार आहे. कारण अमेरिकन भांडवलशाहीला ब्रिटिश सोशॅलिझम् वैऱ्यासारखा वाटतो आहे. ब्रिटननें युरोपातील पोलाद धंद्याच्या एकीकरणात सामील व्हावें अशी अमेरिकेची व फ्रेंचादि युरोपीय राष्ट्रांची मागणी आहे. पण युरोपात भांडवलशाही सत्ता जोरात असून कामगारांची निष्ठुर पिळणूक होत आहे तोवर आपण युरोपीय राष्ट्रांच्या धंद्यात आपले धंदे सामील करणार नाहीं असें ब्रिटनने स्पष्ट कळविलें आहे. अमेरिकेला जें महायुद्ध हवें आहे तें आजच मिळालें नाही तर अमेरिकन भांडवलशाहीची आर्थिक संकटें वाढत जातील आणि ब्रिटनमधील व इतर बाहेरच्या जगातील सोशॅलिस्ट चळवळ आणि अमेरिकेचा साम्राज्यवादी दुराग्रह यामधील कलह वाढत गेल्यास महायुद्धाचा संभव लांबणीवर पडून शांततेनें समाजवादाचा प्रसार करण्यास अधिकाधिक संधि मिळणार आहे. म्हणून भारतासारख्या मागसलेल्या राष्ट्रांनीं आपले अंतर्गत प्रश्न अमेरिका व रशिया यांना हस्तक्षेप करण्यास वाव न मिळेल अशा सलोख्याने व समाजवादी धोरणाने सोडविले पाहिजेत.

